श्री० होळकर सरकारची ग्रंथमाला.

नं. १४

# महाराष्ट्र कविचरित्र.

## भाग ५ वा.

लेखक व प्रकाशक

जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर.

माजी संपादक " इंदुप्रकाश " व " ज्ञानांजन "
आणि इसापनीति, भरतपुरचा वेढा,
सं० प्रणयानंद नाटक, नेपाळवर्णन, इत्यादि
पुस्तकांचा कर्ता.

इ. स. १९२०

किंमत १। रुपया.

प्रिंटर—अनंत आत्माराम मोरमकर,

श्री लक्ष्मी-नारायण प्रेस, ४०२ ठाकुरद्वार, मुंबई.

पब्लिशर—जगन्नाथ रघुनाथ आजगांवकर,

भांगवाडी, खटावची चाळ, काळबादेवी, मुंबई.

# अनुक्रमणिका.







# थोडेंसें आत्मनिवेदन.

महाराष्ट्रकविचरित्र लिहिण्याचा उद्योग सुमारें १८ वर्षांपूर्वी मी सुरू केला. वडिलांच्या सहवासानें बाळपणापासूनच या विषयाचा मला नाद असल्यामुळें आजपर्यंत मी बरीच मराठी कविता लक्ष्यपूर्वक वाचली आहे व पुष्कळ ग्रंथ वरवर चाळून पाहिले आहेत. हे ग्रंथ वाचतांना पुष्कळ जुन्या कवींनीं आपापल्या ग्रंथांत थोडथोडें आत्मवृत्त दिलें आहे असें मला आढळून आलें; व या 'आत्मवृत्तां'च्या आधारानें व ठिकठिकाणच्या शोधकांनीं मिळवून प्रसिद्ध केलेल्या एतद्विषयक माहितीचा उपयोग करून सर्व जुन्या मराठी कवींच्या चरित्रांचें एक तात्पुरतें टांचण तयार करून ठेवल्यास भावी महाराष्ट्र कविचरित्रकर्त्यास त्याचा अत्यंत उपयोग होईल, असा विचार माझ्या मनांत आला. त्याप्रमाणें, आजवर प्रसिद्ध झालेल्या प्रस्तुत ग्रंथाच्या चार भागांत सुमारें १०० जुन्या कवींच्या चरित्रांची रूपरेखा मी दिली असून, त्यांच्या ग्रंथांची संक्षिप्त माहिती व नमुन्यादाखल त्यांतील कांहीं सुंदर उतारेही दिले आहेत. इंग्रजींत ज्याला 'फर्स्ट हँड इन्फर्मेशन' म्हणतात अशी माहिती मिळविण्याचा प्रयत्न करण्यास ज्या प्रकारच्या परिस्थितीची आवश्यकता असते, त्या परिस्थितीच्या अभावीं प्रस्तुत ग्रंथ लिहितांना, इतर लेखकांनीं दिलेल्या व प्रसिद्ध केलेल्या माहितीचा उपयोग जरी मला मुक्तहस्तानें करावा लागला आहे, तरी या ग्रंथांत 'first hand information' चा अगदीं अभाव आहे असें मात्र कोणी समजूं नये. पहिल्या चार भागांत व प्रस्तुत भागांत प्रसिद्ध झालेल्या चरित्रांपैकीं ५०।६० कवींचीं चरित्रें पुष्कळ अंशीं विश्वसनीय आहेत असें धरून चालण्यास हरकत नाहीं. इतर कवींपैकीं कांहीं कवींची अधिक माहिती, वरील चार भाग प्रसिद्ध झाल्यानंतर उपलब्ध झाली आहे, तिचा योग्य तो उपयोग द्वितीयावृत्तींत केला जाईल हें सांगावयास नकोच. ज्ञानेश्वर, तुकाराम, एकनाथ, श्रीधर, मोरोपंत, नामदेव वगैरे मोठे कवि व इतर अनेक प्रसिद्ध व अप्रसिद्ध कवि यांचीं चरित्रें अद्याप लिहावयाचीं आहेत व तीं लिहितांना प्रत्येक कवीविषयीं जेवढी माहिती मिळणें

शक्य आहे, तेवढी सर्व मिळविण्याचा प्रयत्न अवश्य केला जाईल हें हो सांगावयास नकोच.

ज्ञानेश्वर किंवा मुक्तेश्वर यांसारख्या श्रेष्ठ कवींपासून भारती विश्वनाथासारख्या सामान्य लेखकापर्यंत सर्वच जुन्या कवींचीं चरित्रें या ग्रंथांत समाविष्ट करण्यांत "श्वानं युवानं मघवानम्" च्या तोडीचें अनौचित्य मजकडून होत आहे, असा कांहीं गृहस्थांचा आक्षेप आहे, त्यावर माझें उत्तर असें आहे कीं प्रस्तुत ग्रंथलेखनाचा उद्देशच सदर गृहस्थांच्या लक्षांत आलेला नाहीं. "**महाराष्ट्रकविचरित्र**" हें ग्रंथाचें नांव एकदां मुक्रर केल्यावर एखादा कवि श्रेष्ठ प्रतीचा असो वा कनिष्ठ प्रतीचा असो, तो जोंपर्यंत कवि आहे, तोंपर्यंत त्याच्या चरित्राचा समावेश प्रस्तुत ग्रंथांत केल्याशिवाय गत्यंतर नाहीं. मिल्टनच्या 'पॅराडाइज लॉस्ट' शीं गोल्डस्मिथच्या 'ट्रॅव्हलर' ची बरोबर होत नाहीं म्हणून, आंग्ल कविचरित्रांतून गोल्डस्मिथची जशी कोणी हकालपट्टी करणर नाहीं, तद्वतच हा प्रकार आहे. दुसरी गोष्ट अशी कीं, ज्ञानेश्वर, एकनाथ, मुक्तेश्वर, तुकाराम, रामदास इत्यादि श्रेष्ठ कवींचीं चरित्रें व कविता हीं जशीं प्रसिद्ध आहेत, तशीं कृष्णदयार्णव, अवचितसुत काशी, हरिबुवा भोंडवे इत्यादि कवींचीं चरित्रें व कविता हीं फारशीं प्रसिद्ध नाहींत. परंतु त्यांनींही यथाशक्ति यथाबुद्धि महाराष्ट्र वाङ्मयाची सेवा करण्याचा मनः– पूर्वक प्रयत्न केला आहे व ह्मणून त्या सर्वांची हजिरी घेणें हें महाराष्ट्रकविचरित्रकर्त्याचें कर्तव्यच आहे. कांहीं कवि तर असे आहेत कीं, त्याचें वाङ्मय कधींही प्रसिद्ध होण्याचा संभव नाहीं, व कालांतरानें त्यांची कविता व त्यांच्या चरित्रांचीं साधनें खात्रीनें नामशेष होणार. अशा स्थितींत, अमुक एका कालीं अमक्या ठिकाणीं अमका अमका कवि होऊन गेला व त्यानें अमुक ग्रंथ लिहिले आहेत इतकी माहिती व नमुन्यासाठीं त्याच्या ग्रथांतील थोडेसे उतारे देऊन त्याच्या वाङ्मयविषयक परिश्रमाची नोंद करून ठेवली तर त्यांत एवढें काय बिघडतें? गेल्या पन्नास वर्षांत महाराष्ट्रांत कमींत कमी शें दोनशें अर्वाचीन कवि होऊन गले आहेत व हल्लींही शेंदीडशें लहान मोठे अर्वाचीन कवि विद्यमान आहेत. एका कालीं चालू असून हल्लीं अस्तंगत झालेल्या शेंकडो मासिकांचे व वृत्तपत्रांचे अंक चाळल्यास अर्वाचीन कवींची ही

संख्या बिलकुल अतिशयोक्तिपूर्ण नाहीं हें वाचकांच्या निदर्शनास येईल. तर, अशा रीतीनें, प्रसिद्धीकरणाच्या सुलभतेमुळें सर्व प्रकारच्या बऱ्या वाईट अर्वाचीन मराठी कवींस जर आपल्या कवितेचें प्रदर्शन आज हक्कानें करितां येतें, तर त्याच प्रकारच्या जुन्या कवींस महाराष्ट्रकविचरित्रांतून बहिष्कार घालण्यासारखें असें कोणतें महापातक त्या बिचाऱ्यांनीं केलें आहे ?

चमत्कार आणि आख्यायिका यांचा समावेश प्रस्तुत ग्रंथांत करावा कीं करूं नये, यासंबंधानेंही असाच मतभेद होण्याचा संभव आहे. चमत्कार खरे कीं खोटे, हा तर वादाचा मोठाच प्रश्न आहे; व त्याचा निकाल कधीं लागेल कीं नाहीं हें निश्चयात्मक रीतीनें सांगणें तर त्याहून कठीण आहे. जगांतील बहुतेक सर्व धर्मांत जे साधुसंत होऊन गेले, त्या सर्वांचीं चरित्रें थोड्या बहुत प्रमाणांत अलौकिक चमत्कारांनीं भरलेलीं आहेत. महात्मा येशू ख्रिस्त व त्याचे प्रेषित, गौतमबुद्ध, जैन तीर्थंकर यांच्या चरित्रांत चमत्कारांशिवाय काय आहे ? आणि त्या चरित्रांतल्या चमत्कारांच्या सगळ्या कथा जर काढून टाकल्या तर त्यांतलें बहुतेक स्वारस्य नष्टप्राय होऊन जाईल. चमत्कार करून दाखविणें शक्य आहे कीं काय या प्रश्नाचा जबाब चमत्कार करून दाखविण्याचें ज्यास सामर्थ्य आहे त्यासच विचारला पाहिजे. "अहो, स्त्रियांस मुलें होणें ही अशक्य कोटींतली गोष्ट आहे," असें जर एखादी वंध्या उद्यां प्रतिपादन करूं लागली तर तिच्या दृष्टीनें तें प्रतिपादन अयथार्थ आहे असें म्हणतां येणार नाहीं, परंतु इतर स्त्रियांस जर प्रत्यक्ष मुलें झालेलीं दिसत आहेत तर मुलें होणें अशक्य नव्हे हा सिद्धांत त्या वंध्या स्त्रीनें-ही निमूटपणें मान्य केला पाहिजे. तर हीच उपमा थोड्याशा फेरफारानें, चमत्कार करून दाखविणारे साधुसंत आणि सामान्य लोक यांच्या बाबतींत लागू करण्यास हरकत नाहीं. ज्या मार्गाचें अवलंबन केल्यामुळें ज्ञानेश्वरादि सिद्ध पुरुषांस अलौकिक चमत्कार करून दाखविण्याचें अमानुष सामर्थ्य प्राप्त झालें, त्या मार्गानें जाऊन प्रत्यक्ष अनुभव घेण्याचा प्रयत्न केल्याशिवाय सगळ्याच चमत्कारांवर बनावटपणाचा छाप मारणें म्हणजे आपल्या ज्ञानाभिवृद्धीच्या मार्गांत आपण होऊन अडथळा आणणें होय. कालपरवां होऊन गेलेली मॅडम ब्लव्हाट्स्की, अक्कलकोटचे स्वामी, माणिक प्रभु, कोल्हापूर येथील कुंभार

गल्लींतील स्वामी इत्यादिकांनीं केलेल्या अलौकिक चमत्कारांच्या अनेक आख्या-यिका प्रचलित आहेत, तरी 'चमत्कार सब झूट' म्हणणाऱ्या आमच्या रॅशना-लिस्टांनीं, स्वतःशीं समकालीन असलेल्या वरील व्यक्तींच्या अलौकिक चमत्का-रांचा खरेखोटेपणा त्याच वेळीं सिद्ध करून दाखविण्याचा प्रयत्न कां केला नाहीं ? 'चित्रमय जगत्' मासिकाच्या १९१९ सालच्या जुलईच्या अंकांत, रामदास पंचायतनांतील एक प्रसिद्ध सत्पुरुष श्रीआनंदमूर्ति ब्रम्हनाळकर यांचें चरित्र प्रसिद्ध झालें आहे, त्यांत पुढील मजकूर आहेः–" वृंदावनाचा डोल या चमत्काराचा अनुभव अद्यापिही कांहीं ठरावीक दिवशीं ब्रम्हनाळीं येतो. म्हणून या चमत्काराचा थोडासा विस्तार केल्याशिवाय राहवत नाहीं. आरंभीं आरंभीं

जे दिनीं संतर्पण । अथवा वेदघोष हरिकीर्तन ।
तया दिनीं स्वानंदेंकरून । डोल व्हावा वृंदावनीं ॥

अशी स्थिति होती. कालमानानें या स्थितींत अंतर पडून वसंतऋतूंतच डोल होऊं लागला व हल्लीं तर रामनवमी व महाशिवरात्र हे दोनच दिवस डोलाचे असे मानले जातात. पैकीं रामनवमीस डोल प्रायः होत नाहीं. फक्त महा-शिवरात्रीस ( माघ वद्य १४ ) मात्र **अद्यापि प्रतिवर्षी डोलाची साक्ष पटते, हीं दृक्प्रत्ययाची गोष्ट आहेः कोणीही येऊन खात्री करून घ्यावी.** मध्यान्हसमय ही डोलाची वेळ होय. डोल नेहमी श्रीरघुनाथस्वामीच्या समाधीचा होतो व शिष्य आनंदमूर्तीच्या निःसीम गुरुभक्तीवर सद्गुरु प्रसन्न असल्यामुळें तो होतो अशी त्याची उपपत्ति आहे. **डोल होतो ह्मणजे समाधि ( दगडी वृंदावन ) डोल्याला खात्री पटेल इतकी कंप पावते. डोल सुमारें घटकाभर होतो."**

वरील विद्यमान चमत्काराचा पडताळा पाहण्यासाठीं मुद्दाम ब्रह्मनाळास जाऊन येणें कोणासही अशक्य नाहीं. तरी, अलौकिक चमत्कारांमुळें ग्रंथाचें महत्त्व कमी मानणारे पुण्याच्या डे. व्ह. ट्रा. सोसायटीचे सभासद या संधीचा फायदा घेऊन चमत्कारांचा बनावटपणा सिद्ध करण्यास चुकणार नाहींत अशी आशा आहे. असो. तर दोन अडीचशें वर्षांपूर्वी समाधिस्थ झालेल्या सत्पुरुषाच्या वृंदावनाचा जर अद्याप डोल होतो तर ज्ञानेश्वरांनीं आपल्या जिवंतपणीं भिंत चालविली हा चमत्कार खोटा कां मानावा ? अहमदनगरचे प्रसिद्ध नास्तिक कै.

बळवंत बाबाजी देशपांडे बी. ए. एल् एल्. बी यांनीं, मालेगांव येथें एका जैन यतीनीं करून दाखविलेल्या अनेक चमत्कारांची माहिती मागें * सुधारक पत्रांत प्रसिद्ध केली होती, तिचा उल्लेख प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागाच्या प्रस्तावनेंत येऊन गेलाच आहे. तात्पर्य, सृष्टींतील ज्या अनेक गूढांचा उलगडा अल्पज्ञ मानवास अद्याप व्हावयाचा आहे, त्यांपैकींच चमत्काराचें एक गूढ असून, पुढें मागें शास्त्रज्ञ लोक त्याचा योग्य तो निकाल लावतीलच. तोंपर्यंत, परंपरेनें (traditionally) ज्या आख्यायिका समाजांत प्रचलित झाल्या आहेत त्यांचा निर्देश करून ठेवण्यास कांहीं हरकत आहे असें मला वाटत नाहीं. या चमत्कारविषयक दंतकथांस कितपत महत्त्व द्यावयाचें हें ज्यानें त्यानें आपापल्या समजुतीप्रमाणें आपापल्या मनाशीं ठरवावें म्हणजे झालें.

आणखी कांहीं लोकांचा असा एक आक्षेप आहे कीं कवींचीं चरित्रें त्यांच्या कालक्रमाप्रमाणें (in chronological order) दिलीं जात नाहींत. परंतु हा आक्षेप बहुतांशीं निराधार आहे. कारण प्रत्येक भागांत जीं कवींचीं चरित्रें आलीं आहेत तीं त्या भागापुरतीं कालक्रमानच आलीं आहेत. आतां, आदिकवि मुकुंदराज किंवा ज्ञानदेव यांजपासून पंचवीस तीस वर्षांपूर्वी होऊन गेलेल्या जयरामनानापर्यंत सर्व कवींचीं चरित्रें अगदीं कालक्रमानें बिनचूक दिलीं पाहिजेत असें जर कोणाचें म्हणणें असेल तर त्याची अमलबजावणी करणें मात्र तूर्त तरी अगदीं अशक्य आहे, हें येथें स्पष्टपणें सांगितलें पाहिजे. कारण तसें करावयाचें म्हटल्यास, जीं दोन अडीचशें चरित्रें प्रकृत ग्रंथांत द्यावयाचीं आहेत, तीं अगोदर सगळीं लिहून काढावीं लागतील व नंतर कालक्रमानें त्यांची जुळणी करून तीं छापावीं लागतील. म्हणजे हल्लीं जे चारपांच भाग प्रसिद्ध झाले आहेत तेही या सुधारणेच्या पायीं प्रसिद्ध करितां आले नसते! ईश्वरकृपेनें सर्व भागांची प्रथमावृत्ति निघून, त्या सर्व भागांची एकदम पुनरावृत्ति काढण्याचा जेव्हां कधीं प्रसंग येईल तेव्हां मात्र ही सुधारणा अंमलांत आणण्याचा प्रयत्न अवश्य केला जाईल.

कविचरित्रलेखनाचें हें कार्य किती कठीण आणि दगदगीचें आहे याचा अनुभव त्या कार्यांत पडलेल्या लोकांशिवाय इतरांस येणें अशक्य आहे.

* सुधारकाचे ता. १० मे १९०७ व ता. ३ जून १९०७ हे दोन अंक पहा.

एकाच नांवाचे अनेक कवि निरनिराळ्या काळीं होऊन गेलेले असल्यामुळें त्यांच्या कवितेची छाननी करून त्यांचें ग्रंथकर्तृत्व मुक्रर करणें हें काम सोपें नाहीं. रंगनाथ या नांवाचे कमींत कमी तीन कवि महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत व त्यांपैकी एकाच्या सांप्रदायिकांनीं दुसऱ्याच्या एका ग्रंथाच्या शेवटीं आपली परंपरा घुसडून दिली असल्यामुळे त्या ग्रंथाच्या कर्तृत्वाविषयीं सामान्य जनांचा कसा गैरसमज होतो याचा निर्देश प्रस्तुत ग्रंथाच्या पहिल्या भागांतील रंगनाथस्वामी निगडीकर यांच्या चरित्रांत केलाच आहे. ज्ञानदेव, नरहरि, विठ्ठल, तुकाराम, महिपति. हरि या एकेका नांवाचे अनेक कवि निरनिराळ्या काळीं होऊन गेलेले असल्या-मुळें व कांहीं प्रकाशकांनीं त्यांच्या कवितेची खिचडी करून ती एकाच बाडांत प्रसिद्ध करून टाकल्यामुळें फारच घोटाळा झाला आहे. कै. तुकाराम तात्या यांच्या तुकारामाच्या गाथ्यांत ‘ सांप्रदायिक ’ या प्रतिष्ठित नांवाने प्रसिद्ध असलेल्या गाथ्यांतल्या अभंगांपेक्षां सुमारे ४००० अभंग अधिक आहेत; व त्यांशिवाय, आजपर्यंत कोठेंही प्रसिद्ध न झालेले असे तुकारामाचे कांहीं अभंग जुन्या वह्यांतून अद्याप सांपडतात. उदाहरणार्थ पुढील अभंग पहाः—

स्वप्न सांगे मंडोदरी । लंका वेढिली वानरीं ॥
दूत पातले रामाचे । बळ अधिक हनुमंताचें ॥
एक एका दुर्गावरी । उड्या मारिति नानापरी ॥
तुका ह्मणे स्वामी माझा । आला अयोध्येचा राजा ॥

हा अप्रसिद्ध अभंग देहूकर तुकारामबुवांचा नव्हे असें सिद्ध करण्यास कोणा-पाशीं काय पुरावा आहे ? माझी तर अशी समजूत आहे कीं, तुकारामबुवांनी लक्षावधि अभंग रचिले असले पाहिजेत. बसल्या उठल्या ज्यांच्या तोंडांतून कविता सहज बाहेर पडावी, त्यांनीं आपल्या हयातींत फक्त ४॥ हजारच अभंग रचिले, या गोष्टीवर विश्वास ठेवण्यास मी तयार नाहीं. थोड्या वर्षांपूर्वी स्वर्गस्थ झालेले मध्यप्रांतस्थ सत्पुरुष गुलाबराव महाराज हे ज्ञानेश्वरीच्या एकेका ओवीवर बसल्या बैठकीस अस्खलित रीतीनें हजारों सुंदर ओव्या कशा रचीत असत हें ज्यांनीं पाहिलें आहे, त्यांस ह्या माझ्या धाष्टर्याविषयीं खात्रीने आश्चर्य वाटणार नाहीं. असो. तात्पर्य, तुकारामबुवांचा म्हणून जो ४॥ हजार अभंगांचा गाथा प्रसिद्ध आहे त्यांत ज्याप्रमाणे तुकारामबुवांच्या सर्वच अभंगांचा समावेश झालेला नाहीं, त्याच प्रमाणें उपरिनिर्दिष्ट ९००० अभंगांच्या गाथ्यांत निरनिराळ्या

दोन तीन तुकारामांचे अभंग कोंबले गेले असण्याचाही बळकट संभव आहे. तुकारामबुवांचे टाळकरी संतुजी तेली जगनाडे यानीं स्वहस्तें लिहिलेली बुवांच्या अभंगांची अस्सल प्रत रा. विनायकराव भावे यानीं नुकतीच प्रसिद्ध केली आहे तींतही सांप्रदायिक गाथ्यांत नसलेले कांहीं अभंग आढळतात. रामदासस्वामीच्या कवितेसंबंधानेंही असाच घोटाळा आहे; कारण समर्थांचे ज्येष्ठ बंधु श्रेष्ठ यांस रामीरामदास असें म्हणत असत व समर्थांची म्हणून जी कविता प्रसिद्ध झाली आहे तींत ज्यांच्या शेवटीं 'रामीरामदास' हें नांव आलें आहे, अशीं अनेक पद्यें आढळतात. अशा स्थितींत, अमुक पद्य रामदासांचें आणि अमुक रामीरामदासांचें हें निश्चयपूर्वक सांगण्यास काय आधार आहे? नामदेवांच्या गाथ्यांत 'नामा' आणि 'विष्णुदास नामा' या दोन कवींची कविता संगृहीत झाली आहे. कदाचित् 'नामा' आणि 'विष्णुदास नामा' ही एकच व्यक्ति असण्याचा संभव आहे. महाभारतकर्ता "विष्णुदास नामा" मात्र निराळा. तुकाराम तात्यांनीं प्रकाशित केलेल्या तुकारामाच्या गाथ्यांतला एक अभंग शिवाजी महाराजांस अनुलक्षून लिहिलेला दिसतो. हा अभंग विद्वच्छिरोमणि सर डॉ. भांडारकर यांस मी दाखविला, तेव्हां त्यांना मोठें आश्चर्य वाटलें व सदर अभंग शिवाजी महाराजांसच अनुलक्षून लिहिलेला असावा हा माझा तर्क बरोबर आहे असें म्हणून, सांप्रदायिक गाथ्यांत तुकारामबुवांच्या सर्वच अभंगांचा समावेश झालेला नाहीं, असा आपला अभिप्राय त्यानीं व्यक्त केला. कै. हरिभाऊ आपटे यांनींही असेंच मत प्रगट केलें. 'अंजनीगीत' म्हणून जें एक लहानसें लोकप्रिय प्रकरण आहे तें रामदासस्वामीच्या नांवावर उगाच दडपून देण्यांत आलें आहे; "हनुमंत हा भक्त निका। तयावांचुनि नाहीं सखा। स्वामीचा हा पाठीराखा। रामदास" ह्या चरणांतील "रामदास स्वामीचा हा पाठीराखा" हे शब्दच ही गोष्ट स्पष्टपणें उघड करून दाखवितात. समर्थांनीं "रामदासस्वामी" या नामाभिधानानें स्वतःचा इतरत्र कोठेंही उल्लेख केलेला नाहीं. मजपाशीं असलेल्या एका जुन्या बाडांत हें प्रकरण आहे, त्याच्या शेवटीं "मातापुत्रा आलिंगन। बश्वलिंग समाधान" असे शब्द आहेत. यावरून हें प्रकरण बश्वलिंगकृत आहे, हें उघड दिसतें. या बश्वलिंग कवीची आणखीही थोडीशी कविता उपलब्ध आहे. पूर्ण व विश्वसनीय माहितीच्या अभावीं चांगल्या विद्वान् शोधकांचीही कशी दिशाभूल होते, याचीं एक-दोन उदाहरणें येथें देतों.

पुणें येथील भारत इतिहास संशोधक मंडळाच्या एका वार्षिक अहवालांत * रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांनीं नरहरी महिपतीचीं कांहीं पदें देऊन, त्यांतील " नरहरि महिपति, " " महिपति लोळे नरहरिचरणीं " इत्यादि नामोल्लेखांवरून " संतचरित्रकार महीपतीबोवा ताहराबादकर यांचे गुरु नरहरिनाथ " असें विधान ठोकून दिलें आहे. आतां संतचरित्रकार ताहराबादकर महिपतींचे ग्रथांत " नरहरि महिपती " हें नांव कोठेंही आढळणार नाहीं, उलट " तुकाराम महाराजानीं मला स्वप्नांत उपदेश दिला, " असें महिपतिबुवांनीं स्पष्ट सांगितलें आहे. असें असतां, रा. राजवाडयांसारख्या चौकस विद्वानानें, महिपतींचे ग्रंथ न पाहतां, एखाद्या फुटकळ पद्याच्या आधारानें वरच्यासारखें विधान बेधडक ठोकून द्यावें आणि त्याच्या सत्यासत्यतेचा ठोकताळा न पाहतां भारत इतिहास संशोधक मंडळासारख्या जबाबदार विद्वन्मंडळानें " बाबावाक्यं प्रमाणं " म्हणून आपल्या वार्षिक अहवालांत तें खुशाल छापून टाकावें ही सखेदाश्चर्याची गोष्ट नव्हे काय ? माझ्यासारख्या "आयतोबा" लेखकांनीं आपल्या लेखांवर डोळे मिटून खुशाल विश्वास ठेवावा अशी ज्यांची अपेक्षा त्या संशोधकांची जर ही स्थिति तर इतरेजनाची गोष्ट काय विचारावी ? असो. तर या प्रकरणीं वस्तुस्थिति अशी आहे कीं, महिपती या नांवाचे तीन किंवा चार कवि महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. पैकीं संतचरित्रकार महिपती प्रसिद्धच आहेत. शनीमाहात्म्यकर्ता तात्याजी महिपती हा दुसरा महीपती. याशिवाय उज्जनी येथें +' नरहरि महिपति ' या नांवाचे एक मोठे संतकवि होऊन गेले असून, त्यांचे लहान मोठे ४० ग्रंथ त्यांच्या मठांत अद्याप उपलब्ध आहेत. त्यांचीं कांहीं फुटकळ पदें मात्र हा कालपावेतों काव्यसंग्रहांत व इतरत्र प्रसिद्ध झालीं आहेत. हे सत्पुरुष, पैठण येथील प्रसिद्ध साधु शिवदिन केसरी यांच्या नरहरिनाथ नामक शिष्याचे शिष्य होत. रा. राजवाडे यानीं भारत इतिहास संशोधक मंडळाच्या अहवालांत दिलेलीं पद्यें याच कवीचीं होत.

कांहीं ठिकाणीं, निरनिराळया दोन कर्त्यांच्या काव्यांत इतकें विलक्षण साम्य आढळतें कीं, प्रत्यक्ष कविनामोल्लेख दृष्टीस पडेपर्यंत हीं काव्यें एकाच

* शके १८३३ चा अहवाल, पृष्ठ ९७ पहा.

+ यांचें चरित्र महाराष्ट्रकविचरित्रांत पुढें येईल.

कवीचीं असलीं पाहिजेत असा भ्रम, निरनिराळया कवींच्या काव्यांचें व त्यांच्या भाषा–रचना–शैलीचें बरेच दिवस लक्ष्यपूर्वक अवलोकन केलेल्या मनुष्यासही झाल्याशिवाय रहात नाहीं. उलट पक्षीं, एकाच कवीच्या निरनिराळया काव्यांत कधीं कधीं इतकें विलक्षण वैचित्र्य आढळतें कीं हीं काव्यें निरनिराळ्या कवींचीं असलीं पाहिजेत असा भ्रम चांगल्या विद्वानासदेखील झाल्याचीं उदाहरणें आहेत. रा. बाळकृष्ण अनंत भिडे बी. ए. यांनीं आपल्या "वामन पंडित" या निबंधांत, एकाच वामनाचे तीन चार वामन कसे केले आहेत, हें तो निबंध ज्यांनीं वाचला असेल, त्यांस सांगावयास नकोच. सारांश, कविचरित्रलेखन हा विषय सकृद्दर्शनी जितका सोपा दिसतो तितका सोपा तो खचित नाहीं व ही गोष्ट लक्ष्यांत ठेवून, अशा प्रकारच्या प्रयत्नाकडे सहृदय वाचकांनीं नेहमी सहानुभूतीच्या दृष्टीनेंच पाहिलें पाहिजे; जान्सनच्या "Lives of the Poets" ची कसोटी जुन्या मराठी कवींच्या ग्रंथांस लावणें म्हणजे इंग्लंड आणि महाराष्ट्र या देशांतील एतद्विषयक परिस्थितीविषयीं स्वतःचें अज्ञान प्रदर्शित करणें होय.इंग्लंडांतील शेक्सपीयर कवीच्या झोंपडीस कौलें किती होतीं व गोल्डस्मिथनें कोणत्या भोजनवसतीगृहास किती दिवस आपला उदार आश्रय दिला होता याची बित्तं माहिती आज कोणास हवी असेल तर तीसुद्धां मिळविण्याचीं साधनें तिकडे उपलब्ध असतील; परंतु आमच्या देशांतल्या एक दोन हजार वर्षांपूर्वीं होऊन गेलेल्या कालिदासाची गोष्ट तर राहोच परंतु दोनतीनशें वर्षांपूर्वीं होऊन गेलेल्या मुक्तेश्वरासारख्या प्रसिद्ध कवीविषयीं देखील म्हणण्यासारखी महत्त्वाची माहिती, खुद्द त्याच्या वंशजांच्या दप्तरांत सुद्धां आज उपलब्ध नाहीं ! ज्ञानेश्वरांच्या चरित्राची देखील हीच स्थिति ! अशा स्थितींत, एतद्विषयक आंग्ल ग्रंथांशीं आमच्या ग्रंथांची तुलना करण्यांत अर्थ काय ?

अर्वाचीन मराठी कवींचे कांहीं अभिमानी मला विचारतात, 'काय हो, केशवसुत, गोविंदाग्रज, रेंदाळकर इत्यादि अर्वाचीन कवींच्या चरित्रांचा समावेश तुम्ही आपल्या ह्या ग्रंथांत कां करीत नाहीं ?" या सद्गृहस्थांस माझें असें उत्तर आहे कीं "मित्र हो, जुन्या मराठी कवींचीं चरित्रें लिहिण्याचा उद्योग संपला म्हणजे मग अर्वाचीन कवींच्या चरित्रांकडे वळूं. तोंपर्यंत तुमच्यांतल्या एखाद्या रसिक गृहस्थानें अर्वाचीन कविचरित्रें लिहिण्याची कामगिरी हातीं घेतली तर बरेंच झालें."

वास्तविक पाहतां कविचरित्रें लिहिण्याचें हें काम, धुळें येथील रा. देव व चांदोरकर, ठाण्याचे रा. भावे व पुण्याचे रा. पांगारकर यांपैकीं एखाद्यानें हातीं घेतलें असतें तर तें याहून कितीतरी पटींनीं चांगलें झालें असतें, कारण वरील सर्व गृहस्थांचा अधिकार या बाबतींत फार मोठा आहे व त्यांची परिस्थितिही या कार्यास सर्व प्रकारीं अनुकूल अशीच आहे. माझे विद्वान् मित्र रा. विनायकराव भावे यांनीं आपल्या ' महाराष्ट्र सारस्वत' ग्रंथाची दुसरी आवृत्ति नुकतीच छापली ती तयार करण्यासाठीं महाराष्ट्र, मध्यप्रांत, वऱ्हाड व तंजावर या प्रांतांतील निरनिराळ्या ठिकाणच्या ज्या हजारों हस्तलिखित पोथ्या त्यांनीं मागविल्या होत्या, त्या आणविण्यास व परत करण्यास रेल्वे व पोष्टेज मिळून सुमारें ५००-६०० रु. त्यांस खर्च करावे लागले व हौसेला मोल नसल्यामुळें त्यांनीं सदर रकम मोठ्या आनंदानें खर्च केली ! इतकी अनुकूल परिस्थिति मला या जन्मीं तरी लाभेल असें मला वाटत नाहीं. रा. देव यांनीं रामदास सांप्रदायी वाङ्मयाचें संशोधन व प्रकाशन करण्याची कामगिरी शिरावर घेतली आहे आणि तीं अगदीं निरपेक्षपणें अखंड चालविली आहे. रा. पांगारकर यांनीं, ज्ञानदेव, नामदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास आणि मोरोपंत या सहा प्रमुख कवींचीं विस्तृत व विश्वसनीय चरित्रें लिहिण्याचा संकल्प केला असून, त्यांपैकीं ज्ञानदेव, एकनाथ व मोरोपंत यांचीं चरित्रें त्यांनीं प्रसिद्धही केलीं आहेत; व त्यांचें तुकारामचरित्रही लवकरच प्रसिद्ध होईल. या गृहस्थांशिवाय, या कामास लायक असे आणखी एक विद्वान् गृहस्थ आहेत, ते रा. राजवाडे होत. परंतु त्यांच्या कार्याचा व्याप फार मोठा असल्यामुळें असलें काम हातीं घेण्यास त्यांस फुरसत कशी सांपडणार ? तथापि या सर्व थोर गृहस्थांनीं अत्यंत परिश्रमानें निरनिराळ्या ठिकाणीं प्रवास आणि शोध करून जी मौल्यवान् विश्वसनीय माहिती प्रसिद्ध केली आहे तिचा प्रस्तुत ग्रंथलेखनाचे काम मला इतका उपयोग होत आहे कीं, त्याबद्दल या सद्गृहस्थांचे आभार मी कोणत्या शब्दांनीं व्यक्त करावे हेंच मला समजत नाहीं. जुन्या कवितेच्या उद्धारार्थ मनोभावें झटणारे गृहस्थ रा. वासुदेव दत्तात्रय गुळवणी ह्यांस देवाज्ञा झाल्यामुळें त्यांच्या एतद्विषयक संशोधनकार्यास आम्ही अंतरलों, ही मोठ्या खेदाची गोष्ट होय.

प्रस्तुत ग्रंथाचे पहिले तीन भाग माझे प्रेमळ मित्र रा. रा. दामोदर सांवळाराम यंदे यांनीं प्रसिद्ध केले आहेत व पुढील सव भाग त्यांनींच प्रसिद्ध करावयाचे

असें ठरलें होतें, परंतु दुर्दैवानें मध्यंतरीं यूरोपांतील महायुद्ध सुरू होऊन कागदाचे व मुद्रणविषयक इतर साहित्याचे भाव भलतीकडे वाढल्यामुळें ग्रंथाचा चौथा भाग त्यांना छापतां येईना. म्हणून सदर भाग मला स्वतःला प्रसिद्ध करावा लागला व त्यांत थोडेसें नुकसानही आलें. इतकें वरून, पैशाच्या टंचाईमुळे सदर भाग अगदींच लहान झाल्यानें तो पुनः वाढवून छापण्याशिवाय गत्यंतर नाहीं. मध्यतरी हा पांचवा भाग लिहून तयार केला व तो इंदूर येथील ग्रंथोत्तेजक मंडळाकडे परीक्षणार्थ पाठविला. त्या मंडळानें त्यास १५० रुपयांचें बक्षीस मंजूर केलें व सहा महिन्याच्या आंत ग्रंथ छापून त्याच्या पांच प्रति मंडळाकडे पाठवितांच सदर बक्षिसाची रकम देण्यांत येईल असें कळविलें. परंत रा. यंदे यांस उपरिनिर्दिष्ट कारणामुळें मुदतींत ग्रंथ छापणें अशक्य झाल्यामुळे पुनः मंडळाकडे दोन वेळां अर्ज करून आणखी एक वर्षाची मुदत मागून घेतली. तरीसुद्धां, मजरीचे भाव अकस्मात् वाढल्यामुळें रा. यंदे यांस ग्रंथ छापण्यास सवड होईना. शेवटीं, या कार्यासाठीं उदार धनिकांची मदत मिळवून ग्रंथ स्वतःच छापावा या उद्देशानें पुढील गृहस्थांच्या सह्यांचें एक विनंतिपत्र काढण्यांत आलें:-

| | |
|---|---|
| लो० बाळ गंगाधर टिळक | प्रि. दामोदर गणेश पाध्ये एम्. ए. |
| कै. रा.ब. गणेश जनार्दन आगाशे बी.ए. | डॉ. डी. डी. साटये |
| सर डॉ. भालचंद्र कृष्ण भाटवडेकर | डॉ.एम्. बी. वेलकर एल्.एम्.ॲन्ड एस् |
| कै. हरि नारायण आपटे | डॉ.आर्.एच् भडकमकर एम्.ए.एम्.डी. |
| प्रो. पी. के. तेलंग एम्.ए.एल्एल्.बी. | रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. |
| डॉ. डी. बी. नाईक दांडेकर एल्. एम्. ॲड. एस्. | डॉ. व्ही. एस्. त्रिलोकेकर एल्. एम्. ॲड एस्. |
| रा. गजानन भास्कर वैद्य बी. ए. | रा. एम्. आर्. जयकर एम्. ए. एल एल्. बी; बॅरिस्टर. |
| रा. हरि सीताराम दीक्षित बी. ए. एल् एल्. बी. सॉलिसिटर | रा. काशीनाथ रघुनाथ मित्र |
| रा. दौलतराव जयराम मंत्री, बी. ए. एल् एल्. बी. सॉलिसिटर | रा. नारायण कृष्ण गद्रे |

| | |
|---|---|
| रा. एन्. व्ही. गोखले बी. ए. एल् एल्. बी. वकील, हायकोर्ट | रा. दिनकर सखाराम वर्दे बी. ए. एल् एल्. बी, वकील, हायकोर्ट. |
| रा. गोविंद मल्लिनाथ ठेंगे बी. ए. | रा. ब. पुरुषोत्तम बाळकृष्ण जोशी, एफ्. आर्. जी. एस्; जे. पी. |
| डॉ. मोरेश्वर गोपाळ देशमुख एम्. डी. | रा. पांडुरंग विनायक काणे एम्. ए; एल् एल्. एम्., वकील हायकोर्ट. |

या पुढाऱ्यांनीं तयार करून दिलेल्या या विनंतिपत्राचा चांगला उपयोग होऊन दीड वर्षांत सुमारें २००० रु. जमा झाले व पुढें आणखी कांहीं रकम जमा होईल अशी खात्री आहे. यांतले सुमारें ४०० रुपये ज्या लोकांनीं उदारपणें हस्तें परहस्तें या कार्यास मदत केली त्यांस कविचरित्राचे पहिले चार भाग विकत घेऊन देण्यांत खर्च झाले, व सुमारें ५० रुपयांचीं इतर पुस्तकें घेतलीं. प्रस्तुत भागाच्या छपाईस सुमारें ५५० रुपये खर्च झाले व बाकी रकमेंतून ग्रंथाचे पुढील सर्व भाग लिहून व छापून प्रसिद्ध करावयाचे आहेत. आणखी सुमारें १००० पृष्ठांचे चार भाग होतील असा अंदाज आहे, कारण, ज्ञानदेव, नामदेव, तुकाराम, एकनाथ, मोरोपंत, रामदास, नरहरि महिपती, कृष्णयाज्ञवल्कि, वेणाबाई व रामदास सांप्रदायी अनेक संतकवि यांचीं चरित्रें अद्याप लिहावयाचीं आहेत. योग्य मार्गानें प्रयत्न केला असतां, कोणत्याही सत्कार्यास महाराष्ट्रांत अद्याप भरपूर पैसा मिळूं शकतो, याचा अनुभव मला आला तो मी येथे मोठ्या आनंदानें व कृतज्ञतापूर्वक नमूद करून ठेवितो. या कार्यासाठीं ज्या थोर मनाच्या गृहस्थांनीं मुक्तहस्तानें साहाय्य केलें त्या सर्वांचे आभार योग्य रीतीनें व्यक्त करण्यास मजपाशीं शब्दच नाहींत; तथापि मी त्यांस नम्रपणें इतकेंच कळवितों कीं, “सद्‌गृहस्थ हो, तुम्ही दिलेल्या पैशाचा मजकडून कधींही दुरुपयोग होणार नाहीं अशी आपण खात्री बाळगा.” ज्या सद्‌गृहस्थांनीं या कामीं मदत केली व करविली त्या सर्वांचीं नांवें ग्रंथाच्या पुढील भागांत देण्याचा विचार आहे.

मनोभावेंकरून एखादें सत्कर्म सुरू केलें असतां, त्या कार्यास लागणारीं साधनें, भगवत्कृपेनें किंवा यदृच्छेनें, आपोआप कशीं मिळत जातात व त्यामुळें, आपलें अंगीकृत कार्य भगवंतास मान्य असून त्याचें त्या कामीं आपणास

साहाय्य आहे असें वाटून मनास एक प्रकारचा निर्भेळ आणि सात्विक आनंद कसा होतो याचीं एक दोन उदाहरणें येथें देतों. २० वर्षांपूर्वी, कोंकणांत आजगांव येथें पैठणचे साधुकवि श्रीमत्कृष्णदयार्णव यांची हरिवरदा ग्रंथाशिवाय आणखी कांहीं कविता असेल काय व असल्यास ती आपणास कशी मिळेल या विवंचनेंत मी असतां, एके दिवशीं, शेजारच्या एका शेतकऱ्यानें मला आपल्या घरीं बोलाविलें व आपल्या घरांतलें एक फाटकें दप्तर मजपुढें ठेवून त्यांतला कसलासा एक कागद काढून देण्यास सांगितलें. तेव्हां त्या दप्तरांतले कागद चाळतां चाळतां सुमारें ५०।७५ पृष्ठांची एक लहानशी वही मला सांपडली व पाहतों तों तींत श्रीमत्कृष्णदयार्णव, गोपाळनाथ मळगांवकर, उद्धवचिद्घन वगैरे कवींची कविता ! या वहींत कृष्णदयार्णवांचीं सुमारें १५।२० अप्रसिद्ध पद्यें मला सांपडलीं ! तेव्हां मला जो आनंद झाला त्याच्या भरांत ती वही डोक्यावर घेऊन मी एक दोन गिरक्या केव्हां मारल्या व शेजारचीं पोरें कां हांसलीं हें त्या वेळीं माझ्या लक्ष्यांतही आलें नाहीं. कोठें गोदाकांठचें पैठण आणि कोठें दक्षिणकोंकणांतलें समुद्रकांठचें आजगांव ! आणि पैठणच्या कवीची कविता आजगांवीं माझ्या घराशेजारीं एका शेतकऱ्याच्या घरांत सांपडते ! तेव्हां, 'सत्य संकल्पाचा दाता भगवान,सर्व करी पूर्ण मनोरथ,' हें संतवचन खोटें आहे काय ? दुसरी गोष्ट पुण्यांतली. तेथें मी ज्योतिबुवा महाभागवतांच्या कवितेचा तपास करीत होतों; त्यांचे कांहीं फुटकळ अभंग मला मिळाले होते, परंतु त्यांच्या भागवताचा पत्ता लागेना. शेवटीं एके दिवशीं सहज जुन्या बाजारांत फिरत असतां एका बोहऱ्यापाशीं ज्योतिबुवांच्या भागवताचे हस्तलिखित दोन अध्याय अकस्मात् सांपडले ! अशीं आणखीं किती तरी उदाहरणें देतां येतील. असो.

आतां प्रस्तुत भागांतील कविचरित्रें लिहितांना ज्या सद्गृहस्थांच्या लेखांचा व माहितीचा उपयोग झाला त्यांचे आभार मानण्याचें आनंददायक कार्य करून ही प्रस्तावना संपवूं.

१ **रामीरामदास**—यांचें चरित्र धुळें येथील विद्वान् रामदासी रा. शंकर श्रीकृष्ण देव बी. ए. एल्. एल्. बी. यांनीं "**रामीरामदासांची कविता**" या ग्रंथाच्या आरंभीं दिलेल्या एतद्विषयक लेखाच्या आधारानें—बहुतेक त्यांच्याच शब्दांत—लिहिलें आहे.

२ हरिनारायण-या कवीचो चरित्रविषयक माहिती रा. अ. बा. रसाळ यांनीं पाठविली. सदर कवीचा नामामृतलहरी हा ग्रंथ व कांहीं पद्यें रा. शंकर श्रीधर धनेश्वर यांनीं पाठविलीं.

३ गिरिधर-या कवीच्या ' समर्थप्रताप ' ग्रंथारंभीं रा. देव यांनीं जो विस्तृत लेख दिला आहे, त्या लेखाच्या आधारानें-बहुतेक त्यांच्याच शब्दांचा उपयोग करून-प्रस्तुत भागांतील सदर कवीवरील निबंध लिहिला आहे.

४ तुकाब्रह्मानंद-या कवीची माहिती व त्याच्या कवितेंतील वेंचे, पुणें येथील वे. शा. सं. बाळशास्त्री रावजी शास्त्री क्षीरसागर यांनीं पाठविले.

५ लिंगनाथ योगी-या कवीचा ' अमृतसार ' ग्रंथ रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर बी. ए. यांनीं दिला.

६ ज्योतिपंत महाभागवत-' सखाराम' यांनीं लिहिलेला श्रीस्वयंज्योतिकथामृत ग्रंथ व रा. पांडुरंग महादेव बाके यांचा ' इंदुप्रकाश' पत्रांतील लेख.

७ चिदंबरदास राजाराम-ता. ८ फेब्रुवारी १९१२ चा मुमुक्षूचा अंक व कवीचे ग्रंथ.

८ दयाळनाथ-' दयाळनाथांची कविता' या ग्रंथांत वैदर्भविद्वन्मणि रा. अच्युत सीताराम साठे एम्. ए. बी. एल्. यांनीं सदर कवोचें सुरस चरित्र दिलें आहे त्याचाच अल्पस्वल्प फेरफारानें प्रस्तुत ग्रंथांत पुनरुद्धार केला आहे.

९ नाथ भुजंग-कै. विष्णु आप्पाजी कुळकर्णी यांनीं ' प्रभात ' मासिकांत प्रसिद्ध केलेला एतद्विषयक लेख.

१० निरंजन बुवा-काव्यसंग्रहांतील एतद्विषयक माहिती.

११ नारायणबोवा जालवणकर-' मुमुक्षु' पत्रांतील लेख.

१२ मौनीस्वामी--कवीचे नातू वे. शा. सं. श्रीधरशास्त्री सिन्नरकर यांनीं दिलेली माहिती.

१३ चूडामणिसुत-नांदेड येथील सद्गृहस्थ रा. गणपत अनंत सराफ कंधारकर यांनीं दिलेली माहिती.

**१४ जयरामनाना**-रा. गणेश नरहरि बुवा यांचा मुमुक्षूंतील लेख.

**१५ वामन नानाजी देशपांडे**-कवीचे चिरंजीव वे. शा. सं. श्रीधरशास्त्री सिन्नरकर यांनीं दिलेली माहिती.

या सर्व गृहस्थांचा मी अत्यंत आभारी आहें. शेवटीं--

आपुलिया बळें नाहीं मी बोलत । सखा भगवंत वाचा त्याची ॥
साळुंकी ते कैशी बोले मंजुळ वाणी । शिकविता धणी वेगळाची ॥
काय म्यां पामरें बोलावीं उत्तरें । परि त्या विश्वंभरें बोलविलें ॥
**तुका** म्हणे त्याची कोण जाणे कळा । वागवी पांगुळा पायांवीण ॥

या प्रासादिक अभंगानें ही प्रस्तावना पूर्ण करितों.

मुंबई
३०मार्च १९२०

**ज. र. आजगांवकर.**

# महाराष्ट्र कविचरित्र.

## भाग ५ वा.

### रामीरामदास.

श्रीसमर्थ रामदासस्वामी यांचे ज्येष्ठ बंधु गंगाधर हे रामदास संप्रदायांत जरी " **श्रेष्ठ** " या नांवानें प्रसिद्ध आहेत, तरी सर्वसामान्य लोक त्यांना ' **रामीरामदास** ' या नांवानेंच ओळखतात व स्वतः श्रेष्ठांनींही आपल्या कवितेंत ' रामीरामदास ' असाच स्वनामोल्लेख केला आहे. मात्र येथें एक गोष्ट आरंभींच सांगितली पाहिजे ती ही कीं, रामदासस्वामींची जी कविता आजवर प्रसिद्ध झाली आहे, तींत " रामीरामदास " या नांवाचा निर्देश बऱ्याच ठिकाणीं आढळतो व त्यामुळें या फुटकळ कवितेंत श्रेष्ठ व समर्थ या दोन्ही बंधूंची रचना समाविष्ट झालेली असण्याचा बराच संभव आहे. मोठ्या ग्रंथांसंबंधानें मात्र अशा प्रकारचा घोटाळा मुळींच नाहीं, ही त्यांतल्या त्यांत समाधानाची गोष्ट होय; कारण समर्थांचा दासबोध व श्रेष्ठांचें भक्तिरहस्य यांच्या रचनाशैलींची भिन्नता इतकी स्पष्ट आहे कीं, सकृद्दर्शनीच, या दोन ग्रंथांचे कर्ते निरनिराळे दोन पुरुष असले पाहिजेत ही गोष्ट वाचकाच्या लक्षांत आल्याशिवाय रहात नाहीं.

श्रीसमर्थ रामदासस्वामीसंबंधानें आजवर जितकी माहिती उपलब्ध झाली आहे, तिच्या मानानें श्रेष्ठांविषयींची उपलब्ध माहिती अगदींच अल्प आहे. रामदासी संप्रदायांतील सात आठ लेखकांनीं समर्थांचीं निरनिराळीं लहानमोठीं चरित्रें लिहिलीं आहेत, पण रामीरामदासांचें एकही जुनें चरित्र अद्याप उपलब्ध झालेलें नाहीं; आणि याचें कारण उघडच आहे. श्रीसमर्थ हे रामदासी संप्रदायाचे आद्यप्रवर्तक असल्यामुळें त्या संप्रदायांतील लोकांची त्यांच्याविषयीं जितकी उत्कट पूज्यबुद्धि असणें साहजिक आहे, तितकी इतरांविषयीं असणें शक्य नाहीं. तुकारामबुवांचे बंधु कान्होबा ( तुकयाबंधु ) हेही मोठे प्रेमळ संत होते व त्यांचीही थोडीशी उत्कृष्ट कविता उपलब्ध आहे, परंतु तुकारामबुवांइतकी त्यांची प्रसिद्धि झाली नाहीं. तात्पर्य, प्रसिद्धि ही विशिष्ट व्यक्तीच्या कर्तबगारीवर अवलंबून आहे. असो.

श्रीसमर्थ रामदासस्वामींचे ज्येष्ठ बंधु हें नातें बाजूस ठेवून, अगदीं स्वतंत्र दृष्टीनें पाहिलें तरी रामीरामदास यांची योग्यता, सत्पुरुष व ग्रंथकार या नात्यानें पुष्कळच मोठी आहे, हें त्यांचे ग्रंथ वरवर चाळून पाहिल्यानेंही लक्षांत येण्यासारखें आहे. " श्रीरामीरामदासांची कविता " या नांवाचा सुमारें ५०० पृष्ठांचा ग्रंथ धुळें येथील ' सत्कार्योत्तेजक सभे'नें प्रसिद्ध केला आहे, त्यांत रामीरामदासांची बहुतेक सगळी उपलब्ध कविता समाविष्ट झाली असून, तिच्या आरंभीं, सदर सभेचे प्रेमळ व उत्साही कार्यकर्ते रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं ' श्रीश्रेष्ठांचें चरित्र ' व ' श्रीश्रेष्ठांची कविता ' असे दोन सुंदर व महत्त्वाचे निबंध जोडले आहेत, त्यांचा यथेच्छ उपयोग करून, प्रस्तुतचा अल्प चरित्रलेख मी लिहीत आहें. या विष-

याची अधिक विस्तृत माहिती ज्यांस हवी असेल त्यांनीं रा. देव यांचे उपरिनिर्दिष्ट दोन निबंधच वाचले पाहिजेत, हें सांगावयास नकोच.

श्रीश्रेष्ठ व श्रीसमर्थ यांच्या घराण्याचे मूळ पुरुष कृष्णाजीपंत, गोत्र जमदग्नि, सूत्र आश्वलायन, आडनांव ठोसर. हे प्रथम बेदर प्रांतीं रहात होते. राज्यक्रांति व दुष्काळ यांनीं पीडित झालेले तत्प्रांथस्थ कांहीं गृहस्थ गोदातीरीं आले, त्यांत कृष्णाजीपंतही शके ८८४ त सहकुटुंब येऊन गोदेच्या दक्षिण तीरास हिंवरें नामक गांवीं पहिल्यानें राहिले. " त्यांना पांच पुत्र होते, त्यांपैकीं चौघांनीं एकंदर ४८ गांवीं कुळकर्ण व जोशीपणाची वृत्ति संपादन केली. पांचवे पुत्र दशरथ यांनीं हिंवऱ्यापासून तीन कोसांवर गंगेच्या उत्तरेस पडपांढर पडली होती तेथें नवीन गांव वसविला. त्या पांढरीचें पूर्वीचें नांव वडगांव होतें. दशरथपंतांनीं वसाहत केल्यावर त्या गांवाचें नांव जांब असें ठेविलें. जांबेसुद्धां नवीनच बारा गांवांची वृत्ति त्यांनीं मिळविली. त्यांच्यापासून एकविसावे पुरुष सूर्याजीपंत, हेच श्रेष्ठ आणि समर्थ यांचे वडील होत. या घराण्यांतील बावीस पिढयांच्या पूर्वजांनीं श्रीराम आणि सूर्य यांची उपासना केली होती अशी आख्यायिका आहे. या उपासनावृक्षाला सूर्याजीपंत व राणूबाई यांच्या पोटीं गंगाधर व नारायण अशीं दोन फळें आलीं. त्यांनीं आपल्या पूर्वजांचाच नव्हे, तर अखिल महाराष्ट्राचा कसा उद्धार केला व आपल्या घराण्याचें नांव महाराष्ट्राच्या धार्मिक, राजकीय व वाङ्मयेतिहासांत कसें अजरामर करून ठेविलें, तो कथाभाग, थोडया फार प्रमाणांत, बहुतेक महाराष्ट्रीयांस श्रुत आहेच."

गंगाधर ऊर्फ श्रेष्ठ ऊर्फ रामीरामदास हे सूर्याचे व समर्थ रामदासस्वामी हे मारुतीचे अंशावतार होत, अशी सर्व भाविकांची समजूत आहे; आणि संतचरित्रकार महिपति यांनीं आपल्या संतविजयाच्या पहिल्या अध्यायांत सूर्याजीपंतांच्या ज्या दीर्घ आणि कडक तपश्चर्येचें वर्णन केलें आहे,तसली तपश्चर्या करणाराच्या पोटीं असलीं तेजस्वी नररत्नें निर्माण होऊन, अवतारी पुरुषांच्या पंक्तींत लोकांनी त्यांस बसवावें, यांत आश्चर्य करण्यासारखें कांहीं नाहीं.

महिपती म्हणतातः––

“ प्रातःकाळीं करोनि स्नान । वासरमणीसी अर्घ्यदान।
आरक्त सुमनें रक्तचंदन । यथाविधीनें मंत्रोक्त ॥
आदित्यहृदय स्तोत्रपठण । नित्य करीत पारायण ।
अखंड वासरमणीचें ध्यान । निजप्रीतीनें अंतरीं ॥
इतुकें करोनि साचार । घालित सहस्र नमस्कार ।
तेणें तेजाची शक्ति फार । यास्तव अंतर पडेना ॥
बारा सहस्र जप नित्य । करित असे एकाग्रचित्त ।
बारा वर्षें लोटतां सत्य । साक्षात् आदित्य भेटला ॥ ”

तेव्हां सूर्याजीपंतानीं भगवान् सहस्त्ररश्मीपाशीं कोणतें वरप्रदान मागितलें ? त्यांनीं कांहींच मागितलें नाहीं, पण “ राणूबाईच्या इच्छेस्तव, तुम्हास दोन भगवद्भक्त पुत्र होतील ” असा सूर्यनारायणानें त्यांस आशीर्वाद दिला. त्याप्रमाणें शके १५२७ विश्वावसु संवत्सरीं मार्गशीर्ष वद्य त्रयोदशी दिवशीं गंगाधरांचा व शके १५३० कीलक नाम संवत्सरीं चैत्र शुद्ध नवमीस बरोबर श्रीरामजन्मकाळीं नारायणाचा जन्म झाला.

“ उभयतां पुत्रांना घेऊन राणूबाई श्रीएकनाथ महाराजांच्या दर्शनास पैठणास गेल्या असतां, आमच्या हातून घडावयाचें कार्य

राहिलें तें हे तुमचे पुत्र सिद्धीस नेतील, असें म्हणून नाथमहाराजांनीं शके १५३१ सौम्यनाम संवत्सरीं फाल्गुन वद्य ६ स आपला अवतार समाप्त केला " इत्यादि हकीकत हनुमंतस्वामीकृत समर्थांच्या बखरींत दिली आहे; परंतु हा भेटीचा प्रसंग यथार्थ नसावा असें वाटतें. कारण नाथनिर्याणकालविषयक दोन श्लोक पैठण येथील नाथांचे वंशज नानाबुवा यांच्या दप्तरांत सांपडले त्यांवरून व नाथांच्या समाधीवर असलेलीं अक्षरें सदर श्लोकांच्या अनुरोधानें वाचलीं असतां, नाथांचा समाधिशक १५२१ येतो. वरील दोन श्लोक, प्रसिद्ध 'हरिवरदा—' कर्ते श्रीमत्कृष्णदयार्णव यांनीं रचिलेले आहेत असें म्हणतात व ते पैठणांत सर्वतोमुखीं आहेत. शिवाय रा. पांगारकर यांनीं आपल्या एकनाथचरित्रांत अनेक पुराव्यांच्या आधारानें, शके १५२१ विकारी नाम संवत्सर, हाच नाथांचा समाधिकाल दिला आहे. तेव्हां आतां या प्रश्नासंबंधानें अतःपर वादाचें कारण राहिलें नाहीं. तात्पर्य, एकनाथ महाराज समाधिस्थ झाल्यावर श्रेष्ठ व समर्थ हे अनुक्रमें सहा व नऊ वर्षांनीं जन्म पावले. नाथांचे नातु प्रसिद्ध कवि मुक्तेश्वर हे मात्र या बंधुद्वयाचे समकालीन होते.

" गंगाधर आणि नारायण यांचें शिक्षण सूर्याजीपंतांसारख्या आचारविचारसंपन्न पुरुषाच्या देखरेखीखालीं कोणत्या प्रकारें झालें असेल, याची कल्पना करणें फारसें कठीण नाहीं. गंगाधराचा विवाह त्याच्या वयाचे सातव्या वर्षीं झाला. त्यांस आंबडकर देशमुखांची कन्या दिली होती. हें देशमुखांचें घराणें अजून आंबडास प्रसिद्ध आहे. श्रेष्ठांच्या प्रपंचाची ही बाजू झाली. त्यांना परमार्थाचा लाभ कसा झाला हें आतां पाहूं. "

श्रेष्ठ व समर्थ यांस प्रत्यक्ष श्रीरामाचा अनुग्रह झाला होता असें तत्कालीन जुन्या सांप्रदायिक ग्रंथांवरून दिसतें. ' भक्तिरहस्य ' ग्रंथाच्या नमनांत श्रेष्ठ म्हणतातः—

तो मद्गुरु जगद्गुरु समर्थ । भावेंचि भेटला श्रीरघुनाथ ।
मस्तकीं ठेऊनि पद्महस्त । स्वस्वरूप प्रकाशिलें ॥

तिसगांव मठपति दिनकर गोसावी रामदासी यांनीं शके १६१६ त लिहिलेल्या " स्वानुभवदिनकर " नामक ग्रंथाच्या सोळाव्या कलापांत, एतद्विषयक जो कथाभाग आला आहे तो येणेंप्रमाणें:— " गोदावरीच्या उत्तर तीरीं असलेल्या जांबगांवचे कुलकर्णी ( सूर्याजीपंत ) हे एके दिवशीं गोदेवर स्नानास गेले असतां, मागें असें वर्तमान घडलें कीं, दूतवेषानें एक वानरगण त्यांच्या घरीं आला व नारायणास ( समर्थांस ) घेऊन गांवाच्या बाह्यप्रदेशीं गेला. त्या वेळीं नारायणाचें वय ११ वर्षाचें होतें. वानराच्या खांद्यावर बसून जात असतां नारायण फार भयभीत होऊन पाहतो तों पुढील चमत्कार त्याच्या दृष्टीस पडला.

" मेघश्यामरूप क्षत्रीवेषे । सिबीकेमाजी बैसलीं स्त्रीपुरुषें ।
सभंवते निजगण यथासंतोषें । उभे असती दोहीं भागीं ॥"

वानरानें नारायणास त्या श्यामवर्ण जोडप्यापुढें नेऊन उभें केलें, व "तुझा पिता कोठें आहे ?" असा प्रश्न ' रजपुती ' भाषेंत त्यास विचारण्यांत आला. त्या मंडळीचा वेषही रजपुती थाटाचाच होता. नारायणानें आपल्या पित्याचा वृत्तांत सांगितला तेव्हां प्रभूनें ( तो श्यामवर्ण पुरुष श्रीरामचंद्रच होता ) त्यास जवळ बोलाविलें व त्याचें मस्तक कुरवाळून त्याच्या हातीं एक पत्र दिलें. तें राममुद्रांकित पत्र

हातीं पडतांच तत्क्षणीं नारायणाची वृत्ति पालटली ! त्यांच्या अंगास थरथर कंप सुटला व तोंडांतून एक शब्दही बाहेर पडेना.

" वाचा जातसे बेंबळपणें । हांसे रडे नाचे गत्राणें ।
शब्द बोलवेना निर्बळपणें । उगाचि टकमकां पाहतसे ॥
आंग कांपतसे थरथरां । विस्मयें दाटलासे सैरा ।
घामेजोनि अतिघाबिरा । रडे पडे आक्रंदे ॥
क्षणें हांसे क्षणें रडे । उडया मारी क्षणें पडे ।
इतुकियामाजी निजनिवाडें । कौतुक देखे निजदृष्टीं ॥
तंव मूर्ति देखिली घवघवीत । मेघश्याम प्रभा लखलखीत ।
वामांकीं जानकी शोभत । पाठीसीं सौमित्र भरत ॥
तया सेजीं उभा शत्रुघ्न । पुढें उभा वीर हनुमान ।
अकस्मात वांहाटुळी येऊन । इतुकें देखे तत्काळीं ॥
ऐसें देखेना जंव अकस्मात । तंव श्रीरामें मस्तकीं ठेऊनि कृपाहस्त ।
महावाक्य उपदेशूनि त्वरित । हनुमंतासी निरविलें ॥
ते समयीं दिग्मंडळ दणाणिलें । तेणें नारायणाचे सर्वांग थरारिलें ।
म्हणे काय ब्रह्मांड कोसळलें । मजवरी ये काळीं ॥
म्हणोनी थरथरां असे कांपत । तेणें दांतखिळी बैसों पहात ।
सभंवतें टकमकां अवलोकित । तंव धुधुकार देखिला ॥
इतुकियामाजी अकस्मात । विज्जुसारखें लखलखीत ।
निजांगीं दिव्य वस्त्र वेष्टीत । सीतनिवारणार्थ ॥
वस्त्र रंगाथिलें अति मनोहर । आरक्त शोभामंडित सुंदर ।
हुर्मुजीसारिखें सपरिकर । दिव्य तेजें विलसे ॥
सव्य करीं पत्र राममुद्रांकित । वाम करीं अर्धचंद्रबाण राम देत ।
इतुकियामाजी तत्काळ जाली गुप्त । राममूर्ति निजांगें ॥
इतुकें जंव क्षणमात्रें हों न सरे । तंव नारायणासी पडलें अंधारें ।
वाचा स्तब्ध होऊनि एक संवत्सरें । निजसमाधीं तटस्थ ॥ "

गांवाबाहेर इतका प्रकार घडल्यावर, इकडे नारायणाचे वडील सूर्याजीपंत व ज्येष्ठ बंधु गंगाधर घरीं आले तेव्हां, वानरानें नाराय-

णास नेल्याचें वर्तमान त्यांस समजलें. तें ऐकतांच ते भयभीत होत्साते नारायणाच्या शोधार्थ गांवाबाहेर चालले, तों ब्रह्मारण्यांत नारायण एकटाच त्यांच्या दृष्टीस पडला. तो प्रश्नाचीं उत्तरें देत नाहीं व कांहीं बोलतचालत नाहीं हें पाहून त्यांस आश्चर्य वाटलें. इतक्यांत कांहीं ग्रामस्थ लोकही त्या ठिकाणीं आले. नारायणाची मूकवृत्ति पाहून त्यांतील कांहीं लोकांनीं असा तर्क केला कीं, यास भूतबाधा झाली असली पाहिजे.

" कोणी ह्मणती ब्रह्मराक्षस । कां लागली झोटिंगाची टापस ।
कोणी म्हणती अहो यास । मुंज्या लागला निश्चयेंसी ।। "

अशा प्रकारें निरानिराळे लोक निरनिराळे तर्क करूं लागले; व पंचाक्षरी आणवून भूत काढण्याचे उपाय करण्याचीही कांहीं लोकांनीं सूचना केली ! त्याप्रमाणें अनेक उपाय केले, परंतु समर्थांच्या मनःस्थितींत किंवा बाह्य वर्तनांत कांहीं पालट झाला नाहीं. मग मंडळीनें त्यांना त्यांच्या घरीं उचलून आणलें. तेथें,

तंव तें वस्त्र देखिलें अकस्मात । अर्धचंद्र आणि पत्र ॥
त्यावरी सकळ लोकांसी आज्ञा दिधली । पितयानें मूठ उकलूनि पाहिली ।
तंव पत्रावरी मुद्रा देखिली । श्रीराममनामांकित ॥

हा श्रीसमर्थांस झालेल्या श्रीरामदर्शनाचा वृत्तांत वाचून वाचक म्हणतील कीं, श्रेष्ठांच्या चरित्राशीं या गोष्टीचा काय संबंध ? तर याचें उत्तर असें आहे:--

पुढें पत्रार्थासी जंव वाचिती । तंव दोघांसही समाधि अवचिती ॥
प्राप्त होऊनि तटस्थ होती । स्वानुभवसुखें ॥
पिता निजसमाधिसुख लाधोनि । देह ठेऊनियां तत्क्षणीं ।
साम्राज्यपद सुखासनीं । निज वैकुंठीं वास्तव्य ॥

ज्येष्ठ बंधु जो कां गंगाधर । त्यासी पत्र वाचितां समाधि साचार ।
तेणेंहि लेखणी वाहोनि रघुवीर । प्रसन्न केला निजभावें. ॥

याप्रमाणें श्रीसमर्थांस ज्या दिवशीं श्रीरामदर्शन होऊन भगवंताचा अनुग्रह झाला, त्याच दिवशीं समर्थांस मिळालेलें राममुद्रांकित पत्र वाचून सूर्याजीपंतांचें निर्याण झालें व श्रेष्ठांस समाधिसुखानुभव येऊन त्यांनी आपली लेखणी रघुवीरचरणीं वाहिली. श्रीसमर्थांस मिळालेल्या या श्रीरामनामांकित पत्राचें पुढें काय झालें, हें समजलें नाहीं. हें पत्र चांफळच्या मठांत असतें तर रा. देव यांनीं त्याचा उद्धार खात्रीनें केला असता. अर्थात् तें आतां उपलब्ध होण्याचा संभव मुळींच नाहीं, हें उघड आहे.

वरील अनुग्रहाची हकीकत, श्रीएकनाथादि इतर संतांस झालेल्या देवदर्शनाच्या हकीकतीशीं पुष्कळच जुळते. श्रीएकनाथ महाराजांस श्रीगुरुदत्तात्रेयांनीं यवनवेषानें दर्शन दिलें होतें, ही आख्यायिका प्रसिद्धच आहे. वरील वृत्तांताविषयीं लिहितांनां रा. देव म्हणतात, "ज्याची जशी बुद्धि असेल, त्याप्रमाणें तो या उताऱ्याचा अर्थ करील. ऐतिहासिक दृष्टीनें अथवा परमार्थदृष्टीनें अथवा सांप्रदायाच्या दृष्टीनें, कोणत्याही दृष्टीनें या उताऱ्याचा विचार केला तरी तो क्षणोक्षणीं वाचावा असें वाटणार नाहीं, असा वाचक विरळा ! हा उतारा मोठा आहे पण तो महत्वाचा आहे. त्यावरून पुष्कळ गोष्टींचा निःशंकपणें निर्णय करण्यास हरकत नाहीं." आणि रा. देव यांनीं हा निर्णय वरील उताऱ्यांतील सर्व गोष्टी विश्वसनीय आहेत असें मानून केला आहे. अर्थात् हा श्रद्धेचा विषय असल्यामुळें, तो मानणें न

मानणें हें ज्याच्या त्याच्या भावनेवर अवलंबून आहे. मला मात्र यांत कांहींच अशक्य दिसत नाहीं.

प्रस्तुत ग्रंथांत गिरिधर रामदासी यांचें चरित्र दिलें आहे, त्यांत श्रीसमर्थप्रताप ग्रंथाचा उल्लेख आहे. सदर ग्रंथांत गिरिधर म्हणतातः—

समर्थांचें भविष्यअवतारमहिम्न । ग्रामाधिपतिरूपें श्रीरघुवीरें जाण ।
गंगाधरपंतांकरवीं लेहून । रात्रीं वटवृक्षातळीं दिधलें ॥
गंगाधर स्वामी तीन दिवस समाधिस्थ राहे ।
समर्थचरित्रपत्रें हस्तीं घेऊनियां ॥

पुढें श्रेष्ठ समर्थांच्या लग्नाच्या उद्योगास लागले, परंतु समर्थांनी आयत्या वेळीं कसा ‘ दगा दिला ’ व पलायन केलें हें सर्वांस ठाऊकच आहे. पंत ह्मणतातः—

“ द्विज सावधान ऐसें सर्वत्र विवाहमंगलीं म्हणती ।
तें एक रामदासें आयकिलें त्या असो सदा प्रणति ।। ”

समर्थांची प्रपंचपराङ्मुखता पाहून

गृहस्थाश्रमी ऐशा मूर्ति । निर्माण होती पुण्यकीर्ति ।
पुत्रपौत्राभिवृद्धि सत्कीर्ति । गंगाधर स्वामी विस्तारीजे तुम्ही ॥

असें म्हणून आप्तेष्टांनीं श्रेष्ठांचें सांत्वन केलें. रा. देव म्हणतात:-“ येथवर श्रीश्रेष्ठांचें चरित्र थोडें फार तरी सांगतां आलें, परंतु यापुढचें त्यांचें चरित्र लिहिण्यास मुळींच साधन नाहीं म्हटलें तरी चालेल. नाहीं म्हणायाला शके १५६६ चे सुमारास एकदां व शके १५७६ चे सुमारास दुसऱ्यांदा श्रीसमर्थ जांबेस आले होते, त्या वेळचा थोडासा वृत्तांत व एक दोन वेळां उभयतां बंधूंचा जो पत्रव्यवहार झाला तो, इतकाच माहिती या पन्नास वर्षांतील देतां येण्यासारखी आहे. श्रेष्ठांनीं **भक्तिरहस्य** ग्रंथ शके १५९० त लिहिला.”

" पुरश्चरण व तीर्थयात्रा संपवून श्रीसमर्थ शके १५६६ चे सुमारास जांबेस आले. हा " भिक्षा घेऊन जाणारा गोसावी नव्हे, " हे समर्थांचे शब्द चोवीस वर्षांनीं कानीं पडतांच, "कोण, माझा नारोबा आला कीं काय ?" असा आतुरतेचा प्रश्न राणूबाईनीं करितांच "होय आई, हा मीच आलों," असें म्हणून समर्थांनीं आईच्या पायांवर मस्तक ठेविलें. असा प्रकार इकडे चालू असतां, श्रेष्ठ घरांत संध्या करीत होते, त्यांस समजलें कीं, नारायण बाहेर आला आहे. समर्थांनीं श्रेष्ठांच्या चरणीं मस्तक ठेविलें व श्रेष्ठानीं त्यांना उचलून पोटाशीं धरिलें. त्या भेटीला उपमा श्रीराम आणि भरत यांच्याच भेटीची होय."

" यानंतर पुनः एकदां श्रीसमर्थ शके १५७६ चे सुमारास जांबेस आले होते असा उल्लेख स्वानुभवदिनकरांत सांपडतो व त्यास समर्थप्रतापांत पुष्टि मिळते. याही भेटीच्या वेळीं मातुःश्री होत्या. राणूबाईनीं देह ठेवल्याची मिति हनुमंतस्वामीनीं दिली आहे ती शके १५७७ ची ज्येष्ठ शुद्ध ३ होय. श्रीसमर्थांकडून श्रेष्ठांस आलेल्यां पत्रांपैकीं दोन पत्रें हनुमंतस्वामीनीं बखरींत दिलेलीं आहेत; त्यांवरून समर्थ श्रेष्ठांस किती मान देत असत हें स्पष्ट होत असल्यामुळें तीं येथें देणें अवश्य आहे:—

## पहिलें पत्र ( ओव्या. )

सकळ तीर्थांचें माहेर । सकळ गुणांचें भांडार ।
सकळ विद्येचा सागर । स्वरूप तुमचें ॥ १ ॥
तूं धीरपणें मेरू । तूं उदारपणें जळधरू ।
तूं गंभीरपणें सागरू । पीयुषाचा ॥ २ ॥

तूं पवित्रपणें वैश्वानरु । तूं समर्थपणें ईश्वरू ।
तूं प्रतापाचा दिनकरु । धगधगायमान ॥ ३ ॥
तूं सकळ तीर्थांचें यश । तूं उंच आकाश ।
तूं मायेचा मूळ पुरुष । सकळकर्ता ॥ ४ ॥
तूं विष्णूचें मूळस्थान । तूं योगियांचें ध्यान ।
तूं वेदशास्त्रांचें मथन । सार वेदांताचें ॥ ५ ॥
तूं सकळ सत्याचा साक्षी । अनंत माया तुझे कुक्षी ।
तुमचें निजरूप लक्षी । ऐसा कवणु ॥ ६ ॥
झुंज वायूसी आकळावें । गगन वोलांडूनि जावें ।
महातेजासी आच्छादावें । कवणे परी ॥ ७ ॥
सप्तपाताळा तळवटीं । एकवीस स्वर्गांचे शेवटीं ।
पवाडा करीन ऐसी पोटीं । हांव कैंची ॥ ८ ॥
वसुंधरा ही एकसरी । घालोनियां मस्तकावरी ।
अंतरिक्ष गमन करी । ऐसा कवणु असे ॥ ९ ॥
आवर्णोदकाचा अंत । कैसा घ्यावा तो अद्भुत ।
तुमचे स्वरूपाचा निश्चितार्थ । कवण करी ॥ १० ॥

## दुसरें पत्र.

सकळ तीर्थांचें सार । सत्यस्वरूप निर्विकार ।
तुमचें चित्त तदाकार । निरंतर ॥ १ ॥
विमळ ब्रह्मपरायण । सगुण भक्तिसंरक्षण ।
विशेष वैराग्यलक्षण । तुमचे ठायीं ॥ २ ॥
मुक्त क्रियेचा अनादरू । स्वधर्मकर्मीं अत्यादरू ।
आग्रह निग्रहाचा विचारु । तोही नसे ॥ ३ ॥
नसे कामनेचा लेश । जयत्या पदाचा हव्यास ।
अंतरीं आवडे विशेष । हरिकथानिरूपण ॥ ४ ॥
तुमचे देह सार्थकाचे । सर्वदा परोपकाराचे ।
भगवंतें निर्मिले बहुतांचें । समाधान ॥ ५ ॥
तमचेचि वाग्विलासें । बहु पाखंड नासे ।

संशयातीत प्रकाशे । विमळ वस्तु ॥ ६ ॥
सन्मार्गीचा कैपक्षी । अनमार्ग करणें अलक्षी ।
लोक पावती प्रत्यक्ष । समाधान ॥ ७ ॥
दक्षता आणि चातुर्यता । वित्पन्नता आणि लीनता ।
उत्तम गुण सर्वज्ञता । तुमचे ठायीं ॥ ८ ॥
तुमचें स्वरूप वर्णवेना । ह्मणोनि देहाची वर्णना ।
युक्त अयुक्त मित्रजना । क्षमा केली पाहिजे ॥ ९ ॥

जाडया अक्षरांत दिलेल्या वरील चौथ्या ओवींत श्रेष्ठांच्या परमार्थ-मार्गाचें " जयंत्या पर्वांचा हव्यास " इत्यादि जें वर्णन समर्थांनीं केलें आहे, त्याची यथार्थता श्रेष्ठांचा ' **भक्तिरहस्य** ' ग्रंथ पाहिला असतां कोणाच्याही निदर्शनास येईल. सदर ग्रंथांत हरिनाममाहात्म्य आणि व्रतोद्यापनें यांवरच श्रेष्ठांनीं विशेष भर दिलेला स्पष्ट दिसतो.

श्रेष्ठानींही कांहीं मुमुक्षु जनावर अनुग्रह केला होता असें दिसतें. मुंजे उपनांवाच्या एका शिष्याचा उल्लेख हनुमंत स्वामीच्या बखरींत आला आहे. दक्षिणगीर गोसावी नामक त्यांचे एक दुसरे शिष्य होते. कोणी म्हणतात हे त्यांचे प्रशिष्य होते. त्यांचा मठ जांबेस आहे. त्यांच्या विलक्षण भूतदयेसंबंधानें एक आख्यायिका रा. देव यांनीं दिली आहे, ती जिज्ञासूंनीं त्यांच्या लेखांत पहावी.

शके १५९९ च्या फाल्गुन वद्य १४ स श्रेष्ठांनीं दहिफळ येथें आपला देह ठेविला. त्यांच्या कुटुंबानें पतिसमागमें परलोकास जावें असा निश्चय करून, अमावास्येचे दिवशीं दीर्घ स्वरानें " राम " असा उच्चार करून देहाचें विसर्जन केलें! दहिफळ येथें गांवाचे बाहेर अर्ध्या कोसावर खंदारे पाटलांच्या एका शेतांत श्रेष्ठांचें वृंदावन आहे. या वृंदा-वनास मोंगलाईतून ८० रु. वर्षासन आहे. पुजारी पूजा करीत असतात.

रामचंद्रबावा व श्यामजीबावा असे श्रेष्ठांना दोन पुत्र होते. ते या वेळीं लहान होते. श्रेष्ठांच्या अवतारसमाप्तीचें वृत्त कळतांच समर्थांनीं उद्धव गोसावी यांस जांबेस पाठविलें. त्यांजबरोबर उभयतां चिरंजीवांकरितां उपदेशपर दहा श्लोक त्यांनीं दिले होते, त्यांचा समावेश श्रीसमर्थांच्या चरित्रलेखांत करूं.

श्रीसमर्थ रामदासस्वामी यांनीं शके १६०३ मध्यें समाधि घेतल्यानंतर कांहीं दिवसांनीं, दासनवमीच्या उत्सवासंबंधानें शिष्यमंडळींत ईर्ष्येमुळें मतभेद उत्पन्न झाला. कल्याणस्वामींनीं मध्यस्थी केली. मग सर्वांनीं विचार करून, परंपरा पुढें चालविण्यासाठीं श्रेष्ठांच्या चिरंजीवांस जांबेहून आणावें असें ठरविलें. परंतु, त्यानंतरचा कांहीं काळ महाराष्ट्रांत धामधुमीचा गेल्यामुळें तो विचार लांबणीवर पडला. मध्यंतरीं आधीं शामजी व नंतर रामजी यांनीं अवतार संपविले. जांबेस आणि गडावर श्रीचे साक्षात्कार झाले, तेव्हां जांबेस जाऊन समर्थांच्या महंतांनीं श्रेष्ठांचे नातू म्हणजे रामजीबुवांचे चिरंजीव गंगाधर स्वामी यांस विज्ञप्ति केली. त्यावरून ते शके १६३२ च्या श्रावण शुद्ध पंचमीस सज्जनगडीं येऊन दाखल झाले. या सर्व हकीकतीस कागदपत्रांचा भरपूर आधार रा. देव यांजपाशीं आहे. असो. अशा रीतीनें श्रेष्ठाचे नातू गंगाधर स्वामी ऊर्फ बापास्वामी यांचें आगमन चाफळ व सज्जनगड इकडे झालें. श्रीछत्रपति शाहूमहाराज व सर्व महंत मंडळी यांना आनंद झाला व तेव्हांपासून आजतागाईत श्रेष्ठ व समर्थ यांचें पारमार्थिक साम्राज्य परंपरेनें सुरू झालें. चांफळ येथील मठाला उत्पन्न चांगलें आहे. गादीचा अधिकार कसा चालत आला आहे, हें पुढील वंशावळीवरून ध्यानांत येईलः—




श्रेष्ठांचे मुख्य ग्रंथ म्हणजे **भक्तिरहस्य** व **सुगमोपाय** हे होत. हे दोन्ही छापून प्रसिद्ध झालेले आहेत. भक्तिरहस्याचीं प्रकरणें ७७ असून ओवीसंख्या ५८१९ आहे व सुगमोपायाचीं प्रकरणें १० व ओवीसंख्या ११३९ आहे. फुटकळ कविता अगदींच थोडी आहे. मिळून श्रेष्ठांची उपलब्ध कविता साडेसहा हजारांच्या आंत आहे. "रामीरामदासांची कविता" या ग्रंथाच्या आरंभीं "श्रेष्ठांची कविता" या मथळ्याखालीं रा. देव यांनीं जो निबंध दिला आहे तो अत्यंत वाचनीय आहे. या निबंधाच्या आरंभींच रा. देव लिहितातः—

"श्रीसमर्थांचे जसे दासबोध व आत्माराम हे दोन ग्रंथ तसे श्रीश्रेष्ठांचे भक्तिरहस्य आणि सुगमोपाय हे दोन ग्रंथ होत. करावयाचा तेवढा सर्व बोध दासबोधांत करूनही कांहीं शिष्य जेव्हां कोरडेच्या कोरडे राहिले, तेव्हां त्यांच्यासाठीं श्रीसमर्थांनीं आत्माराम नांवाचा लहानसा ग्रंथ निर्माण केला; तद्वत् भक्तिरहस्याचें सारें रहस्य श्रेष्ठांनीं सुगमोपायांत थोडक्यांत आणलें आहे."

भक्तिरहस्य ग्रंथ शके १५९० च्या विजयादशमीस पूर्ण झाला. सुगमोपायाचा रचनाकाल ग्रंथांत दिलेला नाहीं. रामीरामदास या नांवावर जशी श्रेष्ठ व समर्थ या दोघांचीही कविता आढळते, तद्वत् "दास" हें अभिधान समर्थांप्रमाणेंच श्रेष्ठांनींही कांहीं ठिकाणीं धारण केलेलें आढळतें. यासंबंधानें एके ठिकाणीं ते म्हणतात:—

"कदापि ऐसें म्हणतां अभक्त जन । दास हें अनुचित विप्राभिधान ।
तरी हा आक्षेपचि अज्ञान । करी जयाचा तयासी ॥
अहो शूद्र सेवक जैसा तिहीं वर्णांस । तैसें मनुष्यदास्य अनुचित ब्राह्मणांस ।
तें दूषण योजील हरिभक्तांस । तो चतुर कीं मूर्ख ? ॥
विप्र दास व्हावया ईश्वराचे । संचित पाहिजे कीं जन्मोजन्मीचें ।
नारदादि म्हणविती ज्यांचे । दासाचे दास ॥"

श्रेष्ठांची भाषा शुद्ध असून, त्यांच्या कवितेंत, समर्थांच्या कवितेंतल्याप्रमाणें शब्दांचीं अशुद्ध रूपें फारशीं आढळत नाहींत. त्याचप्रमाणें त्यांच्या कवितेंत संस्कृत शब्द अधिक आहेत. थोड्याशा अंतरानें समर्थांशीं समकालीन असलेले वामनपंडित यांचा जसा भगवन्नाममाहात्म्यावर विशेष भर दिसतो, तद्वत् श्रेष्ठांनींही सगुणोपासना आणि भगवन्नामस्मरण यांचें माहात्म्य आपल्या ग्रंथांत

प्रामुख्यानें वर्णिलें आहे. भक्तिरहस्याच्या अकराव्या प्रकरणाचे शेवटीं श्रेष्ठ म्हणतात:—

" या सकळाहि व्रतफळाचें फळ । नामस्मरण रामाचें एक वेळ ।
अहिर्निशीं स्मरेल जो प्रेमळ । तो स्वयेंचि श्रीराम ॥
अशक्ता न टकती व्रतें तपें । तरी नाम भगवंताचें सोपें ।
सुखें स्मरावें स्वरूपें । परमानंददायक ॥
श्रीराम जयराम जयजयराम । अखंड जो स्मरे सप्रेम ।
तो स्वयंचि असे पुरुषोत्तम । म्हणोनी राम न विसरावा ॥ "

श्रेष्ठांनीं आपले ग्रंथ लिहितांना भारत, भागवत, रामायण, गौतमस्मृति, अत्रिस्मृति, मन्वादि अष्टादश स्मृतिकारांच्या स्मृति, शारीर भाष्य, ब्रम्हपुराण, ब्रम्हांडपुराण, स्कंदपुराण, गरुडपुराण, नारदपुराण, गुरुगीता इत्यादि ग्रंथांचा उपयोग केल्याचा उल्लेख खुद्द त्यांनींच सदर ग्रंथांत केला आहे. "श्रुति, स्मृति आणि पुराणें यांचा मथितार्थ काढून आपण तो श्रोत्यांस सादर केला आहे," असें श्रेष्ठानीं एके ठिकाणीं म्हटलें आहे. भर्तृहरीचीं शतकेंही त्यांच्या वाचनांतून चुकलीं नव्हतीं असें भक्तिरहस्याच्या ५४ व्या प्रकरणांतील पुढील ओवीवरून दिसतें:—

शुष्क वैरकारी दुर्जन । द्वेषिती मृगमीन सज्जन ।
ढिवर लुब्धक दुष्ट मन । विषयतृष्णेस्तव तन्हीं ॥ ४३ ॥

रा. देव म्हणतात, " संस्कृतांतील या ज्ञानभांडाराशिवाय ज्ञानेश्वर, एकनाथ, इत्यादि साधुसंतांच्या ग्रंथांचा श्रेष्ठांना पूर्ण व्यासंग होता, असें त्यांच्या ग्रंथांवरून—विशेपतः सुगमोपायावरून—वाचकांचे लक्षांत आल्याशिवाय राहणार नाहीं. फार काय सांगावें, परंतु कांहीं कांहीं उल्लेखांवरून आपल्या धाकट्या बंधूंचा 'दासबोध'

ग्रंथही श्रेष्ठाच्या अवलोकनांतून गेला असावा असें मला वाटतें." आपल्या या विधानाच्या समर्थनार्थ रा. देव यांनीं श्रेष्ठ आणि समर्थ यांच्या ग्रंथांतील जीं सदृश स्थलें उदाहरणार्थ दिलीं आहेत, तीं चिंतनीय आहेत. तत्कालीन देशकालस्थितीसंबंधाचे उद्गार दोघां-च्याही ग्रंथांत सांपडतात.

श्रेष्ठांनीं भक्तियोगाचा महिमा खालील ओंव्यांत वर्णिला आहे:—

कृतयुगीं तरले ध्यानें । त्रेतायुगीं यज्ञदानें ।
द्वापारीं तरले पूजनें । केवळ कीर्तनें कलियुगीं ॥ २६ ॥
कलौ कल्मषरूप मनें । निश्चयें न तरे अन्यसाधनें ।
मुक्ति रामनामाभिधानें । आणि स्मरणें शिवाच्या ॥ २७ ॥
सांडुनी हरिहरभक्तीचा आश्रय । केवळ बोधलुब्ध निराश्रय ।
ते पावती क्लेशसमुदाय । तुषकंडणीं श्रम जैसा ॥ २८ ॥
म्हणोनी भक्ति साधनसंजीवनी । भक्ति वैराग्याची योनी ।
भक्ति ज्ञानाची जननी । विज्ञानेसहित ॥ २९ ॥
भगवद्भक्तीचिये द्वारीं । वोळंगती पुरुषार्थ चारी ।
कर जोडुनी निरंतरीं । तिष्ठत असती ॥ ३० ॥
भक्ति धर्माचें निजधाम । भक्ति अर्थाचा आराम ।
भक्तिचा ठाइं संपूर्ण काम । मोक्षदायिनी सुभक्ति ॥ ३१ ॥
भक्तिचे ठाइं भगवंताचें । षड्गुण ऐश्वर्य वर्ते साचें ।
संपूर्ण महिमान भक्तीचें । कवणा वर्णवेल ॥ ३२ ॥
भगवद्भक्तीची सत्ता थोर । विधिनिषेध केले किंकर ।
भक्तिप्रतापें मोडली थार । दंडा आणि दोषाची ॥ ३३ ॥
प्रायश्चित्तास कोण पुसे । हठयोगास ठावचि नसे ।
तीर्थादिकें अनायासें । भक्तिचा ठायीं वोळगती ॥ ३४ ॥
तपें हरिहरेंवीण तापलीं । प्राप्तिकारणें अनुतापलीं ।
ईश्वरभक्त्या निवालीं । सार्थक जालें कीतनीं ॥ ३५ ॥
कृतादि युगींचे तापस प्राणी । करिती कलियुगाची सिराणी ।

येथें कीर्तनमात्रें चक्रपाणी । मोक्षदाता सुभक्तां ॥ ३६ ॥
कळी हा दोषाचा समुद्र । परि येक असे महाभद्र ।
कीर्तनमात्रें चंद्रमौळी रामचंद्र । महापापें हरूनि मोक्ष दे ॥ ३७ ॥
पूर्वयुगीं काळांतरें । ईश्वरप्राप्ती होय निर्धारें ।
कलौ येकेचि अहोरात्रें । सुप्रसन्न सुभक्तां ॥ ३८ ॥
म्हणोनी धन्य धन्य हें कलियुग । पावलें धन्य धन्य जग ।
भगवद्भक्त महाभाग । अनायासें तरताती ॥ ३९ ॥
कळी भरे भवसिंधू दुस्तरु । भगवंत अनाथकरुणाकरु ।
प्रेरिलें सुभक्ति महातारूं । विलंब न लउं वळगतां ॥ ४० ॥
पुनः पुना म्हणे जगज्जीवनघन । माझें नाम माझें जीवन ।
कलियुगीं नामस्मरणावांचुन । गतिच नाहीं अन्यथा ॥ ४१ ॥
हृदयीं धरूनियां प्रेम । मद्भक्त जो निःकाम ।
सदा स्मरेल माझें नाम । तयाचा मी विकिला ॥ ४२ ॥
माझिया नामस्मरणाचें टोणें । मज केलें भक्तें जेणें ॥
तयापासुनी वेगळें होणें । ऐसें मज स्मरेना ॥ ४३ ॥
वैकुंठीं नलगे माझें मन । मज नावडे कैलासभुवन ।
नामसंकीर्तनीं अनुदिन । निष्ठें भावें भूललों ॥ ४४ ॥

**भक्तिरहस्य, प्रकरण ६**

भक्तिरहस्य ग्रंथांत शैव आणि वैष्णव या दोघांच्याही व्रतांचें वर्णन असून, श्रेष्ठांनीं हरिहरांचा पूर्ण अभेद मानिला आहे.

महाभगवद्भक्त ध्रुव हा आपल्या पित्याच्या अंकावर बसला असतां:—

“ सापत्न माता म्हणे मत्सरें । तुवां अभाग्यवंतेचा कुमरें ।
सिंहासन कैसें पाविजे, ईश्वरें । दिधलियावांचुनी ॥ ३९ ॥
जीव कष्टवावा साधनें । तनु दमावी पंचाग्नि धूम्रपानें ।
उग्र तपतां सिंहासनें । पावती भववैभव ॥ ४० ॥
जंव दिधलें नाहीं देवें । तंव हांव काय दुजयाचा देवें । ”

छळवादें बोलिली परी ध्रुवें । ध्रुवबुध्या मानिलें ॥ ४१ ॥
आपुलिया जनकादेखतां । धिःकारूनि दवडी सापत्न माता ।
अति अनुतापली मनोदेवता । रुदन आलें स्फुंदनें ॥ ४२ ॥
बाळकाचें चित्त कोमल । पारिखें वाटलें जगज्जाळ ।
एका भगवंतावांचूनि स्थळ । नाहीं आतां मजलागीं ॥ ४३ ॥
दीनवदना मम जननी । राजाज्ञे प्रमाण वर्तिजे जनीं ।
अतःपर परमेश्वरावांचूनि । कोण आहे मजलागीं ॥ ४४ ॥
कोमाइलें बाळकाचें वदन । जैसें पाडळीचें सुमन ।
श्रीहरिवांचूनि सर्व जन । न दिसे दृष्टीं तयाचे ॥ ४५ ॥
वसतच जनता जाली वोस । मनता विषयीं अति उदास ।
लागला श्रीहरीचा निजध्यास । न पाहे वास आणिकाची ॥ ४६ ॥
धांव धांव जगदीश्वरा । भक्तजनवज्रपंजरा ।
अनाथ दीनाच्या आधारा । तूं सोयरा निर्वाणीं ॥ ४७ ॥
प्रति तनुता हे जेथवरी । तितुकीं मावेचीं सोयरीं ।
तुजवांचूनिया श्रीहरि । जिवलग नाहीं दुजा ॥ ४८ ॥
हरि तूं जीवाचें जीवन । जीव न जिये तुजवांचून ।
तूं एक न वचसी सांडून । सर्व काळ सांगाती ॥ ४९ ॥
एर विश्व मिथ्यामय । जैसा यात्रेचा समुदाय ।
स्वकार्यतत्पर केचे प्रिय । तुजवांचूनि आत्मया ॥ ५० ॥
तूं व्यापक सचराचरीं । वससी बाह्य अंतरीं ।
विश्वविसांवया मुरारी । हरि तूं पाव मजलागीं ॥ ५१ ॥
माया आधार तुटला । जीव तुजलागीं फुटला ।
आपुले उदरीं तूं मजला । अचळ स्थळ देईं देवा ॥ ५२ ॥
ऐसा आइकोनियां धांवा । देव पावलासे ध्रुवा ।
काय जवळी होता जीवा-। माजील तो साक्षी ॥ ५३ ॥
भक्ता वाटला परदेश । तंव प्रगटला हृषीकेश ।
विश्वरूप स्वप्रकाश । अढळ स्वपद दिधलें ॥ ५४ ॥
नाभी म्हणतसे श्रीहरी । मज असतां शिरावरी ।
बहुत शिणलासी संसारीं । म्हणौनि हृदयीं धरियेला ॥ ५५ ॥

तंव ते पातलीं विमानें । दशधा तुरें मंगळ स्वनें ।
गगन कोंदलें सघनें । सुमनवृष्टि होतसे ॥ ५६ ॥
ध्रुवें नमिली सापत्न माता । तूंच गुरु होसी तत्वता ।
तुवां तोडिली ममता । तुझेन हरि मज भेटला ॥ ५७ ॥
तूंहि बोलतीसी रसाळ । मिथ्या प्रपंच परि पाल्हाळ ।
तरि कां तुटतें मायाजाळ । कां भेटता भगवंत ॥ ५८ ॥

**भक्तिरहस्य**, प्रकरण ५९

एवढ्या उताऱ्यांवरून श्रेष्ठांच्या वर्णनशैलीची ओळख वाचकांस होईल. श्रेष्ठांची कविता अगदीं साधी आहे; तींत मुक्तेश्वराची अलौकिक प्रतिभा नाहीं, किंवा श्रीधराची उच्च रसभरितता नाहीं, परंतु ज्या एका विशिष्ट हेतूनें—सगुणोपासना व भक्तिमार्ग यांचा सामान्य जनतेंत प्रसार करावा या हेतूनें—त्यांनीं आपली कविता रचिली तो हेतु सिद्धीस नेण्याइतकें रचनाकौशल्य त्यांच्या अंगीं खात्रीनें होतें व यामुळें त्यांचेही ग्रंथ मुमुक्षूस परमार्थमार्गदर्शक झाले आहेत. सुगमोपाय हा ग्रंथ निवळ वेदांतपर—जवळ जवळ गद्यात्मकच—असल्यामुळें त्यांतील वेंचे येथें न देतां श्रेष्ठांच्या एकदोन फुटकळ कविता देऊन, हा लेख संपवितों.

## अभंग.

रामाची देखिजे तेंचि पें देखणें । येर अंध पाहणें डोळयांचें ॥ १ ॥
रामासी परिसिजे परिसणें तेंचि । येर श्रवणाची बधिरता ॥ २ ॥
रामासी सन्मुख तेंचि पें नासिक । येर निर्नासिक उच्च तऱ्ही ॥ ३ ॥
रामेंसी बोलिजे तेंचि पैं रसना । येर मुकेपणा बोलतांही ॥ ४ ॥
रामालागीं झिजे तेचि त्वचा पुष्ट । येर कृश कुष्ट भवरोगी ॥ ५ ॥
श्रीरामीं सार्थक तेंचि पैं हस्तक । येर ते चाळक तऱ्ही थोटे ॥ ६ ॥

चालणें तेंचि जें रामालागिं चाले । येर तें पांगळें मोक्षपंथीं ॥ ७ ॥
संसारीं सूटिजे तेंचि पैं पुरुषत्व । येर नपुंसकत्व दाराधीन ॥ ८ ॥
रामीं चित्तशुद्धि तोचि मळत्याग । येर तो संसर्ग नीच नवा ॥ ९ ॥
रामासी चिंती जें तेंचि पैं चिंतन । येर ते वणवणा श्वानप्राये ॥ १० ॥
रामीं बोध करी तेचि पैं सुबुद्धि । येर ते कुबुद्धि विषयेस्फूर्ति ॥ ११ ॥
श्रवण करावें अंतरीं धरावें । आणि प्रवर्तावें निजकाजीं ॥ १२ ॥
हा देह पुडती न पावात बा रे । ह्मणोनि करा रे आत्महित ॥ १३ ॥
रामीरामदास विनवी वेळोवेळां । काळ पळपळां ग्रासितसे ॥ १४ ॥

'**नामस्मरण**' या नांवाचें श्रेष्टांचें एक प्रकरण आहे, त्याच्या २७ ओव्या आहेत, त्यांतील १२ ओव्या येथें देतों:—

कथे घालावें लोटांगण । भक्तां द्यावें आलिंगन ।
ज्यांच्या स्पर्शे जनार्दन । अभ्यंतरीं प्रवेशे ॥ १६ ॥
नाम वाचे रंगीं नाचे । नयनीं प्रवाह प्रेमाचे ।
हर पदरज वंदी त्याचे । हर्षे नाचत कैलासीं ॥ १७ ॥
टाळ मृदांग वैष्णवभार । करताळिका जैजैकार ।
करितां कीर्तनाचा गजर । रंगीं तिष्ठे श्रीरंग ॥ १८ ॥
हरिकथेस करी उच्छेद । ऐसा कोण भाग्यमंद ।
तया रुसला गोविंद । निरई पचित येमदूत ॥ १९ ॥
करी भक्तांचा मानभंग । तेणे भंगिलें हरीचें लिंग ।
वैकुंठभुवन जें अभंग । तेणें तेंहि भंगिलें ॥ २० ॥
भक्ता संकटीं घाली उडी । द्वेषियाचें मूळ तोडी ।
गदाघातें मस्तक फोडी । आपले जोडी तयांचें ॥ २१ ॥
मधुकैटभेसी घेतली झोंबी । जीवें मारिला निरालंबी ।
कुश छेदिल्याहि तनु अवलंबी । मग जीतचि पुरिला ॥ २२ ॥
हिरण्याक्ष दांतीं तोडिला । हिरण्यकश्य नखीं फाडिला ।
रावण कुंभकर्ण विभांडिला । अति तिक्षण शरधारीं ॥ २३ ॥
सहस्रार्जुनाचीं कुठारवरि । केलीं करचरणाचीं कांडोरीं ।

तर्पण केलें त्याच्या रुधिरीं । कौंस परिवारें मारिला ॥ २४ ॥
भक्तकैवारें दैत्य मारी । याची काये नवलपरी ।
लक्ष्मी शापिली सिंधुतीरीं । अश्विनौ देवांकारणें ॥ २५ ॥
भक्तांस अनुमोदन देती । भक्तसंकटें निवारिती ।
त्यांचा साहाकारी श्रीपति । भुक्तिमुक्तीचा दाता ॥ २६ ॥
रामीरामदास म्हणे प्रेमें । जे गर्जती हरीच्या नामें ।
त्यांचीं हरि हरी जन्मकर्में । पुरुषोत्तम ते स्वयें ॥ २७ ॥

---

# श्रीहरिनारायण.

ज्यांच्या हरिनारायण हें क्षुधितांच्या जसेंचि अन्न मनें ।
बहु मानिलें अहर्निश, त्यास शताधिक असोत मन्नमनें ॥ १ ॥

सन्मणिमाला—मोरोपंत.

श्रीहरिनारायण हे महान् सत्पुरुष सुमारें २५० वर्षांपूर्वी महाराष्ट्रांत होऊन गेले. त्यांचीं दोन ओवीबद्ध चरित्रें, त्यांच्या शिष्यांनीं लिहिलेलीं उपलब्ध असून, त्यांपैकीं ‘ शामराज ’ नामक शिष्यानें लिहिलेल्या चरित्राची ओवीसंख्या २७३ आहे. दुसऱ्या चरित्राचे पहिले आठच अध्याय सांपडले त्यांत एकंदर ६५० ओव्या आहेत. पुढील अध्याय सांपडल्यावांचून ह्या चरित्राचा पूर्ण उपयोग होणें शक्य नाहीं. ‘ शामराज ’ कृत चरित्रांतील माहिती व माझे मित्र रा. अ. बा. रसाळ, या शोधक गृहस्थांनीं संगृहीत केलेली माहिती यांच्या आधारानें प्रस्तुत चरित्रलेख लिहीत आहें.

श्रीहरिनारायण हे देवर्षि नारदाचा अवतार. प्रसिद्ध संत गोरोबा कुंभार यांचें वास्तव्यस्थल जें सत्यपुरी ऊर्फ तेर नामक गांव तेथें, अश्वलायन शाखीय नारायण देशपांडे यांच्या पत्नीच्या पोटीं ‘गुरुवारीं,

फाल्गुन शुद्ध तृतीयेस त्यांचा जन्म झाला. जन्मशक उपलब्ध नाहीं. ह्यांचीं मूळ नांवें निराजी व नाभाजी अशीं होतीं, पण त्यांच्या अनंत नामक चुलत्यानें त्यांस दत्तक घेतलें तेव्हां त्यांचें ' हरि ' असें नांव ठेवण्यांत आलें. हे लहानपणापासून विरक्त होते. यांच्या पत्नीचें नांव अन्नपूर्णाबाई. हरिनारायण ह्यांच्या दया-दातृत्वादि गुणाच्या अतिरेकानें वडिलोपार्जित द्रव्य खर्च झाल्यामुळें घरांत तंटे होऊन ते सपत्निक तीर्थयात्रेस निघाले.

उत्तर हिंदुस्थानांतील सर्व तीर्थें करून स्वामी जोगाईच्या आंब्यास आले. तेथें कुटुंबास ठेवून दक्षिण दिशेकडे तीर्थयात्रेस निघाले. वाटेंत नीरानरसिंगपुरीं संगमामध्यें त्यांस नारदाचा उपदेश झाला. नंतर कृष्णेच्या कांठचीं सर्व क्षेत्रें पहात असतां कृष्णा-वेणीसंगमीं छत्रपति * महाराजांस त्यांचें दर्शन झालें. पुढें रामदासपंचायतनांतील सत्पुरुषांच्या त्यांनीं भेटी घेतल्या. स्वामीस घरांतून बाहेर पडण्यास जो प्रसंग कारणीभूत झाला त्याचें ' शामराज ' यांनीं येणेंप्रमाणें वर्णन केलें आहे:—हरिनारायणाचे चुलते अनंत जिवाजी यांस पुत्रसंतान नसल्यामुळें त्यांनीं हरिनारायण यांस दत्तक घेतलें; परंतु पुढें वृद्धापकालीं अनंत जिवाजी यांस पुत्र झाल्यामुळें, हरिनारायणाविषयीं त्यांच्या मनांत साहजिकच वैषम्य उत्पन्न झालें. मग

* हे सातारकर छत्रपति कीं कोल्हापुरकर? परंतु कोल्हापुरचें संस्थान हरिनारायण-कालीं अस्तित्वांत नसावेंसें वाटतें. संगम माहुलीनजीक घाटावर दोन दगडी मूर्ति एका देवळांत आहेत, एक स्त्रीची व एक पुरुषाची. या दोन मूर्ति अनुक्रमें श्रीहरिनारायण व त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई यांच्या असून, त्या, स्वामीच्याच आज्ञेनें त्यांच्या समक्ष छत्रपतींनीं स्थापन केल्या.

ओव्या

" तों एके दिवशीं भोजनासी । बैसले स्वामी सावकाशीं ।
माता पिता बोलती त्यांसी । अति कुशब्द निष्ठुरत्वें ॥
म्हणती, पोसणें दिल्हें आम्हांसी । ऊठ वेगीं काय जेविसी ।
हातीं धरोनि स्वामीसी । पात्रावरूनि उठविलें ॥
घालुनी द्वाराबाहेरी । म्हणे जाय दुरीच्या दुरी ॥
तोंड न दाखवीं सत्वरी । कठिण हस्तें ताडिलें ॥
तें साहोनि तये वेळीं । विचारुनियां हृदयकमळीं ।
म्हणे परमार्थी जाली दिवाळी । अति आनंदें डोलत ॥ "

येणेंप्रमाणें दत्तक पित्यानें स्वामीची घरांतून उचलबांगडी केल्यावर ते आपल्या जनक पित्याच्या घरीं आले; परंतु त्यानेंही " म्हणे जाईं तूं वनासी । निरुपयोगी सर्वस्वें " असें म्हणून त्यांस हांकून लाविलें. तेव्हां 'आपली आज्ञा मला शिरसामान्य आहे' असें म्हणून स्वामींनीं पितृचरणावर आपलें मस्तक ठेविलें; व आईचा निरोप घेण्यासाठीं ते तिच्या भेटीस गेले. मुलाची हकीकत ऐकून त्या माऊलीस फार कळवळा आला व तिनें मुलाची व आपल्या पतीची समजूत करून स्वामींस घरींच ठेवून घेतलें. शामराज म्हणतात

ओव्या

" ऐकूनि माता व्याकुळ मनें । शांतवी पुत्रा प्रबोध करून ।
म्हणे हें न मानीं अंतःकरणीं । वडील बोलिले जे कांहीं ॥
तूतें देखोनि उदासता ॥ मातें नाठवे देहगेहवार्ता ।
नवसें सायासें जोडिलासि थिता । जातां ऐसें पुससी ॥
प्रपंचीं विषयसंभ्रम । कोणा नाठवे धर्माधर्म ।
यालागीं तुवां धरूनि उपरम । शांती अंगें धरावी ॥
शांती सुखासी कारण । शांति योगाचें निजभूषण ।
शांती साधका समाधान । अवश्य जाण होतस ॥

ऐकोनि मातेची अमृतगिरा । सुटला वैराग्यवसंतवारा ।
ज्ञानांकुरें फुटला खरा । विवेकद्रुम लसलसित ॥

मग कांहीं दिवसांनीं हरिनारायणाचे वडील सहकुटुंब काशीयात्रेस गेले. इकडे हरिनारायणानीं व्रतोद्यापन, ब्राह्मणभोजन, भजन पूजन वगैरे सत्कृत्यांत आपला काळ क्रमिला. कांहीं दिवसांनीं आईबाप काशीयात्रेहून परत आले, तेव्हां त्यांस घरीं आणण्यासाठीं वैष्णवांचा मेळा घेऊन नामघोष करीत स्वामी गांवाबाहेर गेले. पुढें त्यांचे वडील घरीं आल्यावर, भजनपूजनांत आणि ब्राह्मणभोजनांत मुलानें घरांतलें सगळें द्रव्य खर्चून टाकलें आहे असें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आलें.

“ क्रोधें संतप्त पिता जाण । येऊनि पुत्रा बोले वचन ।
बरेंच केलें गृहरक्षण । ऊठ वेगें म्हणतसे ॥
तुवां करावा अरण्यवास । न दाखवीं आपुलें मुखास ।
ग्रामांतरीं करितां वास । आण आमुची निर्धारें ॥ ”

पित्यानें अशी शपथ घातल्यावर, ब्रह्मानंदांत अगोदरच रंगलेले स्वामी प्रपंचांत कसचे राहतात? त्यांनीं तात्काळ मातापित्यांचा निरोप घेऊन प्रयाण केलें. मागून त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाईही निघाली. या प्रसंगीं त्या जोडप्याचें जें भाषण झालें तें वाचण्यासारखें आहेः—

“ तों पतिव्रतांमाजी शिरोमणी । अन्नपूर्णा चिच्छक्ति जननी ।
पतीचें प्रयाण ऐकोनी । उठाउठी चालिली ॥
पुढें स्वामी चालताती । पाठीं अन्नपूर्णा सती ।
पालव मोकळें सांवरीत । सद्गद कंठ जाल्हासे ॥
येऊनियां पतिजवळी । मस्तक ठेविला चरणकमळीं ।
येरें धिक्कारोनी तये वेळीं । मजपाठीं तुवां न यावें ॥
ऐकूनि पतीचें भाषण । अश्रुधारा श्रवती नयन

हस्त जोडोन बोले वचन । ऐका माझें स्वामिया ॥
आपण उदास होऊनि जाण । चालिलेति मज टाकोन ।
मी कोणा पाहून कंठूं जाण । गृहव्यापार किमर्थ ॥
मत्स्य काढिला जळाबाहेरी । काढोनि टाकिला दुग्धसरोवरीं ।
तो जीवन पावे कैशापरी । तैसें जालें स्वामिया ॥
स्वामी म्हणती तियेलागुन । तुझा पिता अतिसंपन्न ।
तयाचे आश्रमीं जाउनि जाण । तुवां रहावें सत्वर ॥
येरी ऐकोनि बोले वचन । म्हणे स्वामी स्वहस्तें जाण ।
करावें माझें प्राणहनन । परी वियोगदुःख न द्यावें ॥
स्वामी म्हणती आम्ही उदास । तूं सकुमार अति सुरस ।
किमर्थ भोगिसी वनवास । आमुचे संगती अतिदुःख ॥
यावरी बोले पद्मनयना । सुखदुःखभोग प्रारब्धाधीन ।
जे जे वेळे होणार जाण । तें तें अनायासें होतसे ॥
आपण जातां वनांतरीं । मज घालुनी विरहसागरीं ।
ऐसें बोलोनि ते अवसरीं । मिठी घातली चरणांसी ॥
नेत्रजळें चरणक्षाळण । अंगुष्ठ घातला मुखीं जाण ।
गहिंवरें दाटलें अंतःकरण । उकसाबुकसीं स्फुंदत ॥ ''

पत्नीची ही एकनिष्ठता पाहिल्यावर, क्षणभर परीक्षणार्थ कठोरता धारण करणाऱ्या स्वामीचें अंतःकरण उचंबळून आल्याशिवाय कसें राहील ?

'' कृपादृष्टि पाहे स्वामिया । तों स्वच्छ अंतःकरण देखोनियां ।
आपणासन्निध बैसवोनियां । गौरविलें स्वहस्तें ॥ ''

इकडे, हरिनारायण ग्रामत्याग करून गेले, हें वृत्त ग्रामस्थांस कळतांच ते स्वामींच्या दर्शनार्थ त्यांचा शोध करीत निघाले. तों एका वृक्षाखालीं हरिनारायण व अन्नपूर्णाबाई हीं त्यांच्या दृष्टीस पडलीं. त्यांस साष्टांग वंदन करून ''महाराज, घरीं चलावें,'' अशी लोकांनीं

त्यांस विनंति केली. तेव्हां स्वामी म्हणाले " बंधु हो, ' तूं घरांतून चालता हो, ' अशी आज्ञा वडिलांनीं मला केली आहे, ती मोडतां येत नाहीं." मग गांवांतील लोक स्वामीपाशीं तीन रात्री राहिले व नंतर त्यांचा सप्रेम निरोप घेऊन परत गेले. कांहीं गरीब ब्राह्मणांनीं स्वामीपाशीं दक्षिणा मागितली, तेव्हां अन्नपूर्णाबाईनें आपल्या अंगावरचे दागिने काढून दिले !

पुढें, लेखारंभीं सांगितल्याप्रमाणें स्वामी सपत्निक काशी, प्रयाग वगैरे उत्तर यात्रा करून जोगाईच्या आंब्यास आले व तेथें पत्नीस ठेवून आपण वनांत गेले. तेथें एका पुण्याश्रमांत त्यांनीं द्वादश वर्षें अनुष्ठान केलें. तेव्हां देवीचा साक्षात्कार झाला कीं, ' तूं नृसिंहपुरास जा म्हणजे तेथें साक्षात्कार होऊन सद्गुरूचा अनुग्रह होईल. ' त्याप्रमाणें स्वामी अन्नपूर्णाबाईसह नीरानरसिंगपूर येथें गेले. तेथें एके दिवशीं पहांटेस, स्वामी संगमोदकांत ध्यानस्थ बसले असतां अकस्मात् नदीस मोठा पूर येऊन, स्वामींच्या डोक्यावरून पाणी जाऊं लागलें. तें पाहून, स्वामींची पत्नी गांवांत होती तिला लोकांनीं सांगितलें कीं, " भर्ता तुमचा बुडाला. " तेव्हां ती पतिव्रता अत्यंत शोकाकुल होऊन पतिप्राणरक्षणार्थ श्रीनृसिंहाची प्रार्थना करूं लागली. इकडे संगमोदकांत—

" नारदस्वरूपें श्रीभगवान । येते जाले आनंदेंकरून ।<br>
तों निराजी समाधिस्थ पूर्ण । सावध केलें तयासी ॥<br>
ब्रह्मवीणा देऊनी पाणी । तत्त्वमसि वाक्य सुचवुनी ।<br>
हरि नारायण हें भजन श्रवणीं । सांगितलें सद्भावें ॥ "

या प्रसंगीं स्वामी सात अहोरात्र संगमोदकांत समाधिस्थ होते. पाण्यास आलेला पूर ओसरल्यावर, ग्रामस्थ लोकांनीं, स्वामी ज्या ठिकाणीं बुडाले होते, तेथें येऊन पाहिलें:—

उदकीं वाहवला ब्राह्मण । ऐसें बोलती सर्वजन ।
तों अकस्मात स्वामीस देखोन । ह्मणती अपूर्व जाहलें ॥
हरि नारायण हें भजन । हातीं टाळवीणा जाण ।
घवघवीत मूर्ति संपूर्ण । दुरूनि पाहती सर्वही ॥
धावोनि आले तयाजवळी । मस्तक ठेविती चरणकमळीं ।
ह्मणे धन्य धन्य ये काळीं । विजयी जाला नारायण ॥

मग स्वामी तेथून उठले व देवळांत जाऊन त्यांनीं नृसिंहाचें दर्शन घेतलें. इतक्यांत अन्नपूर्णाबाईनें येऊन स्वामींचे पाय धरले. नरसिंगपूर येथें स्वामींनीं एक वर्ष वास्तव्य केलें व तेवढ्या वेळांत पुष्कळ लोक त्यांचे शिष्य झाले. अन्नपूर्णाबाईसही गर्भधारणा होऊन पुत्ररत्न झालें. त्याचें नांव स्वामींनीं प्रन्हाद असें ठेविलें; परंतु त्याचें आयुष्य फक्त तीनच महिने असल्यामुळें प्रन्हाद हें नांव त्यास शोभत नाहीं, असेंही त्यांनीं अन्नपूर्णाबाईस सांगितलें. पुढें धारासीव येथें जाऊन तेथील विवरांत स्वामींनीं मुक्काम केला. स्वामींचें स्वरूपवर्णन शामराज यांनीं येणेंप्रमाणें केलें आहे:—

"गळां शोभे तुळसीमाला । दाढी नेत्र विशाळ ।
गौरवर्ण नासिक सरळ । शोभे कौपिन कटीसी ॥
उदर विशाळ दोंदिलें । पवित्र यज्ञोपवित घातलें ।
सरळ दोर्दंड तेजागळे । पत्र पद्मासन विराजे ॥
मस्तकीं शोभे सुरस भगवें । मेखळा अंगीं दिसे बरवी ।
हातीं टाळ वीणा वाजवी । नाम गातसे सुस्वर ॥

भाळीं रेखिला पोंड्र तिलक । चिन्मय मूर्ति अलोलिक ।
ओतोनी इंद्रनीळ देख । ऐसें स्वरूप स्वामींचें ॥

धाराशीव येथें बरेच दिवस वास्तव्य केल्यावर स्वामी पुनः तीर्थयात्रेस निघाले. दर आषाढी कार्तिकीस स्वामी पंढरपुरास श्रीपांडुरंगदर्शनास जात असत. एका आषाढी यात्रेच्या वेळीं असा प्रकार घडला कीं, स्वामी भीमेच्या पैलतीरीं असतां नावाडी नौका घेऊन परतीरास गेला. आज एकादशी असून, पंढरीनाथाचें दर्शन आतां आपणास होत नाहीं , असें स्वामींस वाटलें. मग त्यांनीं चंद्रभागेला नमस्कार करून, पाण्यावर मृगासन ठेवलें व त्यावर पद्मासन घालून भजन करीत चालले ! पैलतीरावरील संतमहंतांनीं हा देखावा पाहून मोटें आश्चर्य केलें. नंतर काय झालें तें शामराज सांगतातः—

घेतलें पांडुरंगदर्शन । प्रेमें केली प्रदक्षिणा ।
जयजयकार जाला पूर्ण । पंढरपुरीं ते काळीं ॥
साक्षात् पूर्ण परब्रह्म भगवान । येऊनि स्वामीसि बोलती जाण ।
ह्मणे तुमची वारी पावली संपूर्ण । प्रेमालिंगन दीधलें ॥
कार्तिकी आषाढी एकादशी । आह्मी येऊं तुह्मापाशीं ।
भाक देऊनि स्वामीसी । जाते जाले राउळा ॥

पुढें स्वामी आषाढी कार्तिकी एकादशीचा उत्सव आपल्या वास्तव्यस्थानीं दरवर्षी नियमानें करीत असत. स्वामींची भीमरथी नामक एक कन्या होती, तिचा पती मृत झाला. तेव्हां तिच्या घरीं जाऊन तिला घेऊन स्वामी भीमानीरासंगमावर आले व तेथें त्यांनीं तिला उपदेश दिला. तेथून दक्षिणेस शेषाद्रि, सेतुबंध, रामेश्वर व कार्तिकस्वामी हीं क्षेत्रें करून स्वामी पंचगंगातीरीं कोल्हापूर क्षेत्रीं आले. तेथून जोतिबाच्या डोंगरावर जाऊन कृष्णावेणीसंगमीं आल्यावर तेथें छत्रपतींची भेट झाली. छत्रपतींनीं पुष्कळ द्रव्य आणून

स्वामीपुढें ठेविलें, तें त्यांनीं ब्राह्मणांस वांटून दिले. स्वामीची वैराग्यवृत्ति व साधुत्व पाहून छत्रपतींनीं त्यांस आपल्या सन्निध राहण्याची विनंति केली, परंतु स्वामींनी ती मान्य केली नाहीं. आपणा उभयतां पतिपत्नीच्या मूर्ति करून त्यांची स्थापना छत्रपतींकडून त्यांनीं करविली. पुढें स्वामी परळीस गेले व तेथें श्रीसमर्थ रामदासस्वामींचें त्यांनीं दर्शन घेतलें. तेथून निगडीस जाऊन रंगनाथस्वामीस भेटले. पुढें वडगांव व ब्रह्मनाळ येथें जाऊन जयरामस्वामी व आनंदमूर्ति यांचें दर्शन स्वामींनीं घेतलें. पुढें नरसोबाची वाडी, कऱ्हाड, आळंदी, देहू, चिंचवड इत्यादि पुण्यस्थलें पाहून स्वामी पुनः नरसिंगपुरास गेले. तेथें श्रीनृसिंहाचें दर्शन घेऊन, त्यांची पत्नी अन्नपूर्णाबाई व कन्या भीमाबाई ह्या ज्या ठिकाणीं होत्या तेथें स्वामी गेले व आपला समाधिकाल सन्निध आल्याचें अन्नपूर्णाबाईस त्यांनीं कळविलें. तेव्हां बाईनीं स्वामींच्या आज्ञेनें ' श्रावण शुद्ध पौर्णिमा ' रोजीं स्वर्गगमन केलें:—

काया वाचा आणि मनें । न्याहाळिले स्वामीचरण ।
मुखें करीत नामस्मरण । नारायणरूप जालीसे ॥

अन्नपूर्णाबाई निधन पावतांच भीमाबाई फार शोक करूं लागली. तेव्हां:—

नश्वर देह पांचभौतिक । जाले मेले यदर्थीं शोक ।
करूं नये सर्वथा देख । कन्येप्रति अनुवादे ॥
म्हणे धन्य धन्य ऐशी सती । नाहीं ऐकिली पाहिली त्रिजगतीं ।
इच्छामात्रें देह सोडिती । नवल वाटे मानसीं ॥

इत्यादि शब्दांनीं स्वामीनीं तिचें समाधान केलें. नंतर आपला प्रयाणकाल अगदीं सन्निध आला असें जाणून स्वामी सर्व मंडळी-

सहवर्तमान 'वैनवटी' (वेनवडी) क्षेत्रीं आले. तेथें भागीरथीस्नानाची उत्कट इच्छा स्वामीस झाली. तेव्हां असा चमत्कार घडून आला की—

" मूर्तिमंत येऊनि गंगावती। चरणाप्रति लागली ॥
धन्य धन्य तो पुण्यकाल। धन्य तयाचें जातिकुळ।
स्नान करोनि गंगाजळीं। बैसले असती ते ठायीं॥
तों सकळ शिष्यसमुदाय। जोडोनि उभे करद्वय।
म्हणती दयाळा स्वामीराया। कृपादृष्टीं अवलोकीं॥
स्वामी म्हणती तयांलागुन। तुम्ही करावें नामस्मरण।
ज्याची जैशी भावना पूर्ण। तैसें फल तयासी॥
ऐकोनियां अमृतवाणी। शिष्यीं मस्तक ठेविलें चरणीं।
स्वामी आह्मांसी टाकुनी। केउते जातां दयाळा॥
ऐकोनी तयांचें बोलणें। ऐका म्हणती सावधान।
आह्मासि करणें आहे प्रयाण। निर्धारेसी जाणावें॥
वियोगदुःख जाणुनी। सकळिकांचे अश्रु लोचनीं।
स्तुति करिती मुखेंकरोन। नामगर्जना करितसे॥
नारायण हरि नारायण। ऐसे करिती हरिकीर्तन।
स्वामी डोलती प्रेमेंकरून। अतिउत्साह मानसीं॥
स्नानसंध्या देवतार्चन। करूनि शुद्ध आचमन।
आसन घातलें चैलाजन। मृगासन त्यावरी॥
वरी घातलें कंबलासन। त्यावरी धौतवस्त्र जाण।
घालुनियां पद्मासन। योगायोग आरंभिला॥
सुवर्णमय अंगकांती। प्रदेशीं प्रभा फांकती।
तेज प्रगटलें अति निगुती। ब्रह्ममूर्ति मूर्तिमंत॥
ऐसी समाधि लावून। अर्धोन्मिलित नेत्र जाण
स्वामी पावले अंतर्धान। ब्रह्मरूप पावले॥
शके सोळाशें सत्तेताळीसीं। शक शालिवाहन विश्वावसूशी।
फाल्गुन शुद्ध चतुर्थी शिशिर ऋतूसी। ऐंद्रव आश्विनिसी गमन केलें॥

याप्रमाणें, शके सोळाशें सत्तेचाळीसांत स्वामी बेनवडी मुक्कामीं समाधिस्थ झाले. वरील माहिती व ओंव्या स्वामीच्या ज्या ओवीबद्ध चरित्रांतून घेतल्या आहेत, त्या चरित्राचे कर्ते शामराज हे हरिनारायणाचे शिष्य होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे; व " सोहं मंत्र सद्गुरुरायें । हरिनारायण प्रेमभावें । उपदेश करिती सहजान्वयें । शामराज सेवका " या ओवींत, स्वतःस हरिनारायणांनीं उपदेश दिल्याची गोष्ट शामराज यांनीं निर्दिष्ट केली आहे.

स्वामीचें दुसरें एक अपूर्ण ओवीबद्ध चरित्र उपलब्ध असल्याचें पूर्वीं सांगितलें आहे, त्यांत कर्त्यानें "शिव सद्गुरुप्रसादें । दास वदे श्रोतयां ॥" या शब्दांनीं स्वतःचा उल्लेख केला आहे. सदर चरित्राचे जे आठ अध्याय उपलब्ध झाले आहेत, त्यांच्या ६५० ओंव्यांत, आरंभीं संक्षिप्त पूर्वेतिहास देऊन स्वामीच्या तीर्थाटनाचें वर्णन केलें आहे. तेरगांवानजीक उत्तरेश्वर महादेव आहे तेथें स्वामीनीं अनुष्ठान केल्याचें सांगून उत्तरेश्वरीं स्वामींनीं बांधलेली पवळ माळावर अद्याप आहे, असें ह्मटलें आहे. पुढें धाराशिव व तेर यांच्या दरम्यान डोंगरांत बुटेदरडींत स्वामीनीं तीन महिने अनुष्ठान केलें. अंगास वाळवी लागली. तेथें दृष्टांत झाल्यावर काळेश्वरीं गोरोबा कुंभारांची समाधि आहे तेथें स्वामी आले. काळेश्वराच्या देवळांत स्वामीवर सर्पानें फणा धरलेली तेथील गुरविणीनें पाहिली. काळेश्वरीं असतां जगन्नाथस्वामी उर्फ जगजीवन यांची भेट झाली. नंतर तीर्थयात्रा करीत करीत स्वामी नृसिंहपुरास आले तेथें तपाचरण केल्यावर नारदांनीं प्रत्यक्ष उपदेश केला. इतका कथाभाग त्यांत वर्णन केला आहे.

वरील माहितीशिवाय रा. रसाळ मास्तर यांनीं स्वामीच्या शिष्यसांप्रदायांत ह्मणजे बेनवाडी, ब्रह्मगांव, अष्टें ( हरिनारायणाचें ) इत्यादि ठिकाणीं शोध करून जी माहिती मिळविली ती येणें—प्रमाणें:—" स्वामीच्या समाधीविषयीं अशी एक कथा प्रचलित आहे कीं, ब्रह्मगांव येथील निंबाळकर मराठ्यांपैकीं तुळसाबाई नांवाची एक बाई स्वामीची शिष्यीण होती. निंबाळकरांकडे त्या वेळीं ब्रह्मगांव, भाळवणी, अष्टें वगैरे गांवची देशमुखी व जहागीर होती. तुळसाबाईला स्वामींनीं असें वचन दिलें होतें कीं, मी शेवटीं तुझ्या गांवीं देह ठेवीन. पुढें स्वामी बेनवडीस समाधिस्थ झाल्याचें बाईस समजतांच ती लवाजम्यासह बेनवडीस गेली; आणि स्वामीचें शव पालखींत घालून अष्ट्यास येण्यास निघाली. तों वाटेंत सीना नदीच्या कांठीं खडकत ह्मणून गांव लागतें तेथील लोकांनीं स्वामीचें प्रेत जाऊं देण्यास हरकत केली. तेव्हां आपले गांवीं स्वामीची समाधि व्हावी हा आपला हेतु आतां शेवटास जात नाहीं ह्मणून बाईस फार वाईट वाटलें. तिचा हेतु जाणून हरिनाराणस्वामी पालखींत उठून बसले, हें पाहून खडकतकरांनीं, केलेल्या आगळिकीबद्दल माफी मागून स्वामीस नैवेद्य वगैरे करून रवाना केलें. नंतर अष्ट्यास आल्यावर स्वामींनीं बाईस विचारून तेथें पुनः देह ठेविला; व पूजा आणि उत्सव करण्याचें काम रानडे उपनामक कोंकणस्थ ब्राह्मण शिष्याकडे सोंपविलें. याच शिष्याच्या वंशजांकडे अष्टें व आणखी एकदोन गावें जहागीर आहेत. ह्या अष्ट्यास 'हरिनारायणाचें अष्टें' ह्मणतात. तें मोंगलाईत बीड जिल्ह्यांत अष्टी तालुक्यांत आहे. हरिनारायण स्वामी पंढरीची वारी करीत असत. त्यांच्या

आज्ञेवरून अष्टें येथें आषाढ वद्य ११ रोजीं उत्सव होत असतो. बेनवडी हें लहानसें खेडें, ता. कर्जत, जिल्हा नगर, पैकीं राशीन गांवाजवळ आहे. तेथें स्वामीचा मठ आहे. स्थान रमणीय आहे. येथें स्वामींचा अंत शके १६४७ त झाला. तेथेंही स्वामींच्या पुण्यतिथीचा उत्सव दरसाल होतो व त्या प्रीत्यर्थ बेनवडी गांव जहागीर आहे. बेनवडीचे गोसावी जहागीरदार हे हरिनारायणाच्या कन्येच्या वंशजांपैकीं आहेत. त्या काळीं हरिनारायणास नारदांचा अवतार समजत व बेनवडी, अष्टें व संगम माहुली येथें ज्या हरिनारायणाच्या मोठाल्या दगडी मूर्ति आहेत, त्या हुबेहूब नारदांच्या मूर्तीप्रमाणें ह्मणजे हातांत वीणा, चिपळ्या, शेंडी वगैरे सर्व नारदाप्रमाणें. अशीच एक मोठी मूर्ती खर्डें येथें ओंकारेश्वराचे देवालयांत आहे. हरिनारायणाचे शिष्य सुलतानराव अप्पासाहेब निंबाळकर होते त्यांनीं खर्डें गांवची वसाहत करून शके १६६५ त खर्डें येथें भुईकोट किल्ला बांधिला व पूजेकरितां आपल्या गुरूची ही मूर्ती स्थापिली. हरिनारायणाच्या कवितेपैकीं **नामामृतलहरी** नांवाचा लहानसा ग्रंथ मिळाला आहे. खेरीज अभंग व पदें ब्रह्मगांवकर हरिदास यांच्या संग्रहीं पुष्कळ आहेत. बेनवडी येथें यांचे कांहीं ग्रंथ आहेत पण ते तूर्त मिळण्याजोगे नाहींत. त्यांच्या सांप्रदायांत "अन्नपूर्णापते हरिनारायण" अशी मंगल गर्जना करण्याची चाल आहे. यांच्या सांप्रदायांतील हरिदास लोक कीर्तनाच्या प्रारंभीं खालील पद सुस्वर म्हणतातः—

**पद.**

हरिनारायण दुरितनिवारण, परमानंद सदाशिव शंकर।
भक्तजनप्रिय पंकजलोचन, नारायण तव दासोहम्। हरि०

सांप्रदायांत स्वामींच्या वर्णनाचे पुष्कळ श्लोक सांपडतात ते त्यांच्या शिष्यांनीं केलेले असावेत.

## श्लोक.

आले स्वामी यात्रेसि आषाढमासीं ।
भिमा चालली पूर्ण दोहीं थडींशी ॥
हातीं टाळ वीणा हरीनाम मूखीं ।
उडी टाकिली पाहिली सर्व लोकीं ॥ १ ॥
न जाणें मी कांहीं तव गुणकथावर्णनविधि ।
विधीदी जो सर्वो न पवति तुझा पार उदधी ॥
स्वसंवेद्या आद्या सगुण प्रतिपाद्या सुरविभो ।
दिनाच्या दातारा नमन हरिनारायणप्रभो ॥ २ ॥
अवतार जाला मुनि नारदाचा ।
ज्याला अनुग्रह असे मुनि नारदाचा ॥
जेणें भजनमार्ग जगिं वाढवीला ।
अनुदिनिं भजा त्या हरिनारायणाला ॥ ३ ॥

या शेवटच्या श्लोकांत वृत्तभंग पुष्कळच झालेला दिसतो.

'दासगणू' या विद्यमान संतचरित्रलेखकांनीं आपल्या अर्वाचीन भक्तविजयांत, तिसऱ्या अध्यायांत श्रीहरिनारायणचरित्र संक्षेपानें दिलें आहे तें जिज्ञासूंनीं अवश्य पहावें.

प्रस्तुत चरित्रनायक हरिनारायणाशिवाय, दुसरे एक हरिनारायण नामक सत्पुरुष महाराष्ट्रांत होऊन गेले आहेत. महाराष्ट्र-कवि-चरित्राच्या पहिल्या भागांत **हरि अंगापूरकर** नामक कवीचें चरित्र दिलें आहे. त्यांत या दुसऱ्या हरिनारायणाचा उल्लेख आहे.

आतां स्वामीच्या ' नामामृतलहरी ' ग्रंथांतले व फुटकळ कवितांतले कांहीं वेंचे देऊन हा लेख पुरा करतों. स्वामींची ही सर्व कविता अद्याप अप्रकाशित आहे.

' नामामृतलहरी ' च्या ओव्या ४०२ असून, त्यांत अध्यात्माचें उत्कृष्ट विवेचन केलें आहे. ग्रंथारंभींचें सद्गुरुस्तवन पहा:—

ॐनमो सद्गुरु परिपूर्णा । निरुपम निर्विकार निर्गुणा ।
न खंडतां अखंडपणा । होसी देखणा तुजचि तूं ॥
तूं आत्मलिंग आराध्य । स्वयंज्योति स्वसंवेद्य ।
तूं नित्यानंद जगदाद्य । स्वयंबोध बोध्य तूं ॥
तूं अनिर्वचनीय परिवाचक । कांहीं न करितां चाळक ।
तूं आद्यंतीं एक । हेंही साशंक म्हणावें ॥
तूं सहजीं सहज परमानंदा । परमपुरुषा अनादि सिद्धा ।
परात्परबोधें अभयवरदा । आत्मसंपदासुखदानी ॥
तूं अद्वयानंद ज्ञानघन । करिसी शिष्यचातकतृषाहरण ।
भक्तकाजकैवारा पूर्ण । दाविसी सगुण चरित्रें ॥
तूं अवाप्त पूर्णकाम । सकळ भूतांचा विश्रामधाम ।
जगज्जीवन तूं आत्माराम । सोहं आराम विसावया ॥
येकानेकपणेसी । तूंचि नटनाट्य दाविसी ।
प्रकृति पुरुष अभिन्नतेसी । विश्वविलासी विलासिया ॥
शब्दब्रम्हाचा उगम । प्रणवरूप वेदैकनाम ।
तयाचेंही बीज परम । तूं पुरुषोत्तम गुरुराया ॥
जे देशकालवर्तमानावच्छिन्न । अखंडैक्यस्वरूपें विद्यमान ।
तो तूं आपआपणियामाजी सुखसंपन्न । अससी पूर्ण पूर्णत्वें ॥
त्या तुझी सत्य स्वरूपस्थिति । बोलों जातां वेदश्रुति ।
त्याही परतल्या नेति नेति । तेथ मी किती वर्णाव्या ॥
येथ स्तव्य स्तवकु होनि ऐसे । तुज संतोषवूं स्तवनोद्देशें ।
तंव स्तवावया दुजें न दिसे । मी निःशेषें हारपे ॥

मी येकु असावा दुसरा । तरी यावें कीं स्तवनद्वारा ।
यालागीं स्तव्यस्तोता स्तवनाधारा । मूळ एकसरा तूं होसी ॥
श्रोत्रा तुझेनि श्रोतव्यपण । त्वचा तुझेनि स्पर्शज्ञ ।
चक्षुसी तुझेनि लक्षुपण । जिव्हा रसज्ञ तुझेनी ॥
घ्राणा तुझेनि आघ्राणता । मना तुझेनि मंतव्यता ।
बुद्धिसी तुझेनि बोधव्यता । चित्ता चेतव्यता तुझेनि ॥
ऐसा सर्वेंद्रियीं समसमान । सर्वप्रकाशक तूं आपण ।
तेथ दुजें करूनि स्तवितें कोण । काईसेनी भजन करावें ॥
यालागीं शब्दादि विषय इंद्रियज्ञानें । भजनार्ह नव्हती स्वतंत्र गुणें ।
तेथ उदधीमाजी मी तरंगपणें । क्रीडा संपूर्ण करी तुझें ॥
धरुनी निजरूपाची सोये । नामोच्चारें आळवूं पाहे ।
तेथेंचि प्रगट आहासि ठायें । अंतर्बाह्य व्यापका ॥
येऱ्हवीं नामरूप दोन्ही । जालीं कल्पनेपासुनी ।
निःशेष पाहतां तुझ्या गुणीं । नामरूप दोन्ही नास्तिक ॥
नास्तिकाचें नास्तिक । सोडोनि उरलें जें आस्तिक ।
तें तूं ब्रम्हनामें एकला एक । ज्ञानटिळक निजात्मा ॥
प्रतिबिंबाचें आभासकपण । तें मुख्य बिंबचि कारण ।
बिंब हेंही वाचारंभण । होणेंन विण आभासिका ॥
जग लक्षितां लक्षांशें । तंव लक्ष्य लक्षण तूंचि निःशेषें ।
तेथ लक्ष लक्षणा करुनि ऐसें । दुजें काइसें लक्षावें ॥

" नामामृतलहरी " ग्रंथाच्या उपसंहारांत ग्रंथरचनेचें प्रयोजन सांगून, थोडेंसें आत्मवृत्तही स्वामीनीं दिलें आहे.

" जो जनीं जनार्दन चोरिला । तो माग लावून दिजे वहिला ।
ना तरी चोरीचा आळ येईल तुला । म्हणूनी केला प्रबोध ॥
तेवीं संत पाठीराखे पाठीसी । माग काढिला स्वरूपेसी ।
त्या ओविया नव्हती प्रतीति ऐसी । ग्रंथाधारेंसी बोलिली ॥
येऱ्हवीं ग्रंथराज महाकवि । व्यास वाल्मीकादि बोलिलें सर्वी ।
तो सिद्धार्थ सांडुनी ठेवाठेवी । कासया करावी जाणीव ॥

आम्हा भाव तोचि देव । सद्गुरु संत वैष्णव ।
नाम तोचि सुखानुभव । आत्मत्व ठाव पावला ॥
येथ गुरुपरंपरापद्धति । तेही सांगूं ग्रंथांतीं ।
सकलाघ परब्रम्हसंविती । तोचि हंसगति ब्रह्म उपदेष्टा ॥
जो सहस्रदळपंकज सरोवरीं । हंसरूपें नांदे श्रीहरी ।
तोचि बुद्धि ब्रम्हयातें बोध करी । द्योतकांतरीं सर्वज्ञ ॥
तेणें स्वात्मजनित विधीनें । नारद तोचि नारायण ।
संबोधिला विद्यमान । ब्रम्हपरायण भागवत ॥
चित चेतनात्मक जाण । तेंचि नारादासी गमन ।
पावावया विश्रांतिस्थान । हरिकीर्तन पैं एक ॥
तोचि पूर्णाश्रय करूनि एक । कीर्तननिष्ठा नैष्ठिक ।
ब्रम्हचर्य अतिधार्मिक । धर्मस्थापक हिंडतुसे ॥
तेथ सर्वोत्कर्ष नामकीर्ति । पुण्यपावन त्रिजगतीं ।
ते प्रगट करूनि दावाया स्थिति । कर्मभूमिप्रती पैं आला ॥
तेथ दैवात् पूर्वार्जितें । कृपा केली सद्गुरुनाथें ।
तेचि सांगों यथोचित । दृष्टांत मतेंकरूनी ॥
कोण्ही एका प्राप्त समयीं । निद्रांतीं जागरोदयीं ।
ब्रह्मचारी येउनी पाहीं । निज निर्वाही प्रबोधी ॥
तेथ तत्वमसि ब्रम्हैक्य । सुचवूनियां महावाक्य ।
हरिनारायण प्रगटैक । भजनसुख सांगतु ॥
टाळवीणा देउनी । सावध केलें थापटुनी पाणी ।
जागृत होतां तेच क्षणीं । टाळ वीणा नयनीं देखिला ॥
ब्रह्मचारीदर्शन । स्वप्नीं देखत होतें मन ।
तें जागृतीमाजी न दिसे ध्यान । अंतर्धान पावलें ॥
तेणें विकळ संतोषें । क्षणैक वाटलें अपूर्व ऐसें ।
तोचि जगद्गुरु नारद ऐसें । निष्ठा मानसीं पैं केली ॥
तेंचि ब्रह्मरूप निष्ठाबीज । नयनीं उगवलें तेजःपुंज ।
तेणें स्वप्रकाश धवल सहज । निर्वाळलें चोज निजदृष्टि ॥
तो हा स्वयंबोध निराल्व परिपूर्ण । गुरुसंप्रदाय विशुद्ध गहन.

तें पूर्वापर जुनाट ब्रह्मज्ञान । हरिनारायण पावला ॥
हा नारदोक्ति मूळ मंत्र । श्रुतिस्मृतींचा मथितार्थ ।
हरिनारायण ब्रह्मसूत्र । नाम पवित्र तिहीं लोकीं ॥
या ग्रंथीं वरदान । सद्गुरुहीं दिधलें पसायदान ।
तेणें कृतकृत्य होऊनि पूर्ण । परम पावन पैं जालों ॥
ते हे नामामृतलहरी । सकळ शास्त्रांची खुळवरी ।
ते प्रगट करुनी निजनिर्धारीं । ग्रंथाधारीं दाविली ॥
हें सकळ ज्ञानाचें निजज्ञान । सकळ साधनांचें निजसाधन ।
सकळ भावाचा भाव पूर्ण । हरिनारायण तो येकु ॥
सकळ क्रियेचें क्रियाचरण । सकळ पठणाचें पठण ।
सकळ श्रवणाचें श्रवण । हरिनारायण तो येकु ॥
सकळ तीर्थांचें तीर्थाटण । सकळ शास्त्रांचें मथित पूर्ण ।
सकळ निश्चयाचा निश्चय जाण । हरिनारायण तो येकु ॥
सकळ विद्येची विद्या पूर्ण । सकळ गायनाचें निजगान ।
सकळ धर्माचा निजधर्म जाण । हरिनारायण तो येकु ॥
हा नामप्रताप सांगतां । लाजें विराली वाग्देवता ।
हरिनारायण गातां ध्यातां । बोधावस्था जालीसे ॥
हरिनारायण नामगान । करितां हरिनारायण जालें मन ।
विसरला पुढील आठवण । ग्रंथनिरूपण राहिलें ॥
येथ आपुला जैसा विसर । न होनि असिजे निरंतर ।
तेवीं पावूनि साक्षात्कार । भोगिजे साचार निजसुख ॥
पूर्णपणाचे शेवटीं । हरिनारायण भजन उठी ।
ते सेवन करूनि सुखसंतुष्टी । हरिनारायण पुष्टी पावला ॥
एवं ब्रह्मज्ञानयोग ब्रह्मार्पण । तें सहजीं सहज नामस्मरण ।
घटित आले हरिनारायण । अभंग परिपूर्ण पूर्णत्वें ॥

## अभंग.

देव जोडे ऐसा कांहीं । करा उपाय तो देहीं ॥
नका जाऊं अभिमानें । क्षणभंगुर हें जिणें ॥

माप लागलें शरीरा । अंतीं काळ ग्रासिल खरा ॥
म्हणे हरिनारायण । जोडी जोडा निजधन ॥ १ ॥

२

देव आहे सर्वां ठायीं । परि तो भावयासी (अभावासी?) नाहीं ॥
तेणें जालें हस्तांतर । जवळी असूनियां दूर ॥
मनबुद्ध्यादि इंद्रियें । त्यांसी कोण चाळित आहे ॥
म्हणे हरि नारायण । अवघें भ्रमासी कारण ॥ २ ॥

३

नाम सकळांसी तारक । नामें तरतो तिन्ही लोक ॥
म्हणूनियां नाम घोका । जाणें नाहीं यमलोका ॥
नामें स्थावर तारिले । आणि पातकी उद्धरिले ॥
म्हणे हरिनारायण । करा देवाचें चिंतन ॥ ३ ॥

४

देव भक्तांचा कैवारी । आलें विघ्न दूर करी ॥
ऐसा पहा अनुभव । शरण रिघुनियां भाव ॥
भक्त प्रल्हादाकारणें । स्तंभामाजी प्रगटणें ॥
म्हणे हरिनारायण । पांडवांसी रक्षी कोण ॥ ४ ॥

५

मीपण मी होतां देहबुद्धि जेव्हां ।
भोगियले तेव्हां नाना भोग ॥ १ ॥
आतां तुज ऐसा म्हणवीं लोकांतें ।
जे कां उचित तेंचि करा ॥ २ ॥
संचिताची दोरी प्रारब्ध भोगणें ।
जें कां क्रियमाण पावे पुढां ॥ ३ ॥
हरिनारायण म्हणे हा गौरव ।
जाणे तोचि सर्व सुखी जाला ॥ ४ ॥

६

रक्षीं रक्षीं परमेश्वरा । अनाथबंधु दीनकिंकरा ॥
फिरवी सुदर्शन चक्र । त्यासी कोण पाहे वक्र ॥
हरिनारायण सहकारी । अनंत विघ्नें तो निवारी ॥

## पदें.

१

गुरु तुझा सर्वस्वी आधार ॥ ध्रु० ॥
कलि काळासी दृष्टिसि नेणें । तूंची उतरीं पार ॥ १ ॥
कल्पना हे घडमोड करिशी । मिथ्या हा व्यवहार ॥ २ ॥
नाना भ्रांति तद्रूप करुनी । वरकड भूमीभार ॥ ३ ॥
हरिनारायण निशिदिनिं घेई । मुखीं हा उच्चार ॥ ४ ॥

२

आनंद झाला आनंद झाला । सद्गुरुराज ध्यानासि आला ॥ ध्रु० ॥
नवल आतां मी सांगूं काय । मन उन्मन केलें पाहे ॥ १ ॥
जगामाजी जगदीश ऐसा । जालासे विश्वास ॥ २ ॥
म्हणे हरिनारायण । ध्यान लागलें निशिदिनीं ॥ ३ ॥

लेखकप्रमादामुळें वरील पद्यें अगदींच अशुद्ध झालीं आहेत. त्यांस उपाय नाहीं.

हरिनारायण शके १६४७ सालीं समाधिस्थ झाले त्या वेळीं त्यांचें वय ६६ वर्षांचें होतें. त्यांची सर्व कविता त्यांच्या शिष्य-सांप्रदायी लोकांच्या संग्रहीं आहे; व ती प्रसिद्ध करण्याचें ते मनावर घेतील तर तसें करणें त्यांस अशक्य आहे असेंही नाहीं. कारण स्वामीच्या नांवावर त्यांना ज्या जमिनी मिळाल्या आहेत, व ज्यांचा

उपभोग ते आज मितीस घेत आहेत, त्यांच्या उत्पन्नांतून हें कार्य सहज होण्यासारखें आहे. परंतु, आपल्या योग्य कर्तव्याची जाणीव या लोकांस नसल्यामुळें त्यांच्याकडून अशीं सत्कार्ये होत नाहींत ही खेदाची गोष्ट होय. रामदास, तुकाराम, मोरया गोसावी, एकनाथ, जयराम, शिवदिन केसरी, मुक्तेश्वर वगैरे बऱ्याच संतकवींच्या वंशजांस मोठमोठीं उत्पन्नें सुटलीं आहेत, परंतु त्यांपैकीं एक कपर्दिकाही आजपर्यंत त्या कवींच्या ग्रंथप्रकाशनाकडे या वंशजांनीं कधीं खर्च केलेली नाहीं !

---

# गिरिधर

गिरिधर हे रामदाससांप्रदायी असून, त्यांची व त्यांच्या ग्रंथांची योग्यता त्या संप्रदायांत कांहीं विशेष आहे. श्रीनिवृत्तिराम व समर्थप्रताप हे गिरिधर स्वामीचे दोन ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले असून, त्यांतील समर्थप्रताप ग्रंथाच्या आरंभीं, धुळें येथील विद्वान्, प्रेमळ व शोधक रामदासी रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं स्वामीचें जें विस्तृत चरित्र दिलें आहे, त्याच्याच केवळ आधारानें हा संक्षिप्त लेख मी लिहीत आहें.

श्रीसमर्थ रामदासस्वामीच्या प्रसिद्ध शिष्यिणी वेणाबाई यांच्या "बाईयाबाई नामेंकरून कोणी शिष्यिणी होत्या, त्यांचे गिरिधर हे शिष्य होत. बाइयाबाईची विशेष माहिती उपलब्ध नाहीं. एकदां सहा महिने त्या केवळ सद्गुरुतीर्थ सेवून होत्या. बालपणींच त्यांना

श्रीरामदर्शन झालें होतें. दहीभाताचा नैवेद्य दाखवीत असतां प्रत्यक्ष श्रीराम त्यांच्या ताटांत जेवल्याची हकीकत श्रीसमर्थप्रताप ग्रंथाच्या ११ व्या समासांत गिरिधरांनीं सांगितली आहे. आपल्या वयाच्या ८४ व्या वर्षी बाइयाबाईनीं आपला अवतार संपविला." त्रिंबक, यशवंत व भीम या त्रिवर्गबंधूंसह गिरिधरांना बाइयाबाईंचा अनुग्रह होता. गिरिधरांचा जन्मशक उपलब्ध नाहीं, परंतु श्रीसमर्थांचा सहवास त्यांना कांहीं काळ घडला होता, यांत संशय नाहीं. श्रीसमर्थांच्या आज्ञेनें सज्जनगडावर त्यांनीं एकदां कीर्तन केल्याचा उल्लेख त्यांच्या एका कविताप्रकरणांत आढळतो. श्रीसमर्थांच्या चरित्रांतील कांहीं प्रसंग आपण स्वतः पाहिले आहेत, असें समर्थप्रतापाच्या पहिल्या समासांत त्यांनीं ह्मटलें आहे, यावरून त्यांचा जन्म शके १५७५ च्या सुमारास झाला असावा असें मानण्यास हरकत नाहीं. गिरिधर हे मूळचे मिरजतासगांवाकडे राहणारे; परंतु पुढें गुर्वाज्ञेवरून ते बिडापासून सात आठ कोस असलेल्या ईट गांवीं जाऊन राहिले; व तेथेंच त्यांचा मुख्य मठ आहे. स्वतः गिरिधरांनीं भिंतीवर काढलेली मारुतीची मूर्ती त्या ठिकाणीं अद्याप आहे. गिरिधरांस पुत्रसंतति नव्हती, एक कन्या मात्र होती. हल्लीं बीड येथें जे दोन मठ आहेत, त्यांपैकीं एक त्यांच्या कन्येच्या वंशजांचा असून, दुसरा त्यांचे बंधु भीम यांच्या वंशजांचा आहे. गिरिधरांचा सर्व काल श्रीगुरु व श्रीराम यांच्या भजनांत व नामसंकीर्तनांत गेला. श्रीसमर्थप्रतापासुद्धां त्यांचे एकंदर चाळीस ग्रंथ उपलब्ध झाले आहेत. याशिवाय अभंग, पदें वगैरे फुटकळ कविता बरीच आहे. त्यांच्या कवितेची एकंदर संख्या सुमारें २४००० होईल. त्यांच्या वरील

४० ग्रंथांपैकीं संकेतरामायणाचीं पहिलीं सहा कांडें बेणाबाईचीं असावींत असा रा. देव यांचा तर्क आहे.

गिरिधरांची बहुतेक सर्व कविता रा. देव यांस मिळाली आहे व त्यांच्या 'रामदासी' ग्रंथमालेंतून ही सर्व कविता यथाकालीं प्रसिद्ध होईल, अशी आशा आहे. गिरिधरांच्या एकंदर कावितेंत श्रीसमर्थां-विषयींचे शेंकडों प्रेमळ उल्लेख ठिकठिकाणीं आले आहेत.

## गिरिधरांच्या ग्रंथांची यादी.

| नांव. | पद्यसंख्या. |
|---|---|
| १ श्रीग्रंथभावार्थ ( श्लोक ) ( दासबोधाचा सारांश ) | २३० |
| २ ग्रंथान्वय ( अभंग ) ( यांत दासबोधाचे वीस दशक व दोनशें समास यांचीं नांवें आहेत. | २४५ |
| ३ श्रीदासबोध ग्रंथराजभावार्थ ( श्लोक ) | २७ |
| ४ श्रीआत्मानुभव ( ओव्या ) .... .... | ६९७ |
| ५ गुरुमार्ग ( अभंग ) .... .... | ७६ |
| ६ शिष्यभावार्थ ( ,, ) .... .... | ५३ |
| ७ श्रीगुरुआज्ञा ( ,, ) .... .... | ७८ |
| ८ श्रीगुरुरूप ( अभंग ) .... .... | १०५ |
| ९ शिष्यशासन ( ,, ) .... .... | १८६ |
| १० श्रीगुरुदीक्षा ( ,, ) .... .... | १७८ |
| ११ श्रीस्वामीदर्शन ( ,, ) .... .... | १२९ |
| १२ श्रीदेवदर्शन ( ,, ) .... .... | ११८ |
| १३ श्रीरामरूप ( ,, ) .... .... | ५२ |

| नांव | | | पद्यसंख्या |
|---|---|---|---|
| १४ श्रीसीतारूप ( ,, ) | .... | .... | ५४ |
| १५ प्राणनाथ ( ,, ) | .... | .... | ५२ |
| १६ योगीराज ( ,, ) | .... | .... | ५० |
| १७ दीक्षासंवाद ( ,, ) | .... | .... | १५४ |
| १८ साधुसंवाद ( ,, ) | .... | .... | ४५ |
| १९ श्रीगुरुदेवनमन ( ओवी ) | .... | .... | १२८ |
| २० देवसंवाद ( श्लोक ) | .... | .... | ७१ |
| २१ गुरुगीतार्थ ( अभंग ) | .... | .... | २३४ |
| २२ गुरुवाक्यमाला ( श्लोक ) | .... | .... | १६१ |
| २३ श्रीशिवरहस्य ( ,, ) | .... | .... | १०२ |
| २४ लोकस्वभाव ( ओवी ) | .... | .... | २५ |
| २५ श्रीकृष्णकथातरंग ( ,, ) | .... | .... | १७३ |
| २६ हरिलीला ( श्लोक ) | .... | .... | ४५४ |
| २७ नानापंथ ( पदें ) कडवीं | .... | .... | ५० |
| २८ हकिकत वाके ( कडवीं ) | .... | .... | १४७ |
| २९ काशीयात्राकथन ( अभंग ) | .... | .... | १०६ |
| ३० काशीखंड ( अभंग ) | .... | .... | ३०४८ |
| ३१ श्रीसमर्थकरुणा ( श्लोक ) | .... | .... | १०९ |
| ३२ श्रीकरुणाराम ( श्लोक ) | .... | .... | १८२ |
| ३३ श्रीकरुणारुद्र ( ,, ) | .... | .... | १२१ |
| ३४ अद्भुतरामायण ( ,, ) | .... | .... | १८३ |
| ३५ मंगल रामायण ( ,, ) | .... | .... | १६१९ |
| ३६ छंदो रामायण ( ओव्या ) | .... | .... | १५५६ |

| नांव | | | पद्यसंख्या |
|---|---|---|---|
| ३७ सुंदर रामायण ( ,, ) | .... | .... | ७४९ |
| ३८ संकेत रामायण | .... | .... | ६७४१ |
| ३९ निवृत्तिराम ( ओव्या ) | .... | .... | २०१६ |
| ४० श्रीसमर्थप्रताप ( ,, ) | .... | .... | १३३२ |
| ४१ स्फुट कविता ( श्लोक, पदें वगैरे ) सुमारें | | | १५०० |

गिरिधरांची सर्व कविता, दिनकरबुवांच्या कवितेप्रमाणेंच, अगदीं थेट रामदासी पद्धतीची आहे. जेमतेम अर्थबोध झाला ह्मणजे झालें, मग बाह्य थाटमाट कसाही असो, या भावनेनेंच श्रीसमर्थ सांप्रदायांतील बहुतेक सत्पुरुषांनीं काव्यरचना केलेली दिसते. त्यामुळें भाषाशुद्धि किंवा वृत्तशुद्धि यांजकडे फारसें लक्ष देणें त्यांस अगत्याचें वाटलें नसावें. तथापि त्यांच्या कवितेंत जो एक प्रकारचा जिवंतपणा—चैतन्य-आहे, त्याच्या योगानें त्या कवितेस मोठा भारदस्तपणा प्राप्त झालेला आहे. उपरिनिर्दिष्ट लेखांत रा. देव यांनीं गिरिधरांच्या सर्व ग्रंथांतील निवडक उतारे देऊन, त्यांचें जें मार्मिक विवेचन केलें आहे, तें अत्यंत वाचनीय आहे. रा. देव ह्मणतात " गिरिधर महंतांनीं आयुष्यभर ( काव्यरचनेशिवाय ) दुसरा कांहीं व्यापार केला नाहीं, असें वाटतें. आज आपणास नुसती कल्पना करावयाची आहे; पण, खरोखर अशा महंतांच्या संगतींत राहून हजारों शिष्य ज्ञानार्जन करून कृतार्थ होत असतील यांत मला कांहीं शंका वाटत नाहीं........त्या काळीं हीं विद्यापीठें ( मठ ) केवढालीं तरी असलीं पाहिजेत ! या प्रत्येक रामदासी विद्यापीठांत मोठा थोरला ग्रंथसंग्रह असे. पूर्वकालीन यच्चयावत् सर्व साधुसंतांच्या संस्कृत प्राकृत ग्रंथांचा

संग्रह या विद्यापीठांतून केलेला असे. श्रीज्ञानेश्वर, मुकुंदराज, नामदेव, मुक्ताबाई, एकनाथ, तुकाराम, श्रेष्ठ, पूर्णानंदाचे शिवराम, मुक्तेश्वर, उद्धवचिद्घन, वामनपंडित, केशवस्वामी, रंगनाथस्वामी, वेणीस्वामी, राघवरंक, शिवदिन केसरी, मालो, बोधला, कृष्णदयार्णव, चिंतामणिसुत मुद्गल ( मुक्तेश्वरच ? ), विष्णुदास नामा, शिवतनय, कोकिळगंगाधर, हरिहर, शाम, वासुदेव, नृहरिसुत, रावत्रसुत, रंगेशात्मज, शिवात्मज रघुनाथ, बहिरा, किंकर, महिपाति इत्यादि ज्ञात आणि अज्ञात अशा कित्येक सत्पुरुषांचे ग्रंथ आजही गिरिधरांच्या मठांत आहेत. शके १५६७ त लिहिलेली वाल्मीकिकृत रामायणाची प्रत या मठांत आहे. भीम, नरहरी इत्यादिकांचीं गिरिधरांवर अष्टकें आहेत. आणखी एक अपूर्व वस्तु या मठांत मला पहावयास मिळाली. गिरिधरांना सर्व दासबोध मुखोद्गत होता; दोन अडीच बोटें रुंद व आठ बोटें लांब अशी एक उभी शिवलेली, मुठींत राहाण्यासारखी त्यांची वही आहे. तींत क्रमशः एकाखालीं एक, दासबोधांतील ओव्यांच्या आरंभींचे दोन दोन तीन तीन शब्द लिहिलेले आहेत. ही वही गिरिधर नेहमीं हातांत ठेवीत असत, व चालतां बोलतां, धंदा करितां, तिच्याकडे पाहून सर्व दासबोधाचें, न जाणों प्रत्यहीं, एक पारायण करीत असत. ”

श्रीगुरुचरणसेवेंत आपलें बहुतेक सर्व आयुष्य खर्चून शके १६५१ वैशाख शुद्ध अष्टमी, शुक्रवारीं, गिरिधरस्वामी समाधिस्थ झाले. बीडास गांवाबाहेर नदीच्या कांठीं उंचवटयावर गर्द झाडींत एक मोटें थोरलें आवार चौफेर मजबूत कोटवजा भिंती बांधून केलेलें असून, त्यांत गिरिधर व त्यांच्या मागून झालेले मठपति यांच्या समाधि

आहेत. त्या आवारांत एकंदर आठ समाधिमंदिरें आहेत. स्थान रम्य व निवांत आहे. गिरिधरांच्या मंदिरावर पुढील श्लोक कोरलेला आहे:—

" श्रीराम ॥ श्रीमत्सन्नृपशालिवाहन शके चंद्रेषु भपोन्मिते ।
सौम्ये माधवशुक्लशुक्रदिवसेष्टम्यां प्रभाते विभुः ॥
श्रीरामानुचराग्रगो गिरिधरस्त्वासीत्समाधिस्थितो ।
यस्तस्यानुज भीमनिर्मितमिदं रम्यं तदीयं स्थलं ॥ "

हल्लीं बीड येथें जे दोन मठ आहेत, त्यांपैकीं एक गिरिधरांचे धाकटे बंधु भीम यांच्या वंशजांचा व दुसरा त्यांच्या कन्येच्या* वंशजांचा आहे. उभय मठांची परंपरा येणेंप्रमाणें:—

श्रीरामदास
|
वेणाबाई
|
बाइयाबाई
|

| | | | |
| --- | --- | --- | --- |
| गिरिधर | त्रिंबक | यशवंत | भीम |
| साळूबाई | | | गोविंद |
| माणिक्य | | | नारायण |
| सखाराम | | | रघुपति |
| राजाराम | | | सीताराम |
| रामबुवा ( विद्यमान ) | | | रामकृष्ण |
| | | | श्रीराम |
| | | | सीताराम (विद्यमान) |

* हिचें नांव साळूबाई असावें असें एका जुन्या वर्जरोल्यावरून वाटतें.

गिरिधरांच्या पश्चात् यशवंतबुवांनीं परंपरा चालविली. यशवंतबुवा ब्रह्मचारी होते. ते शके १६८० त समाधिस्थ झाले. त्यांच्या पश्चात् माणिक्य आणि गोविंद अशा दोन शाखा निघाल्या. लौकिकांत गिरिधरस्वामीस गिरमाजी व भीमस्वामीस भिवाजी म्हणत.

गिरिधरस्वामीच्या ग्रंथांतले कांहीं वेंचे येथें देऊन हा संक्षिप्त चरित्रलेख पूर्ण करूं. श्रीग्रंथभावार्थ या ग्रंथांत त्यांनीं दासबोधाचा भावार्थ दिला आहे. ग्रंथान्वय, श्रीदासबोधग्रंथराजभावार्थ व श्रीआत्मानुभव हेही ग्रंथ दासबोधविषयकच आहेत. श्रीआत्मानुभव ग्रंथांत गिरिधर ह्मणतातः—

येकांत वनीं उपवनीं । येकांत भुवनीं ब्रह्मभुवनीं ।
गुरुदेवसदनीं परमात्मसदनीं । अध्यात्म ग्रंथ पाहावे ॥
नाना सुमनवाटिका आरामें । देवदेवालयें एकांत धामें ।
श्रवणमननें पूर्णकामें । अध्यात्म ग्रंथ वाचावे ॥
नाना परोपकाराकारणें । सद्गुरुनाथें केलें धांवणें ।
वेदशास्त्रसंमत वचनें । अध्यात्म ग्रंथ विवरावे ॥

गुरुमार्ग, शिष्यभावार्थ, श्रीगुरुआज्ञा, श्रीगुरुरूप, शिष्यशासन व गुरुदीक्षा या ग्रंथांत गुरुशिष्यसंबंधाचें उपदेशात्मक विवेचन आहे. श्रीस्वामीदर्शन या प्रकरणांत श्रीसमर्थांच्या दिनचर्येचा उल्लेख असल्यामुळें तें प्रकरण सांप्रदायी लोकांस विशेष महत्वाचें आहे. समर्थांच्या सहवासांत गिरिधरांनीं कांहीं दिवस घालविल्यावर, एके दिवशीं समर्थांनीं त्यांस एकांतांत बुद्धिवाद सांगून स्वस्थलीं जाण्याची आज्ञा केली. त्या वेळीं गिरिधरांस फार वाईट वाटलें, त्या प्रसंगाचें वर्णनः-

असुं आलें मग पल्लवें पुसिलें । आश्वासन दिल्हें काय देवें ॥
काय देवें दिल्हें आश्वासन ऐका । येक वेळे देखा यावें लागे ॥

यावें लागे येक वेळे, सांभाळाया । आम्हावांचूनियां कोण आहे ॥
कोण आहे तूज आम्हावांचूनियां । कळला भाव वायां खंति काय ॥
खंति काय जाले प्रसंग आठवीं । अनन्य स्वभावीं देवभक्त ॥
देव भक्त येक कळला विवेक । ग्रंथाधारें लोक प्रबोधिसी ॥
प्रबोधिसी तेथें काय भिन्न आहे । अर्थ पूर्ण पाहे विचाराचा ॥
विचाराचा अर्थ नित्य बोलतोसी । खंति करितोसी नवल मोठें ॥
नवल मोठें वाटे भक्तीची आवडी । राहों यावी जोडी भक्तिप्रेमें ॥
भक्तिप्रेमें जोडी असोहि विदेसीं । आहों तुजपासीं सर्व काळ ॥
सर्व काळ आहों वचन प्रमाण । प्रसंग जाणून भेटी आणूं ॥
भेटी आणूं कांहीं खंति न करावी । नौमी * आठवावी रात्रिदिवस ॥
रात्रि दिवस ध्यान नौमीचें करावें । गिरिधर देवें आज्ञापिला ॥

श्रीदेवदर्शन या ग्रंथांत, प्रत्यक्ष भेटींत श्रीसमर्थांनीं जो उपदेश केला, त्याचा संग्रह गिरिधरस्वामींनीं केला आहे. श्रीरामरूप या ग्रंथांत श्रीरामाच्या सगुण व निर्गुण अशा दोन्ही स्वरूपांचें वर्णन आहे. "सगुणाचा सारखा ध्यास घेतला ह्मणजे सर्व सृष्टि कशी राममय होते, तें गिरिधरांनीं या प्रकरणांत दाखावेंल आहे." ते आपला स्वानुभव सांगतात:—

दृढ मनीं रामरूप हें धरिलें । दृश्य हें सारिलें कैसें पाहा ॥
पाहा पाहा आतां कल्पनासंभ्रम । राम राम राम राम जाला ॥
राम जाला ब्रह्मगोळ हा सकळ । येकेक प्रांजळ बोलूं आतां ॥
बोलूं आतां लोक मला न दिसती । राम सीतापति सर्व जाले ॥

श्रीसीतारूप या ग्रंथांत मायेच्या स्वरूपाचें वर्णन आहे. प्राणनाथ या ग्रंथांत वायुसुत जो मारुती त्याच्या विश्वव्यापक स्वरूपाचें वर्णन आहे.

---

* रामनवमी.

योगिराज या ग्रंथांत ब्रह्म आणि योगी एकच असें निरूपण करून ' योगियांचा योगी स्वामी माझा ' या शब्दांनीं श्रीसमर्थांचा उल्लेख केला आहे. दीक्षासंवाद या ग्रंथांत रामनाम, ब्रह्मज्ञान, विज्ञान, विवेक, वैराग्य, संतसंग, पर्यटन, ब्रह्मचर्य, रामोपासना इत्यादि विषयांचें विवेचन आहे.' साधुसंवाद या ग्रंथांत भिन्न सांप्रदायांच्या दोघां साधूंचा संवाद आहे. श्रीगुरुदेवनमन या गोड प्रकरणांत श्रीगुरुदेवाला नमन केलें आहे. देवसंवाद या ग्रंथांत 'इंद्र, ब्रह्मा, विष्णु, महेश हे सारे श्रीरामाचींच स्तोत्रें गातात ' असें वर्णिलें आहे. यांत इंद्रास अनुलक्षून कवि ह्मणतातः—

श्लोक.

बंदांतुनी देव समस्त रामें । सोडोनि यावे भुवनैकरामें ॥
ऐसा कृपाराम समर्थ माझा । इंद्रा अम्हा काय हिसाब तूझा ॥

श्रीरामोपासकाला इंद्राचें वैभव देखील तुच्छ वाटावें यांत आश्चर्य काय ? गुरुगीतार्थ या प्रकरणांत संस्कृत गुरुगीतेचा साद्यंत अर्थ मराठी भाषेंत दिला आहे.

" मुखोद्गत तुम्हा गुरुगीता आहे । अर्थ कैसा काय निरूपावा ॥ "

असें भाषण श्रोत्याच्या तोंडीं गिरिधरांनीं घातलें आहे, यावरून त्यांस संस्कृत गुरुगीता मुखोद्गत होती, हें उघड दिसतें. गुरुवाक्यमाला या ग्रंथाच्या पहिल्या ८५ श्लोकांत आत्मज्ञान सांगितलें आहे व पुढें ५० श्लोकांत श्रीगुरूंनीं शिष्याला वरप्रदान केलें आहे. श्रीशिवरहस्य हें प्रकरण पद्मपुराण व लिंगपुराण यांच्या आधारानें लिहिलें आहे.

यांत नामस्मरण हाच सर्वांत सुगमोपाय आहे, असें सांगितलें आहे. लोकस्वभाव ग्रंथांत गिरिधर ह्मणतातः—

ओव्या.

जो जो प्राणी जन्मासि आला । तो तो देहाभिमानेंचि गेला ।
त्यामध्यें कोणी विरळा । प्रबोधनिवळा निवळला ॥
जो तो म्हणे आम्ही थोर । कोण पाहे सारासार ।
माझी वर्तणूक परपार । पाववी भवाच्या ॥
परपार हेंहि नाहीं । मीच अवघा सर्व कांहीं ।
साधुसंत कैंचे काई । कोठून आले ॥
शूद्र निंदिती ब्राह्मणास । ब्राह्मण निंदिती आणिकास ।
परस्परें यातीपातीस । थोरपणें उडविती ॥

श्रीकृष्णकथातरंग व हरिलीला या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीकृष्णाच्या बाललीलेचें वर्णन केलें आहे. श्रीराम आणि श्रीकृष्ण यांच्या ऐक्यभावासंबंधानें हरिलीला ग्रंथांत गिरिधर ह्मणतातः—

रघुविरभजनाची मुख्य आजन्म दीक्षा ।
यदुविरभजनाची रामरूपें अपेक्षा ॥
यदुपति रघुराजीं ऐक्यरूपें मिळाला ।
श्रवण करुत आतां संतश्रोते तयाला ॥

'नाना पंथ' या प्रकरणांत निरनिराळया पंथांवर ५० कडवीं आहेत. 'हकिकत वाके' (कडवीं १४७) यांत स्वात्मबोध, दिक्पाळ, नवग्रह, महर्षि, पंचीकरण, ब्रम्हगोळ, दैवी, पंथी, निवेदनी आणि राजशासनी, अशा १० सदरांखालीं श्रीसमर्थ रामदासस्वामीस दहा पत्रें लिहिलीं आहेत. काशीयात्राकथन या प्रकरणांत, गिरिधरांनीं

शके १६३९ च्या सुमारास केलेल्या काशीयात्रेचें वर्णन आहे. रा- देव लिहितात:— "वेणीस्वामी व श्रीसमर्थ यांच्या पादुकांस नमन करून गिरिधरस्वामी निघाले, ते माहुली, पंढरी करून गोदावरी-तीरास आले. गोदावरीच्या कांठीं कुठें मुक्काम केला, त्या ठिकाणाचें नांव त्यांनीं दिलें नाहीं; पण काशीखंड ग्रंथ लिहिण्यास त्या ठिकाणीं सुरुवात करून यात्रा पुढें चालविली. मार्गांत पवित्र नद्या लागत, तेथें स्नानार्थ मुक्काम करीत, तीर्थें लागत त्या त्या ठिकाणीं तीर्थविधि करीत, त्यांचीं माहात्म्यें श्रवण करीत. पयोष्णी, पूर्णा, नर्मदा इत्यादि नद्यांचीं स्नानें होऊन, अनेक सुगम दुर्गम स्थलें ओलांडून, यात्रा चित्रकूटास पोंचली. तेथें भरतप्रेमाची आठवण होऊन गिरिधर प्रेमभरित झाले. पयस्विनी, कालिंदी, यमुना यांचीं स्नानें करून माघस्नानाला गिरिधरांनीं प्रयाग गांठलें. माघमासाचा पहिला पंधरा-वडा तेथेंच कंठून काशीखंडाचा पूर्वार्ध तेथेंच समाप्त केला. नंतर, समर्थांची पुण्यतिथि साजरी केल्यावर यात्रा पुढें चालली. गुहाचें शृंगवेर अवलोकन करून व गोमती, तमसा उल्लंघून यात्रा अयो-ध्येस पातली. अयोध्येचें दर्शन होतांच गिरिधर ह्मणतात:—

........................ । पापें गेलीं भंगा क्षणमात्रें ।
क्षणमात्रें पापें नसतां पदरीं ।। गेलीं हे उत्तरीं कोण बोले ? ।
कोण बोले पापपुण्य सरयुतीरीं ।। जेथें नांदे हरि आत्माराम ।
निरंतर वृत्ति नौमीं विश्रामली ।। रामआज्ञा जाली गयागमने ।

गयेस जातांना गिरिधरांस पुनः शरयुदर्शन घडलें व त्यामुळें:—

....................... । ध्यान आठवलें अयोध्येचें ।।
अयोध्येचा राम विश्रामा विश्राम । तारक हें ब्रह्म स्वानंदाचें ।।
स्वानंदाचा घन श्रीराम बोळला । बरा काळ गेला सरयतीरीं ।।

गयेस यात्रा चैत्रांत पोंचली. तेथें पिंडदानादि सर्व विधि उरकून यात्रा ज्येष्ठांत काशीस येऊन दाखल झाली. गिरिधरांचा चातुर्मास मुक्काम तेथेंच होता. काशीसंबंधानें ते ह्मणतातः—

वर्णवेना मुक्तपुरीचा स्वानंद । जेथें परमानंद शिव स्वयें ॥
शिव स्वयें काशीखंडीं श्रवणीं बैस । वाणी वदवीतसें काशीखंडीं ॥

गुरुकृपेनें यात्राहेतु सफल होऊन काशीखंड ग्रंथही काशीसच संपूर्ण झाला. काशीखंडाची अभंगसंख्या ३९४८ आहे. स्कंदपुराणांतर्गत संस्कृत काशीखंडाच्या आधारानें हा ग्रंथ लिहिला आहे. यांशिवाय 'शिवदास गोमा' नामक कवीचें ओवीबद्ध काशीखंड प्रसिद्ध आहे, तें पुष्कळांच्या अवलोकनांत आलेंच असेल. श्रीसमर्थ-करुणा या प्रकरणांत गिरिधरांनीं श्रीसमर्थांना परोपरीनें आळविलें आहे. श्रीकरुणाराम या प्रकरणांत श्रीरामाची करुणा भाकिली आहे. श्रीकरुणारुद्र या प्रकरणांत "श्रीहनुमंताची करुणा भाकीत एकंदर हनुमंतचरित्र क्रमशः निवेदन केलें आहे." वरील सर्व स्तोत्रें फार प्रेमळ आहेत. भद्ररामायण या ग्रंथांत रामायणांतील कथा काल-क्रमानुसार-तिथी, महिना वगैरे-दिली आहे. मंगलरामायणांतही रामचरित्रच गायिलें आहे. ग्रंथारंभीं गिरिधर ह्मणतातः—

आधीं मंगल शारदा गणपती श्रीसद्गुरु गायिला ।
कृष्णातीरनिवास वास बहुसा ऊदाससा पाहिला ॥
ज्याची कीर्ति जगांत होउनि पुढें भेदीत गेली चढे ।
कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम् ॥

या ग्रंथाचे एकंदर श्लोक १६१९ असून त्या सर्वांच्या शेवटीं "कुर्यात् मंगल राघवं विजयते रामायणं मंगलम्" हा एकच चरण

आहे. या ग्रंथांतले बरेच श्लोक रा. देव यांनीं ‘ श्रीसमर्थप्रताप ’ ग्रंथाच्या प्रस्तावनेंत दिले आहेत, परंतु ते येथें उतरून घेण्यास स्थलावकाश नाहीं. ‘छंदोरामायण’ या ग्रंथासंबंधानें रा. देव म्हणतातः– “श्रीसमर्थ, वेणाबाई व बाइयाबाई असा हा त्रिवेणीसंगम होय, आणि ह्मणून पुष्कळ वेळां गिरिधरांनीं आपल्या परंपरेला त्रिवेणी ह्मणून संबोधिलें आहे. त्रिवेणीच्या ऐवजीं या रामायणांत गिरिधरांनीं नुसता नदीच शब्द योजिला आहे.

गिरीगुहांत राहणें । जनीं अभिष्ट पाहणें ।
समर्थस्वामि ते गुरु । नदी म्हणे जगद्गुरु ॥
श्रीरामदासस्वामिचें । चरित्र सर्व तेथिंचें ।
हरादिकां न वर्णवे । नदीस केवि वर्णवे ॥

या ठिकाणीं व इतरत्रही या रामायणांत त्रिवेणीऐवजीं नदी शब्द योजिला आहे. नदी ह्मणजे त्रिवेणी व पर्यायानें तद्रूपता पावलेले गिरिधर होत. ” या रामायणांत युद्धकांडाचाच फार विस्तार केला आहे. श्रीसमर्थांना युद्धकांड फार आवडत असे. सुंदरकांडांत मारुतीचा पराक्रम आहे ह्मणून व युद्धकांड आवडतें ह्मणून श्रीसमर्थांनीं हीं दोनच कांडें वर्णिलीं आहेत.

वरील रामायणाशिवाय सुंदर रामायण ( श्लोक ७४९ ) व संकेत रामायण ( ओव्या ६७४० ) अशीं आणखीं दोन रामायणें गिरिधरांनीं लिहिलीं आहेत. त्यांच्या सर्व ग्रंथांत संकेत रामायण हा ग्रंथ मोठा आहे. या ग्रंथाच्या स्वरूपाविषयीं रा. देव ह्मणतात “पहिल्या सहा कांडांची भाषा शेवटच्या कांडांच्या भाषेहून निराळी दिसते. **वेणाबाईच्या सीतास्वयंवराची** जी भाषापद्धती ती पहिल्या सहा

कांडांत दिसते, व उत्तरकांडाची भाषा **श्रीसमर्थप्रताप** किंवा निवृत्तिराम ग्रंथासारखी दिसते." सदरहू ग्रंथ गिरिधरांनीं शके १६४४ त गोदातीरीं संपूर्ण केला. या ग्रंथाचे एकंदर सर्ग १८८ आहेत. निरनिराळ्या नांवांचीं अनेक रामायणें लिहिण्याची ही कल्पना मूळची **गिरिधरांची** असें आतां स्पष्ट ह्मटलें पाहिजे. **निरंजन माधव** व **मोरोपंत** या दोन कर्त्यांनीं, अनेक रामायणें लिहिण्याचीं ही कल्पना गिरिधरांचीं रामायणें पाहूनच उचलली कीं काय हें समजण्यास मार्ग नाहीं. रामकथा पुनःपुनः सांगण्याचें कारण गिरिधरांनीं दिलें आहे तें असें:—

नाना सकाम कथा सृष्टीवरी । रामकथेची न पवती सरी ।
कां जे आत्माराम चराचरीं । तारक ब्रह्म सर्वत्र हें ॥
शिवकंठींचा अग्नि विझविला । ब्रह्महत्यारा कवि आदि केला ।
त्रैलोक्य तेणें पावन जाला । शतकोटी रामायणें ॥
आदिकाव्य हें रामायण । जें नव्हतें कोणाचें आख्यान ।
नाना पुराणें माहात्म्यकथन । शास्त्रसिद्धांत रामायणीं ॥

गिरिधरांच्या श्लोकबद्ध ग्रंथांपेक्षां त्यांचे ओवीबद्ध ग्रंथ अधिक सुरस आहेत. प्रस्तुत **सुंदर रामायण** हा ग्रंथ खरोखरच फार सुंदर आहे. मखरक्षणासाठीं विश्वामित्र रामाला मागावयास दशरथाकडे आले व पुष्कळ होय नाहीं होऊन अखेरीस रामलक्ष्मणाना विश्वामित्रांबरोबर पाठविण्याचें ठरलें तेव्हां राम आईची आज्ञा मागावयास गेले असतां तिला ह्मणतात:—

ब्राह्मणाच्या कार्याकारणें । अवतार घेतले नारायणें ।
ह्मणोनि माये आज्ञा देणें । द्विजां रक्षणें उचित ॥
देव ब्राह्मण अग्निपूजनें । नाना योग याग व्रतें दानें ।

नाना तपें तीर्थाटणें । माते रक्षणें उचित ॥
नाना पुरश्चरणें अनुष्ठानें । नाना योग नाना साधनें ।
आत्मचिंतनें स्वानंदभुवनें । स्वधर्म रक्षणें उचित ॥
ब्रह्मनिष्ठ ब्राह्मण जेथें । सर्व सांडोनि धांवणें तेथें ।
नाना वैष्णवी माया भक्तजनातें । क्षणीं बाधील म्हणूनियां ॥

\+ + +

निःकाम भजनें सर्वस्वत्याग । मजनिमित्त मांडिती योगयाग ।
आत्मचिंतनें भवस्वर्गभोग । तुच्छ करिती स्वानंदें ॥
ऐसे योगी दुर्लभ जगीं । धुंडित चालिले वीतरागी ।
ऐसया कारणें मजलागीं । अवतार घेणें निर्धारें ॥
पूर्वी सूतिकागृहीं दिधलें दर्शन । माते तुजला असेल स्मरण ।
सुरसाधु धर्मधरारक्षण । करावया मी अवतरलों ॥

शिलारूप गौतमभार्या अहल्या, रामचरणस्पर्शानें स्वतःचा उद्धार-काल समीप येतांच, अगदीं उतावीळ होऊन श्रीरामाची करुणा भाकतेः—

म्हणे देवा कैं तूं येशील । कैं तूं आतां भेटी देशील ।
आपुल्या पदा कैं तूं नेशील । थोर आपदा चिरकाळें ॥
तूं जळीं स्थळीं काष्ठीं पाषाणीं । ऐसी वदे समर्थवाणी ।
तरी कां नव्हे माझी धांवणी । जगदानंदा जगद्गुरु ॥
आत्माराम म्हणती तूतें । तरी कां दर्शन नव्हे मातें ।
भवितव्य भाविनि विधि कर्मातें । संचित प्रारब्ध कुमरिला ॥
मी भ्रमें जाल्यें जडमूढ शिळा । परी तूं जीवींचा जिव्हाळा ।
चरणप्रताप दावीं अवलीळा । कीर्ति गाजो त्रैलोक्यीं ॥

पुढें, श्रीरामचरणस्पर्शानें पूर्ववत् स्त्रीरूप प्राप्त होतांचः—

तात्काळ अहल्या लागली रामपायीं । म्हणे माझे श्रीराम आई ।
इतुके दिवस कवणे ठायीं । विगुंतलीस जननिये ॥
कैलासीं शंकरें गोविलीस । सुटका जालिया धांवलीस ।
राम माउली सावकाश । आतां न विसंबें हृदयांतुनी ॥

अयोध्येच्या लोकांना श्रीरामाचा कसा ध्यास लागला होता त्याचें वर्णनः—

राम सकळांसी व्हावा । राम सकळांचा विसांवा ।
राम सकळांनीं चिंतावा । राम ध्यावा जनांनीं ॥
घरीं क्रमेना क्षणभरी । अन्य न भावे अंतरीं ।
तिष्ठत उभीं राजद्वारीं । राम पाहों म्हणुनियां ॥
बाळ तारुण्य आणि वृद्ध । सकळां लागला रूपवेध ।
जेथें तेथें बोधप्रबोध । जयजयराम होतसे ॥
जिकडे तिकडे रामराम । गल्लोगल्लीनें रामराम ।
बिदीं बाजारीं रामराम । पूर्णकाम चिंतिती ॥
जातां येतां रामराम । काम करितां रामराम ।
सर्वांचा तो अंतर्याम । म्हणोनि रामराम चिंतिती ॥
खातां जेवितां रामराम । उठतां बैसतां रामराम ।
अशनीं शयनीं रामराम । मंगळधाम चिंतिती ॥

*   *   *

कोण भाग्य हो आमुचें । थोर पुण्य पूर्वजांचें ।
कोण सुकृत सांचिलें साचें । रूप रामाचें देखिलें ॥

रामदासांची रामभक्ति कशी जाज्वल्य असली पाहिजे, हें गिरिधरांनीं खालील ओव्यांत सांगितलें आहे:—

राम म्हणतां देहभाव जावा । तेंचि घडलें त्यास देवा ।
राया दशरथानें जीवा । जयजयरामें वोवाळिलें ॥

\+   \+   \+   \+

किंवा देह असतां भजन । करावें गुणानुवादकीर्तन ।
कीं बरव्या रीतीनें पूजन । लक्ष्मणासारिखें करावें ॥
सकळांसी कैंचें श्रीरामअर्चन । तरी करावें प्रतिमापूजन ।
तेथें ठेऊनि अंतःकरण । चापपाणी चिंतावा ॥

गिरिधरांनीं प्रस्तुत रामायण एकट्या वाल्मीकी रामायणाच्याच आधारानें लिहिलेलें नाहीं, तर अग्निपुराण, ब्रह्मांडपुराण, स्कंदपुराण, पद्मपुराण, हनुमन्नाटक इत्यादि इतर पुराणग्रंथांतील रामकथांचाही समावेश त्यांनीं आपल्या ग्रंथांत केला आहे.

**निवृत्तिराम** या ग्रंथाच्या ओंव्या २०१६ असून हा ग्रंथ दोन वेळ छापून प्रसिद्ध झाला आहे. "या ग्रंथाचे बावीस समास आहेत. पहिल्या समासांत श्रीसमर्थआख्यान, दुसऱ्यांत गुरुकृपास्तवन, तिसऱ्यांत ब्रह्मानुभव व चवथ्यांत दासबोधग्रंथानुभव सांगून पुढें मनमाया, अहंमाया अहंममता, भक्ति, ज्ञान, वैराग्य, भवोपसर्ग, संकल्प, प्रपंच, अभ्यास, स्वर्गकाम, ब्रह्मगोळ, सृष्टिक्रम, भेदाभेद, प्रत्यक्ष ग्रंथराज ( दासबोध ), मूळ माया, पंचीकरण, सर्व सिद्धांत इत्यादि सर्व गोष्टी पूर्वपक्षांतच कशा येतात व त्या सर्वांची निवृत्ति होऊन " निखिळ परब्रह्म केवळ निर्गुण " कसें उरतें तें स्पष्ट करून दाखविलें आहे.

**श्रीसमर्थप्रताप** हा ग्रंथही धुळें येथील सत्कार्योत्तेजक मंडळीनें प्रसिद्ध केला आहे; व त्याच्या प्रस्तावनेंत रा. शंकर श्रीकृष्ण देव यांनीं जें प्रेमळ विवेचन केलें आहे तें सर्वांनीं अवश्य वाचण्यासारखें आहे. **श्रीसमर्थप्रताप** ग्रंथांत गिरिधरांनीं श्रीसमर्थ रामदासस्वामीचें चरित्र प्रेमळ भाषेंत गाइलें आहे. या ग्रंथाची ओवीसंख्या १३३२ आहे.

उपरिनिर्दिष्ट ग्रंथांशिवाय गिरिधरांची, श्लोक पदें वगैरे स्फुट कविता सुमारें १५०० आहे ! यावरून त्यांनीं आपलें बहुतेक आयुष्य ग्रंथलेखनांतच कसें घालविलें हें दिसून येईल. परमार्थाशिवाय अन्य

विषयांवरही त्यांनीं कांहीं कविता केल्या आहेत; प्राकृत व्याकरणावर त्यांचे ८४ व संस्कृत व्याकरणावर २५ श्लोक आहेत ! हें सगळें प्रचंड वाङ्मय अर्वाचीन वाङ्मयदृष्टीनें जरी कांहीं विचिकित्सकांस विशेष महत्त्वाचें वाटलें नाहीं, तरी रामदास सांप्रदायी लोकांच्या दृष्टीनें त्याचें महत्त्व फार आहे हें कोणासही नाकबूल करितां येणार नाहीं. गिरिधरांच्या कवितेविषयीं रा. देव यांनीं पुढील उद्गार काढले आहेत:—

" आजही गिरिधरांची वाणी जिवंत भासते, मग त्या काळीं जेव्हां ती प्रत्यक्ष त्यांच्या मुखांतून निघून जनाच्या श्रवणीं पडत असेल तेव्हां हजारों लोक त्यांच्या भजनीं लागून श्रीरामनवमीस श्रीक्षेत्र चांफळास जात असतील, हें काय सांगावयास पाहिजे ? अशा सत्पुरुषांनीं व निष्ठावंत सांप्रदायिकांनीं या सांप्रदायाची अनन्य भावानें सेवा केली म्हणून आजही आपणास तो सांप्रदाय स्फूर्तिदायक होत आहे. "

" गिरिधर वृद्ध झाले होते तरी देखील श्रीरामक्षेत्र चांफळ व श्रीरामक्षेत्र सज्जनगड या दोन स्थळांच्या दर्शनाविषयीं त्यांची उत्कंठा यत्किंचित्‌ही कमी झाली नाहीं !

गळित शरिर जालें दर्शनीं शक्ति द्यावी ।
त्वरित सदय देवें आस हे पूरवावी ॥
प्रभुवर महिमेचा भाट ठेऊनि मार्गे ।
गिरिधर प्रभुपाईं येतसे लागवेगें ॥

अशी चार श्लोकांची पत्रिका त्यांनीं आधीं बंधूबरोबर पुढें पाठविली होती आणि मागोमाग आपण गेले ! "

येथें गिरिधरांचें चरित्र संपलें. हा चरित्रलेख, गिरिधरकृत **श्रीसमर्थप्रताप** ग्रंथास रा. देव यांनीं जी ८६ पृष्ठांची विस्तृत प्रस्तावना जोडली आहे, तिच्याच केवळ आधारानें लिहिला आहे. रा. देव यांची प्रस्तावना इतकी सुंदर आणि माहितीनें भरलेली आहे कीं, जुन्या वाङ्मयाविषयीं आस्था बाळगणाऱ्या प्रत्येक महाराष्ट्रीयानें ती प्रस्तावना अवश्य वाचावी अशी येथें आग्रहपूर्वक विनंति केल्याशिवाय माझ्यानें राहवत नाहीं. गिरिधरांची गुरुमाउली श्रीबयाबाई रामदासी यांचीं कांहीं पदें व गिरिधरांच्या कवितेंतले आणखी थोडेसे उतारे येथें देऊन हा चरित्रभाग पूर्ण करूं.

## बयाबाईचीं पदें.

### १

हा गुरु राजचि साचा । सिंधु आनंदाचा ॥ ध्रु० ॥
सा चारांला अंत न लागे । कुंठित जाल्या वाचा ॥ १ ॥
जाणिव टाकुनि नेणिव प्रासुनि । येथेंचि लाग तयाचा ॥ २ ॥
भास निराभास होउनियां एक । हाचि भास जयाचा ॥ ३ ॥
गुरु हा विश्वंभर दास बयावर । घाली पदर कृपेचा ॥ ४ ॥

### २

धांवत येऊनि सद्गुरमाय निज पान्हा देई ।
तुझिया विरहानलानें व्याकुल जीव जाला पाहीं ॥ ध्रु० ।
इंद्रनिळाची कीळ गाळुनी शाममूर्ति घडिली ।
अष्ट दिशांला प्रभा व्यापुनि दश अंगुळ उरली ॥ १ ॥
यमुनातीरीं कुंजवनामधिं वाजवितो मुरली ।
याला पाहतां चित्तवृत्ति हे सखये घाबरली ॥ २ ॥
चाल ॥ मग दृढतर निश्चय मनांत हा केला ।

खरि आग लाविली या सहा ईषणेला ।
निर्धूत होउनी शरण गेलें पायाला ।
चिद्ग्रंथीची गांठ सुटुनियां मिठि पठली पाईं ॥

३

या समयीं कां दूर टाकिलें खरें सांग मजला ।
हीनदीन मतिमंद आळशी ह्मणुन त्याग केला ॥
अर्वाकानें फार बोलिल्यें हाचि त्रास जाला ।
पदकमलाचा वियोग मजवर हा पडला घाला ॥
चाल ॥ आतां क्षमा करावी कर जोडुनि विनवितें ।
निजचरणिं अखंडित ठाव द्या मागतें ।
निर नयनीं वाहे तुजलागीं बाहतें ।
उदास दिसती दाही दिशा अतां धीर नाहीं ॥ १ ॥
चराचराला व्यापुनियां तूं उवरित असशी ।
नानात्वाचा ग्रास करुनियां त्या निजपदिं रमशी ।
सहज लीले करुनियां टक सच्छिष्या देशी ।
तेथिल निज बोलायाला तें नये हो मजशी ।
चाल ॥ तेथें चार सहा अठरा मौनावले ।
गति कुंठित जाल्या तेथुनियां परतले ।
त्या चिद्गगनीं मग दास बया मावळे ।
बहु जन्माची पुण्यसंपती फळली या समयीं ॥ २ ॥

४

क्या कहूं रे गुरुनाथ की बात मे । मस्तमया है दिल मेरा रंगमें ॥ ध्रु०
लाल रगमें सफेद खुला है । कोई नहि जाने आप भुला है ॥ १ ॥
जब सद्गुरुके पगलिन होना । रंगातीत रंग आपहि होना ॥ २ ॥
रामदास गुरुपदकी दासी । दास बया फिरे देस बिदेसी ॥ ३ ॥

५

लागुन गेलं लगन हो ॥ या गुरुला निजनयनीं पाहतां ॥ ध्रु० ॥
मी ममता हे वसन टाकितां । जनांत जालें जघन हो ॥ १ ॥

चाहो शून्याच्या वर मी नलें । तेथेंच जालें मगन हो ॥ २ ॥
परपुरुषाची मिठी सुटेना । आतां कशि येउं बाई फिरून हो ॥ ३ ॥
दास **बया** म्हणे गुरुराजानें । दाखविलें चिद्गगन हो ॥ ४ ॥

६

**आर्या.**

गुरुरूपचि तूं असती हरि बा तुजला अखंड नमित असें ।
दास **बया** हे त्यजुनी श्रीचरणीं मस्तकास ठेवितसे ॥
श्री ज्येष्ठ शुद्ध नवमी नवमीच्या घरींच राहतसे ।
समजुनियां उमजावें अक्षरपत्रीं लिहून धाडितसें ॥
श्रीकारा आकारा मिळणी होतांच भ्रांति हे गेली ।
ॐकाररूप जाला जरि गुरुनें आत्मदृष्टि हे केली ॥
आतां बोलूं कायें बोलाया मार्ग राहिला नाहीं ।
मौन्य गर्भिचें निजसुख सद्‌गुरुराजेंचि दाविलें देहीं
देही असतां विदेही केलें मजला गुरु समर्थानें ।
त्याचिया उपकारा देउनियां काय व्हावें अर्थानें ॥

७

**पद.**

काय सांगूं बाई तगी कपटी मोठा कान्हा ॥ ध्रु. ॥
जात होतें यमुनातीरीं । अडवुनियां धरितो निरी ।
घुंगटपट काढुनियां हळुच लागे काना ॥ १ ॥
ठमक ठमक करुनी चाले । अवाच्य शब्द बोले ।
नैनीं नैन एक करी भीड्च ना कोणा ॥ २ ॥
गोकुळांत धूम केली । वृत्ति चोरुनियां नेली ।
दास **बया** धन्य ह्मणे गुरुराजराणा ॥ ३ ॥

८

ध्याइये गुरुपग अघमोचन । सुखदायक भवाब्धितरन ॥ ध्रु० ॥
चिद्गगनके अासन खूला । जापर सद्गुरुराज न्मीला ।

चंद्र सूर्य दो दिवटि जलत है । जब देखा तब डूब गई तन ॥ १ ॥
ज्याकी सत्ता जगमो भरि है । जां देखो तहां ठाड रही है ।
सो सद्गुरु किरिपा सो मिलती । सब छांडके पग जा सरन ॥ २ ॥
लिखा पढा कछु संग नहि आवे । अंतकालमे सबही जावे ।
जोरू लडके महल मजालस । यहां रहती फेर आपहि जाना ॥ ३ ॥
दिलका मेहर मिलगया दिलको । तारनवाला गुरु है सबको ।
दास **बया** कहे कछु नहि देखा । जब देखा तब उलटा नयन ॥ ४ ॥

बयाबाईस हिंदी भाषेचें ज्ञान चांगलें होतें असें त्यांच्या हिंदी पदांवरून दिसते. त्यांनीं कांहीं आर्याही रचिल्या आहेत असें रा. विश्वनाथ काशीनाथ राजवाडे यांच्या एका *लेखावरून समजतें. बयाबाईंची ही सर्व उपलब्ध कविता पुढेंमागें **रामदास** आणि **रामदासी** या मासिकांत प्रसिद्ध होण्याचा संभव आहे. वेणाबाई व बयाबाई यांच्याप्रमाणें **अंबाबाई** नामक एक साध्वी व कवयित्री या रामदास संप्रदायांत होऊन गेली आहे, परंतु तिजविषयींची ह्मणण्यासारखी माहिती अद्याप कोठें प्रसिद्ध झालेली दिसत नाहीं. असो.

निवृत्तिराम ग्रंथांतील एकंदर विवेचन पाहिलें ह्मणजे, गिरिधर यांस संस्कृत भाषेचें ज्ञान चांगलें असलें पाहिजे व त्या भाषेंतील अनेक ग्रंथ त्यांच्या अवलोकनांत आले असले पाहिजेत हें उघड दिसतें. अध्यात्म विषय सुलभतेनें समजावून देण्याची त्यांची हातोटीही चांगली आहे. गिरिधर, दिनकर रामदासी, हरिबुवा भोंडवे वगैरे अनेक ग्रंथकार या रामदास संप्रदायांत होऊन गेले, परंतु इतर कांहीं मराठी कवींप्रमाणें त्यांची किंवा त्यांच्या ग्रंथांची महाराष्ट्रांत आजवर फारशी प्रसिद्धि झाली नाहीं. याचें मुख्य कारण,

* भारत-इतिहास-संशोधक-मंडळाचा शके १८३३चा अहवाल, पृष्ठ ९० पहा.

श्रीसमर्थ रामदासस्वामी या मुख्य ग्रहासभोंवतीं फिरणाऱ्या ह्या उपग्रहांचें तेज, सूर्याच्या तेजापुढें चंद्राचें तेज जसें लोपून जातें, त्याप्रमाणें लोपून गेल्यामुळें लोकांचे डोळे दिपविण्यास ते समर्थ झाले नाहींत, हेंच होय व अशी स्थिति दुसऱ्या पुष्कळ महाराष्ट्र कवींची झाली आहे. असो.

सद्गुरुमहिमा वर्णन करितांना गिरिधर ह्मणतात:—

देवा देवपण सद्गुरुकरितां । संता संतपण सद्गुरुकरितां ।
जीवासी शिवपण सद्गुरुकरितां । ब्रह्मपण सद्गुरुचनी ॥
सद्गुरुचेनि कृपालेशें । अहंकार निवृत्ति निःशेषें ।
वशिष्ठ विश्वामित्र संतोषें । जगदोद्धार करावया ॥
जगदोद्धार संतीं केले । द्वंद्व सांडूनि निर्द्वंद्व ठेले ।
ऐकोनि श्रोते तद्रूप जाले । निवृत्तिबोधीं परमार्थी ॥
कोण्ही राहले पुरुषार्थी । प्रार्थितें जाहले श्रवणार्थी ।
अहं ममता निवृत्यर्थी । कथन अपूर्व सांगा जी ॥
वशिष्ठ कौशिक निर्द्वंद्व जाहाले । आम्हासि द्वंद्वीं ठेऊनि गेले ।
दहपाशबंधनीं जीव बांधले । शुकनळिका न्यायें जी ॥
अहंममता नसतीच माथां । मर्कट मुष्टी सांपडे सर्वथा ।
विषयपंचकें बांधले तत्त्वता । मृग गज पतंग मीन भृंग ॥
आतां अहंममता निवृत्तिलक्षणीं । एका जी इतिहास रामायणीं ।
संत साधु परिसनी श्रवणीं । श्रोते वक्ते स्वानंदें ॥
अहंममता म्हणजे जाणा । मी माझें ऐसी भावना ।
मी कोण माझें काय मना । आणिलें पाहिजे ॥
मी जीव माझें वैभव । मी सुंदर माझं गौरव ।
धन संपत्ति संतति हांव । ब्रह्मांडातें कवटाळी ॥
मी ज्ञाता माझी मान्यता । मी तपस्वी माझी उग्रता ।
मी सुशील माझी शुचिर्भूतता । लोकांसि नये ।
मी विद्यावंत माझी प्रतिष्ठा । मी प्रतिसृष्टीचा स्रष्टा ।

म्या बहुतांची अप्रतिष्ठा । केली म्हणे अभिमानी ॥
विश्वामित्र गोत्र माझें । मज जाणिजे वसिष्ठराजें ।
नाना अभिमानी फुंजे । अहं ममता दुर्बुद्धि ॥
सर्प वांकडे तिकडे चालती । बिळीं सरळचि प्रवेशती ।
तैसे अहंकार नाना विकार करिती । आत्मसदनीं येती सरळेचा ॥
किती दिवस अहंबुद्धि । ध्यावी आतां आत्मशुद्धि ।
रावण ज्ञाता दुसरा विधि । खंडें केलीं श्रुतीचीं ॥
म्हणे चंद्र मजवरी छत्र धरी । सूर्य माझा तिष्ठे द्वारीं ।
वरुण वायो अधिकारी । झाडी फेडी करावयाचे ॥
पुरंदर तो सुमनदायक । रजक माझा मुख्य पावक ।
शतक्रतु ज्याचेनि सम्यक । होमहवनें त्रिभुवनीं ॥
त्रिदश माझे बंदिशाळे । म्हणोन करी नानाचाळे ।
कुटिल कपटी जनकबाळे । लंकेसि घेऊनि गेलासे ॥
बरे रावणें स्वहित केलें । समर्थेंसी वैर धरिलें ।
मी माझें समूळ गेलें । सर्वही जालें रामार्पण ॥
म्हणे भवसिंधु तरेल कोण । तेथें तरले पाषाण ।
सुंदर माझें अशोक वन । शोक उत्पन्न तेथेंही ॥
अक्षया माझा आयुष्यांत । त्यासी क्षय करी हनुमंत ।
सुवेळा माझी हे निभ्रांत । तेथें ठाणें रामाचें ॥
माझी अमरपुरी अजिंक । तेथें वेधलें कपिकटक ।
असुर माझे सुरवरत्रासक । त्यांसी त्रासक वानर हे ॥
त्रिशिरा माझा त्रिभुवन जिंकी । त्यासी वानर ऋषभ जिंकी ।
कुंभकर्ण माझा बळसागर कीं । अगस्तिराम आचमन हें ॥
अतिकाया माझा चंडकाया । त्यासी मारी सौमित्र बळिया ।
इंद्रजित माझा पराक्रमिया । त्यासिही मारी लक्ष्मण ॥
अहिमहि माझे मित्रबंधु । त्यांसी मारी प्रतापसिंधु ।
म्हणे करीन लक्ष्मणवधु । तात्काळ उठवी द्रोणाचल ॥
मी होम करीन वाममार्गें । तो वानर भंगिती गगनमार्गें ।
रणांगणीं माझीं दैत्यदुर्गें । समर्थें भग्न पाडिलीं ॥

माझी गगन भरोनी शरसुटी । क्षणार्धें ताडी राम जेठी ।
माझी शिरोत्पत्ति मोठी । श्रीराम फोडी कुपिका ॥
जें जें मी माझें भाविलें । तितुकें पूर्वपक्षवारीं गेलें ।
शास्त्रज्ञासि कळों आलें । अहंममतानिरूपण ॥
पूर्वपक्ष जाला रावणाचा । सिद्धांत राम उरला साचा ।
मी माझें अहंममतेचा । राम जाला चहूंकडे ॥
वाम सव्य मागेंपुढें । रथ सारथी राम पुढें ।
गगन भरूनि रामें रोकडें । स्वरूप दाविलें सर्वत्र ॥
गगनसदृश राम जाला । पूर्वपक्ष अवघा उडाला ।
खं ब्रह्म राम देखता जाला । खंडें केलीं वेदांचीं ॥
वेदशास्त्र मिथ्या नव्हे । पढत मूर्ख जरी आहे ।
श्रीराम त्यास भेटताहे । ईश्वरी कृपा रावणा ॥
अहंममता निर्मोनि गेली । अंतरस्थिति राम जाली ।
मी जीव ऐसी शुद्धि उडाली । अहं आत्मा निर्धारें ॥
अहं आत्मा आत्माराम । अहं सोहं सारूनि नेम ।
रामरावणऐक्यवर्म । संत सज्जन जाणती ॥
अहं रावण उभा केला । अर्थ परमार्थीं आणिला ।
जयविजय रावण गेला । वैकुंठभुवना निश्चयें ॥
सद्गुरुकृपेचेनि बळें । वैकुंठ गिळिलें सगळें ।
चतुर्विधा मुक्ति सारूनि केवळें । बद्ध ना मुक्त स्वरूपीं ॥
कोणासि सांगों अध्यात्मज्ञान । जाणती संत सुलक्षण ।
अहंममता निवृत्तिकथन । आत्मारामें संपविलें ॥
आत्माराम निरंजनीं । अहंममतावृत्ति निवृत्ति वेणी ।
अध्यात्म विद्या अध्यात्मश्रवणीं । संत खुणेसी बाणती ॥

अहंममतेचें वर्णन वरील ओव्यांत गिरिधरांनीं फार सुंदर रीतीनें केलें आहे. तरी पण, केवळ काव्यदृष्टीनें पाहतां, मुक्तेश्वर, वामन किंवा मोरोपंत यांच्या कवितेंतील प्रतिभा गिरिधरांच्या कवितेंत फारशी आढळणार नाहीं; आणि याचें कारणही उघडच आहे.

एक तर रामदास संप्रदायांतल्या कोणत्याही कवीनें रसिकजनमनोल्हादक काव्य रचून, कविमंडळांत महाकवि ह्मणून चमकण्याचा बुद्धिपुरस्सर प्रयत्न कधींच केलेला नाहीं व दुसरें असें कीं, भाषेचा साधेपणा कायम ठेवून, गुरुगम्य अध्यात्मज्ञान सामान्य प्राकृत जनांस, होतां होईल तितकें सुगम करून द्यावें इतकाच त्यांच्या काव्यविरचनेचा हेतु असल्यामुळें, आपले गुरु जे श्रीसमर्थ रामदासस्वामी त्यांच्या काव्यरचनापद्धतीचेंच अनुकरण त्यांनीं सर्वत्र केलें आहे. अस्तु.

प्रस्तुत गिरिधर कवीशिवाय गिरिधर नांवाचे आणखी एकदोन कवि महाराष्ट्रांत होऊन गेले असावेत, असें दुसऱ्या कांहीं कवितेंतील नामोल्लेखांवरून दिसतें. "भक्तीं आकळिला । दयाधन भक्तीं आकळिला" ह्या सुप्रसिद्ध पदाच्या शेवटीं "रुक्मिणीनें एका तुलसिदलानें । **गिरिधर** प्रभु तुळिला" असा कविनामोल्लेख आहे. याशिवाय, "प्रातःस्मरामि" या नांवाचें एक पन्नास पाऊणशें कडव्यांचें अप्रसिद्ध जुनें प्रकरण माझ्या संग्रहीं आहे, त्याच्या शेवटीं ----

जीवन्मुक्त याचा सुत ।
" **गिरिधर** प्रसाद अमृत "

असा नामोल्लेख आहे, त्यावरून जीवन्मुक्त नामक सत्पुरुषाचा हा गिरिधर कवि पुत्र असावा हें उघड दिसतें. रामदासी गिरिधरांचा **निवृत्तिराम** ग्रंथ धुळें येथील सत्कार्योत्तेजक सभेनें प्रसिद्ध केला आहे, त्याची, रा. केशव लक्ष्मण ओगले यांनीं लिहिलेली प्रस्तावना वाचनीय असल्यामुळें, ती वाचकांनीं एकवार अवश्य वाचावी, अशी सूचना करून हा चरित्रलेख येथें पूर्ण करितों.

-----:०:-----

# तुका ब्रह्मानंद.

"सुमारें दोनशें अडीचशें वर्षांपूर्वीं, गोब्राह्मणप्रतिपालक श्रीशिवाजी महाराज यांच्या कारकीर्दींत विश्वब्राम्हण ( सुवर्णकार ) कुलामध्यें तुकाब्रह्मानंद स्वामी या नांवाचे एक मोठे विद्वान् योगी होऊन गेले. हे सातारा येथें राहात असत. ह्यांच्या वडिलांचें नांव नागनाथ असून, उपनाम कर्मार होतें. ह्मणून पूर्ववयांत ह्यांना तुका नागनाथ कर्मार असं ह्मणत. नागनाथपंत हे राजाश्रित असून पोतदारीच्या वृत्तीवर आपलें उपजीवन चालवीत. सरकारी खजिना तपासून ठेवणें, रुपये पारखून घेणें ह्या कामावर जे सराफ असतात, त्यांनाच पोतदार असें ह्मणतात. छत्रपतींच्या दरबारांत हें काम नागनाथ-पंतांकडे होतें.

तुका कर्मार यांचें उपनयन होतांच लहानपणीं त्यांच्या वडिलांनीं त्यांच्याकडून वेदाध्ययन, संस्कृत व्याकरणशास्त्र व अलंकारशास्त्र यांचा अभ्यास करविला. नंतर, *देवशिल्प हीही आपल्या ब्राह्मणांची एक कुलपरंपरागत वृत्ति असून ती फार उपयोगी आहे; परंतु वैदिक शिल्पशास्त्राचें अध्ययन केल्याशिवाय देवमूर्ति वगैरे शिल्प येणें शक्य नाहीं, हेंही त्यांच्या लक्ष्यांत आलें. ह्मणून त्यांनीं अथर्वण-संहिता, बौधायनशुल्बसूत्र, पद्मसांहिता वगैरे वैदिक शिल्पग्रंथांचें पूर्ण अध्ययन केलें आणि शिवाजी महाराजांच्या आश्रयानें सुवर्णशिल्पाचा धंदा करून त्या शिल्पशास्त्राचा अनुभव महाराजांस

* देवशिल्प ह्मणजे देवमूर्ति, देवरथ, यज्ञकुंड इत्यादि संबंधीं जें शिल्प तें.

दाखविला. यासंबंधानें एक आख्यायिका प्रचलित आहे ती अशीः—
एकदां शिवाजी महाराजानीं तुका कर्मार ह्यांस आपणाकरितां एक पवित्रक तयार करावयास सांगितलें. तेव्हां ते ह्मणाले कीं, यथाशास्त्र पवित्रक तयार करणें असेल तर त्याला †बारा वर्षे लागतील. महाराज ह्मणाले, "त्यांत इतका अपूर्व गुण तरी काय ?" कर्मारानीं उत्तर दिलें, "तसल्या पवित्रकांत काय अपूर्व गुण असतो, हें, तें पवित्रक तयार झाल्यावर आपणास दाखवूं." इतकें झाल्यावर, महाराजांच्या आज्ञेनें त्यांनीं तें पवित्रक तयार करावयास घेतलें. नंतर शिल्पशास्त्रोक्त विधीप्रमाणें पूजन, हवन वगैरे करून, नवग्रहांची प्राणप्रतिष्ठा करून त्या पवित्रकांत त्या त्या ग्रहाच्या इष्ट रत्नाची स्थापना केली. ह्याप्रमाणें शास्त्रोक्त रीतीनें पवित्रक तयार करून तें शिवाजीमहाराजांस दाखविलें. तें पाहून महाराज ह्मणाले, "ह्यामध्यें विशेष गुण काय आहे तो प्रत्यक्ष दाखवाल तरच आमची खात्री होईल." तेव्हां तुका कर्मार यांनीं स्नान करून शुचिर्भूत होऊन, जागा सारवून त्यावर रांगोळी वगैरे घालून तेथें पाट मांडला; आणि त्या पवित्रकांतील नवग्रहांची यथाविधि पूजा केली. आणि हात जोडून प्रार्थना करून त्यांस ह्मणाले, "ह्या पवित्रकामध्यें जसें आपण मूर्तिमंत स्वरूपानें येऊन वास्तव्य केलें, त्याप्रमाणेंच आपण आपल्या स्थानीं गमन करावें." ही प्रार्थना संपते न संपते तोंच शिवाजीमहाराजांसमक्ष ते नवरत्नरूपी नवग्रह ताडकन् त्या पवित्रकांतून निघून आकाशामध्यें आपापल्या स्थानीं गमन करिते

† नवरत्न मुद्रिका नवग्रहमंत्रांनीं हवन करून प्रत्येक रत्नमुद्रिकेंत जडण्यास निरनिराळे सुमुहूर्त लागतात.

झाले. हें पाहून महाराजांस मोठें आश्चर्य वाटलें; व शिल्पशास्त्राचा प्रभाव पूर्णपणें त्यांच्या दृष्टोत्पत्तीस आला; व तुका कर्मार हे शिल्पशास्त्राचे अद्वितीय विद्वान् आहेत अशी त्यांची खात्री होऊन त्यांच्या विषयीं त्यांच्या मनांत पूज्यभाव उत्पन्न झाला.

तुका कर्मार हे कालिकादेवीचे मोठे भक्त होते. पण ते शाक्तपंथी नव्हते ते एकनिष्ठ व प्रेमळ भक्त होते. त्यामुळें त्यांना देवीचा प्रत्यक्ष साक्षात्कारही होत असे. पुढें शिवाजी महाराजांच्या आज्ञेनें त्यांनीं शिल्पशास्त्रविधिप्रमाणें देवीची सुवर्णाची मूर्ति* तयार केली. ती पाहून महाराज प्रसन्न झाले. तेव्हां कर्मारानीं त्यांस विनंति केली कीं, ह्या मूर्तीची स्थापना करणें ती विश्वब्राह्मणाच्या हातूनच झाली पाहिजे. तें त्यांचें ह्मणणें महाराजानीं मान्य करून, मूर्तीच्या प्रतिष्ठापनेचें कार्य तुका कर्मार यांजकडेच सोंपविलें. तेव्हां दुसऱ्या कित्येक वैदिक ब्राह्मणांनीं अशी कोटी काढिली कीं, तुका कर्मार जर एवढे विद्वान् आणि शिल्पशास्त्रज्ञ आहेत व त्यांच्या हातानेंच जर मूर्तीची प्राणप्रतिष्ठा करवावयाची तर प्राणप्रतिष्ठा झाल्यानंतर देवीनें आपण होऊन आपले अलंकार आपल्या अंगावर घालावेत; तरच आह्मी शिल्पशास्त्रांतलि प्रमाण सत्य मानूं. तुका कर्मार यानीं ही गोष्ट मान्य केली; व निश्चित केलेल्या मंगल मुहूर्तावर देवीची अर्चा व प्राणप्रतिष्ठा करून यथाविधि स्थापना केली. नंतर देवीपुढें एका चांदीच्या ताटांत सुवर्णाचे व रत्नाचे अलंकार भरून ठेवले; आणि संस्कृतांत एक अष्टक† रचून देवीच्या स्तोत्रपाठास आरंभ केला. तेव्हां

* ही देवीची मूर्ति हल्लीं साताऱ्यास आहे असें ह्मणतात.

† हें अष्टक सातारा येथें रा० नारायण बळवंत वाळवेकर यांचे संग्रहीं आहे.

काय चमत्कार सागावा? प्रत्येक श्लोकास एक अलंकार याप्रमाणें त्या सुवर्णाच्या देवीनें सर्व अलंकार प्रत्यक्ष आपल्या हातानें उचलून अंगावर धारण केले. ह्या अद्भुत कृत्यामुळें महाराजांची व वैदिक लोकांचीही तुका कर्मारावर विशेष भक्ति जडली.

एके दिवशीं शिवाजी महाराजांनीं आपला चष्मा नीट करण्यासाठीं तुका कर्मारांकडे पाठविला. तो नीट करीत असतां कर्मार यांच्या हातून अकस्मात् त्या चष्म्याचें भिंगच फुटलें. तेव्हां त्यांस मोठें भय उत्पन्न होऊन त्यांनीं देवीचा मोठ्या करुणस्वरानें धांवा आरंभिला. तेव्हां श्रीजगदंबा त्यांस प्रसन्न झाली आणि तिच्या कृपेमुळें, तें चष्म्याचें भिंग आपोआपच पूर्ववत् झालेलें त्यांच्या दृष्टीस पडलें! ही देवीची आपल्यावर असलेली अलौकिक कृपा पाहून त्यांच्या नेत्रांतून खळखळ आनंदाश्रूंचे लोट आले. नंतर, मोठ्या सद्गदित अंतःकरणानें तो चष्मा नेऊन त्यांनीं महाराजांच्या स्वाधीन केला.

पुढें तुका कर्मार यांचे वडील नागनाथ हे वारले. तेव्हां त्यांची वडिलोपार्जित वृत्ति सांभाळणें त्यांस भाग पडलें. ही वृत्ति ह्मणजे सरकार कचेरींतील पोतदारीचें ह्मणजे खजीनदाराचें काम करणें ही होय. तेथें नित्यशः जाऊन सरकारच्या गांवगन्ना असलेल्या चावड्यांतून व तालुक्यांतून रुपयांचें पोतें येईल त्यांतले सारे रुपये पारखून सरकारी तिजोरींत जमा करावे लागत. परंतु तुका कर्मार हे मोठे कर्मनिष्ठ होते. प्रत्यहीं तीन त्रिकाळ संध्या करण्याचा त्यांचा नियम होता. प्रथम ते स्वतंत्र धंदा करीत असत तेव्हां त्यांच्या या

* या चमत्काराचा उल्लेख तुका कर्मार यांच्या आरतीच्या हस्तलिखित प्रतींत असून, ती प्रत रा॰ सीताराम वाळवेकर, राहणार तासगांव यांचे संग्रहीं आहे.

संध्यानियमांत कधींही अंतर पडत नसे. परंतु नवीन नोकरीमुळें ते परतंत्र झाले. तथापि त्यांनीं आपला नियम चालू ठेवलाच होता. हे एवढे स्नानसंध्याशील असल्यामुळें कचेरींतील इतर लोक ह्यांची थट्टा करीत. एकदां तर त्यांचा सायंसंध्येचा नियम मोडून त्यांत व्यत्यय आणून काय मौज होते ती पहावी या विचारानें कांहीं गृहस्थांनीं तुका कर्मारांचें सत्वच पाहण्याचा बेत केला. त्यांनीं रोजच्याप्रमाणें ऐवजानें भरलेल्या थैल्या पारखावयास द्यावयाच्या त्या वेळेवर न देतां अगदीं कचेरी बंद करण्याच्या सुमारास ह्मणजे अगदीं सूर्यास्ताचे वेळीं त्यांजपुढें आणून टाकल्या ! आणि त्याही एकदोन नव्हत, तर ढीगच्या ढीग ! पोतदारीचें काम ह्मणजे मोठ्या जोखमाचें. शिल्लक पारखून खजिन्यांत टाकल्याशिवाय त्यांना तेथून उठतां येईना. तेव्हां अर्थातच सायंसंध्येचा त्यांचा नियम टळण्याची वेळ येऊन ठेपली. परंतु परमेश्वर हा भक्तांचा कैवारी व पाठिराखा; तो काय त्यांची उपेक्षा करणार ? कर्मार हे भक्तिभावानें संध्येचा नियम अगदीं कडकडीत-पणें चालवीत असल्यामुळें ह्या वेळींही भगवान् श्रीसूर्यनारायण त्यांचें अर्घ्यप्रदान घेण्याकरितां जागच्या जागींच खिळून राहिले. अस्तास गेले नाहींत ! इकडे तुका कर्मारांचें रुपये पारखून घेण्याचें काम सुरूच होतें. राजवाड्यांत शिवाजी महाराजांनीं किती वाजले ह्मणून पाहिलें तों तीन तास रात्रीचा समय झाला असून सूर्याचा अस्त मात्र झालेला नाहीं ! त्यावरून त्यांनीं विचारांतीं ठरविलें कीं, कोणा तरी पुण्यपुरुषाचा छळ चालला असावा. त्याशिवाय असा प्रकार होणार नाहीं. ह्मणून त्यांनीं हुजऱ्याकडून चौकशी करविली. तेव्हां, सर्व कचेऱ्या बंद झाल्या असून, तुका नागनाथांची कचेरी मात्र अद्याप

उघडी आहे व त्यांचें रुपये पारखून व मोजून खजिना भरण्याचें काम चालू आहे असें समजलें. तेव्हां महाराज स्वतः कर्मारांच्या कचेरींत जाऊन त्यांस ह्मणाले "आज आपण इतका वेळपर्यंत कां बसलां?" कर्मार ह्मणाले "कचेरी बंद होण्याच्या सुमारास थैल्या आल्यामुळें त्यांची व्यवस्था लावणें भाग पडलें." तें ऐकून महाराज ह्मणाले, "तीन तास रात्र झाली तरी अद्याप सूर्य अस्तास गेला नाहीं. ह्याकरितां हें काम असेंच ठेवून आपलें संध्यादि नित्यकर्म आतां ह्याच ठिकाणीं उरकून घ्या." ती आज्ञा ऐकतांच त्या ठिकाणीं हौदावरच तुका कर्मारांनीं सायंसंध्या केली. तोंच सूर्य अस्तास जाऊन तीन तास रात्र पडली. नंतर महाराजांनीं कचेरींतील दरोबस्त लोकांस हुकूम केला कीं, पुनः कर्मार यांस कोणी असा त्रास देऊं नये.

वरील कथेवर अनेक आपेक्ष घेतां येण्यासारखे आहेत. सूर्यास्तास विलंब होण्याचें कारण, कोणा तरी सत्पुरुषाचा छळ चालला असावा, हें महाराजांच्या लक्षांत बिनचूक कसें आलें? शिवाय हा सत्पुरुष साताऱ्यांतच असला पाहिजे हेंदेखील त्यांस कसें समजलें? दुसरा ऐतिहासिक दृष्ट्या येणारा आक्षेप असा आहे कीं, सातारा ही शिवाजी महाराजांची राजधानी नव्हती. रायगड हें त्यांच्या राजधानीचें ठिकाण होतें. अस्तु. थोर व्यक्तींच्या पुण्यबलानें सूर्याची गति कुंठित झाल्याचीं कांहीं उदाहरणें पुराणग्रंथांतून आढळतात. कालिदासासंबंधानेंही अशा प्रकारची एक आख्यायिका प्रसिद्ध आहे. जगांतील बहुतेक सगळ्या साधुसंतांचीं व धर्मसंस्थापकांचीं चरित्रें अशा प्रकारच्या अलौकिक चमत्कारांनीं अशीं खच्चून भरलेलीं आहेत कीं, त्यांतले खरे चमत्कार कोणते व खोटे कोणते, किंवा सर्वच

खोटे, याचा निर्णय करण्याचें काम एखाद्या मोठ्या शास्त्रज्ञासही बिकट वाटेल. अशा स्थितींत परंपरागत गोष्टी व दंतकथा, त्या त्या साधूच्या चरित्रांत नुसत्या नमूद करून ठेवण्यापलीकडे, चरित्रलेखकानें तरी काय करावें ? असो.

वरील चमत्कार घडला त्या दिवसापासून तुका कर्मार यांस विरक्ति उत्पन्न झाली; आणि नोकरींत व प्रपंचांत राहून आपल्या नित्यकर्मांत व्यत्यय येतो, ह्याकरितां चतुर्थाश्रम ह्मणजे संन्यास घ्यावा हेंच उत्तम असें त्यांच्या मनानें घेतलें; आणि संधि पाहून त्यांनीं तो आपला विचार शिवाजी महाराजांच्या कानावर घातला. व महाराजांची अनुज्ञा मिळतांच श्रीब्रह्मानंदस्वामीच्या अनुग्रहानें त्यांनीं सुमुहूर्तावर संन्यासदीक्षा धारण केली. ब्रह्मानंदस्वामीनीं त्यांस '**तुकाब्रह्मानंद**' हें नांव दिलें. त्या आश्रमांत त्यांनीं हठयोगाचें परिपूर्ण अध्ययन करून प्रस्थानत्रयादि वेदांतग्रंथांचें परिशीलन केलें. ह्या आश्रमांतही शिवाजी महाराज त्यांचा समाचार घेत असत. तुका कर्मार हे उत्तम कवि होते. ह्यांनीं भर्तृहरीकृत शतकत्रयावर समश्लोकी टीका केलेली आहे. ह्या भगवद्भक्त कवीनें आपल्या विद्वत्तेची व कवित्वाची साक्ष ह्मणून अनेक काव्यें रचिलीं आहेत. शांकरभाष्य टीका, वेदांतरहस्य, शतकत्रय समश्लोकी, सप्तशतीची टीका, प्रणवाष्टक, नाटकरामायण, गीतगोविंद समश्लोकी, व विश्वकर्ममाहात्म्य वगैरे अनेक ग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. यांपैकीं प्रणवाष्टक व गीतगोविंद समश्लोकी हे दोन ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले आहेत. अप्रकाशित ग्रंथांपैकीं कांहीं ग्रंथ पुणें येथें वे. शा. सं. बाळशास्त्री रावजीशास्त्री क्षीरसागर यांचे संग्रहीं आहेत.

अंतकाळीं तुका ब्रह्मानंद यांनीं साताऱ्यानजीक माहुली येथें कृष्णा-वेण्यासंगमावर आपला देह ठेवला. त्या ठिकाणीं महाराजांनीं त्याची समाधि, घाट व देवालयही बांधलें आहे असें मशारनिल्हे रा. क्षीरसागर यांनीं दिलेल्या माहितीवरून समजतें. तुका ब्रह्मानंद यांच्या कवितेंतील कांहीं वेंचे येथें देतों.

गीतगोविंद समश्लोकी.

मूळ श्लोक—"वाग्देवता०" इत्यादि.

समश्लोकी—वागीश्वरीचरितलेखित चित्तसद्मा ।
पद्मावती नृपतिसेवित पादपद्मा ॥
गोपाल गोपवनिता रतिरासगाथा ।
गीताप्रबंध करितो जयदेव आतां ॥

मूळ श्लोक—"वेदानुद्धरते०" इत्यादि.

समश्लोकी—वेदोद्धारकरा जगत्रयधरा भूगोल दंष्ट्रांकुरा ।
दैत्यप्राणहरा बलिन्छलकरा क्षत्रीकुलारीवरा ॥
लोकेशांतकरा हलायुधधरा कारुण्यपूर्णांतरा ।
म्लेंच्छादिप्रहरा दशाकृतिधरा कृष्णा नमो श्रीधरा ॥

मूळ अष्टपदी—" कापि कपोल०"

समश्लोकी—कोणि कपोलतळीं मिळती लपती श्रवणातळिं बाळा ।
श्रीहरिचं मुख चुंबिति त्या मृगराजक त्या अनुकूळा ॥
कोणि अतिक्रीडा कौतुक खेळे जाति यमुनेच्या कुळीं ।
कुंजवनीं मदमंजुळ वायु...चिरें हरी वनमाळी ॥

मूळ श्लोक—" साध्वी माध्वी०" इत्यादि.

समश्लोकी—गर्वा र्वापुढें तूं नच मिरवि मधो, साखरे टाक मान ।
द्राक्षीतें कोण रक्षी, अमृत मृत बुधा, तूंहि पाण्यासमान ॥
आम्रा ताम्रा रडें ये शशिमुखि अधरा ! तोंड दावी न दृष्टी ।
आनंदें विश्व जों हें कविवर जयदेवाचिया काव्यसृष्टीं ॥

मदोल्लसितलोचनें वदन इंदुबिंबापरी ।
गती जनमनोरमा जघन कर्दळीची सरी ॥
रती तव कलावती भ्रुकुटि रम्य वाटे मना ।
अहा जमवुनी पहा उतरलीस देवांगना ॥
शय्येचा शेष त्याच्या शिरसिं मणिगणीं पाडुनी बिंबछाया ।
मूर्ति स्फूर्ती हजारो प्रगटुनि अपुल्या सर्व नेत्रें पहाया ॥
आनंदानें पुरेशी जलनिधितनया कृत्तिकी देहधारी ।
जेणे यत्काम वाढे, हरि सततचि हो सर्वकल्याणकारी ॥
मेघीं अंबर दाटलें वनभुमी नीळ्या तमालद्रुमी ।
राधे ! हा तमभीत बाल सदना ने प्राप्त झाली तमी ॥
एवं नंदनिरोपयुक्त गमिती कुंजद्रुमाच्या पथीं ।
राधाकृष्ण विराजमान यमुनातीरीं रमायास तीं ॥

गीतगोविंद समश्लोकीच्या उपसंहारांत टीकाकार ह्मणतात:—

श्रीमद्ब्रह्मानंदशिष्यें तुकेशें । नागेशाच्या आत्मजें स्वर्णदेशें ॥
देशी भाषा संस्कृताची सुरेखा । केली श्रीमद्गीतगोविंदटीका ॥

भर्तृहरी-शतकत्रयावरील समश्लोकी टीकेंतील उतारे—

### श्लोक.

मुखें कांहीं हांसे सरळ चपळा चोलन कळा ।
ससंमोहा वाचा सरसिक विलासोक्ति सकळा ॥
गतीच्या प्रारंभीं कमळदळविस्तारचि निका ।
मृगाक्षी तारुण्या न प्रथम हिरण्यासमचि कां ॥
कुंकुम कर्दम चिन्हें शरिरा । गौर कुचांवरि कंठ विहारा ॥
हंसगती घुंगुर पदपद्मा । रंजविना कवणा अशि रामा ॥
मुग्ध स्त्री स्वजनरजनीं गतगुणा जाली सकामोन्मखी ।
लज्जा वधू भीत धैर्यगलिता कंपांकिताला निकी ॥
प्रोत्कंठित कामिनी रतिरस प्रौढी सकामें रते ।
निःशंकाकविकर्षणें सुख महा तेजें कुलस्त्रीरतें ॥

भोगीं रोगभयें सुखीं असुखता वित्तीं नृपाचीं भयें ।
मानीं दैन्यभयें बळीं रिपुभयें रूपीं जरेचीं भयें ॥
शास्त्रीं वादिभयें गुणीं खळभयें देहीं यमाचीं भयें ।
वस्तू सर्व भयान्विता, नर धरो वैराग्य भीना भयें ॥
ते रम्या नगरी महानृपति तो मंत्रीसभा ते घना ।
भागीं त्या उभयीं सुवेत्र धरुनी त्या चंद्रबिंबानना ॥
राज्यायोग्य सुशील राजसुत तो ते भारती कीर्तनें ।
ज्याच्या साह्यवशें समस्तहि नमो त्या काळजीकारणें ॥

निघेल पिळितां सुतैल अतिसाहसें वाळुके ।
मृगोदक पिऊनही तृषित शांत होऊं शके ॥
मिळेल भलते वनीं शशकशृंगही शोधितां ।
असाध्य जवळून मूर्खजन चित्त संबोधितां ॥

तुकाब्रह्मानंद स्वामीकृत वेदांतरहस्यांतील उतारे—

## ओव्या.

फेणासी ह्मणती हें अंभ । अभ्रास मानिती हेंचि नभ ।
भ्रांत परी निभ्रांत निर्लोभ । यथा जगदारंभ मायामोहीं ॥
अंध पंगूतें वाहूनि खांदीं । मार्ग क्रमी पंगूचिया शब्दबुद्धि ।
पंगू क्रमी अंधाचिया पदीं । उभयां कार्यसिद्धि परस्परें ॥
आत्मा पंगु प्रकृति अंध । येरयेरां अनादि संबध ॥
तेणे प्रकृतिपुरुषसंयोगें विविध । क्रियासंबंध प्रगट होय ॥
प्रद्युम्नरूपिणी स्वयें प्रकृति । प्रद्युम्नानंद पुरुष प्रकृति ।
उत्तम संयोगें विविध कृती । विविध उत्पत्ती क्रियेच्या तेथ ॥
मन स्वभावें प्रचंचल अति । तदर्थ शंकराचार्यवचनोक्ति ।
"यत्संकल्प विकल्पे रति । कंथ तद्भवति मनोत्मैव ॥"

सुदामचरित्रांतील उतारे—

### ओव्या.

विवेकी सज्ञान ब्राह्मण । अयाचित वृत्ति अतिगहन ।
अप्राप्त भावाचा जो शीण । विवेकें संपूर्ण विसरला ॥
अखंड वायूचें संचरण । तें अभ्रें केविं व्यापिजे गगन ।
विवकाची राहटी पूर्ण । तेथ अज्ञानश्वान रिघे कैसें ॥
हा ब्राह्मण अतिनिर्धन । भगवद्भक्तिपरायण ।
याचे पाशीं झालिया धन । भगवद्भजन मग कैसें ॥
धनें वाढेल धनमदु । धनें वाढेल कामक्रोधु ।
धनें वाढेल विषयभेदु । तदा गोविंदु स्मरे केवीं ॥

नाटकरामायणांतील श्लोक—

दृष्टादृष्टि परस्परें मिसळतां सल्लग्न जीवाशिवा ।
होतां लोचन पल्लवा झडकरी सलज्ज उर्वी भवा ॥
पाहे मन्मथमातृका पुनरपी रामास मुक्तेक्षणीं ।
तों लज्जापट मुक्त चिन्मय गुरु ॐ पुण्य गर्जे ध्वनी ॥
संतोषला राघव दे पदातें । जें नासितें संसृति–आपदांतें ।
घेतां करीं तत्पदपंकजातें । जाली विदेहीच विदेहजा त ॥

सौंदर्यखाणि नवरी गुणभूवरिष्ठा ।
जाली असेल बहुधा वरभूतचेष्टा ॥
आदित्य वंशगुरु भूतभविष्यद्रष्टा ।
दावा तया जन म्हणे नवरी वसिष्ठा ॥

प्रसादें संतांच्या गुरुवरपदीं प्रीति नटली ।
गुरोप्रीत्या असत्कथन विषयीं बुद्धि विटली ॥
सरे तों प्रारब्धावधि व्रत मला हेंच करणें ।
महाकीर्त्याधारें वर्णनि भवसिंधूच तरणें ॥

याशिवाय, पुणें येथील प्रसिद्ध विद्वान् दैवज्ञ वे. शा. सं. बाळशास्त्री रावजीशास्त्री क्षीरसागर यांनीं स्वज्ञातीयांसाठीं 'स्तोत्ररत्नमाला' नामक एक पुस्तक प्रसिद्ध केलें आहे, त्यात तुकाब्रह्मानंदकृत कांहीं स्तोत्रांचा

समावेश झालेला आहे. वरील वेंचे लेखकप्रमादामुळें असावे तसे शुद्ध नसल्यामुळें कांहीं स्थलीं व्हावा तसा अर्थबोध होत नाहीं. तथापि एकंदरींत, तुका ब्रह्मानंद यांची वाणी बरीच रसाळ असून वेदांतविषयाचाही त्यांचा व्यासंग मोठा असला पाहिजे असें त्यांच्यां कवितेवरून दिसतें. भर्तृहरी–शतकत्रयावर वामन, तुकारामबाबा वर्दे आणि तुका ब्रह्मानंद या तीन मराठी कवींनीं समश्लोकी टीका केली आहे. याशिवाय 'तुका विप्र' यांचीही एक समश्लोकी टीका आहे, अशी माहिती ठाणें येथील प्रसिद्ध संशोधक व लेखक रा. विनायक लक्ष्मण भावे यांनीं दिली. 'तुका' या नामैक्यामुळें या बाबतींत कांहीं तरी गैरसमज किंवा घोटाळाही होण्याचा संभव आहे.

---

# लिंगनाथ योगी.

हे नाथ सांप्रदायी सत्पुरुष सुमारें १७५ वर्षांपूर्वी कर्नाटकांत चंदी चंदावरच्या बाजूस होऊन गेले. यांचा '**अमृतसार**' नामक १५ अध्यायांचा एक योगशास्त्रविषयक ग्रंथ उपलब्ध झाला आहे तो त्यांनीं शके १६४६ (इ. स. १७२४) या वर्षी कावेरीतीरीं चंदावर येथें लिहिला. त्या वेळीं तेथें 'शरभ' नामक राजा राज्य करीत होता असें वाटतें. या राजासंबंधानें लिंगनाथ ह्मणतातः—

तया नगरीं शरभ भूपती । राज्य करीत गा सुमती ।
तो साक्षात् शिवमूर्ति । त्याची किर्ति अगाध ॥ ५५ ॥
तो भक्तवत्सल करुणाकर । ब्रह्मज्ञानाचा सागर ।
कैवल्यपदींचा दातार । तो परात्पर शिवावतार ॥ ५६ ॥
शिव तोचि गा शरभ । शरभ तोचि शिव स्वयंभ ।
सर्वसाक्षी जैसें नभ । तैसाचि सांब शरभमूर्ति ॥ ५७ ॥

त्याची वानितां ख्याति । मौनावती वेदश्रुति ।
ऐसा तो शरभ चक्रवर्ती । राज्याधिपति राज्य करित ॥ ५८ ॥
तो राज्य करितां जाण । क्रोधसंवत्सरीं उत्तरायण ।
मास शुद्ध फाल्गुन । पौर्णिमा पूर्ण गुरुवार ॥ ५९ ॥
तद्दिनीं हा ग्रंथ । समाप्त केला **लिंगनाथें** ।
संतीं मानुनी यथार्थ । मनासी ग्रंथ आणावा ॥ ६० ॥

अमृतसार, अध्याय १५ वा.

वरील ओव्यांत ज्याचें कवीनें वर्णन केलें आहे, तो चक्रवर्ती शरभ राजा इतिहासांत फारसा कोठें प्रसिद्ध नाहीं. ' साक्षात् शिव-मूर्ति,' ' भक्तवत्सल,' ' करुणाकर,' ' ब्रह्मज्ञानाचा सागर,' ' परात्पर शिवावतार, ' ' कैवल्यपदींचा दातार ' इत्यादि विशेषणें कवीनें या शरभ राजास लावलीं आहेत, तीं इतकीं अतिशयोक्तिपूर्ण दिसतात कीं, कोणत्याही मानवप्राण्यास तीं यथार्थत्वानें लावितां येतील असें वाटत नाहीं. विशेषतः ह्या राजाची कीर्ति गातांना " मौनावती वेदश्रुति " असे जे विलक्षण उद्गार कवीनें काढले आहेत ते अगदींच हास्यास्पद दिसतात व यावरून हा लिंगनाथ योगी ह्या शरभ राजाचा एखादा आश्रित असावा असें वाटतें. **नागेश** कवीनेंही आपल्या चंद्रावळविर्णन काव्यांत आपल्या आश्रयदात्या सरदाराचा " कोकाख्या यशवंतराव जगतीं विख्यात राजा असे " अशा गौरवपर शब्दांनीं उल्लेख केला आहे; पण " जगतीं विख्यात असणारा हा यशवंतराव कोकाख्या " कोण याचा जसा इतिहासांत शोध लागत नाहीं, तसाच या " साक्षात् शिवमूर्ति" शरभ राजाचाही प्रकार असेल तर कोण जाणे ! आश्रितांनीं आपल्या उदार आश्रयदात्यांचा आपल्या ग्रंथांतून कृतज्ञतापूर्वक

उल्लेख करावा यांत कांहीं वावगें आहे असें नाहीं, पण वरच्या सारख्या ' अशक्य ' विशेषणांनीं एखाद्या सामान्य राजपुरुषाचा गौरव करणें म्हणजे अतिशयोक्तीची आणि स्तुतिपाठकत्वाची अगदीं कमाल झाली असें म्हटलें पाहिजे. परंतु एक गोष्ट मात्र येथें नमूद करणें अवश्य आहे; आणि ती गोष्ट ही कीं हा शरभ म्हणजे जर त्या प्रांतांतील एखादा देव असेल व कवीनें त्यालाच ' चक्रवर्ती राजा ' म्हटलें असेल तर वरील टीका कविकृत वर्णनास लागू पडणार नाहीं हें उघड आहे. असो.

लिंगनाथानीं आपली जी गुरुपरंपरा दिली आहे ती येणेंप्रमाणें:— १ आदिनाथ २ मत्स्येंद्रनाथ ३ गोरक्षनाथ ४ गैनीनाथ ५ निवृत्तिनाथ ६ ज्ञानदेव ७ सोपान ८ मुकुंदनाथ ९ अलक्ष योगी १० अचिंत्यनाथ ११ अव्यक्त १२ जनार्दन १३ त्र्यंबक १४ कोनेरीनाथ १५ लिंगनाथ. लिंगनाथांच्या पश्चात् ही परंपरा कोठपर्यंत चालू होती किंवा आहे, एतद्विषयक माहिती मिळाली नाहीं. कोनेरीनाथांनीं आपलें नांव 'लिंगनाथ' ठेविलें असें कवि ह्मणतो, यावरून त्याचें मूळचें नांव निराळें असून , लिंगनाथ हें संप्रदायांतलें नांव आहे हें उघड दिसतें.

**अमृतसार** या ग्रंथाची ओवीसंख्या १४०० आहे. हा ग्रंथ अद्याप अप्रकाशित असून, त्याची हस्तलिखित प्रत रा. लक्ष्मण रामचंद्र पांगारकर यांच्या संग्रहीं आहे. ग्रंथाची भाषा प्रायः शुद्ध व साधी आहे. ग्रंथाचा मुख्य विषय योगशास्त्र व परमार्थोपदेश हा आहे. अर्थात् यांत काव्य मुळींच नाहीं हें सांगावयास नकोच. हातीं घेतलेल्या विषयाचें विवेचन कवीनें चांगलें केलें आहे. ह्या ग्रंथाशिवाय लिंग-

नाथांचे आणखी कांहीं ग्रंथ किंवा फुटकळ कविता आहे कीं काय याविषयीं शोध केला पाहिजे. अमृतसार ग्रंथारंभींच लिंगनाथ अभाविक लोकांसंबंधानें ह्मणतात:—

ऐक त्या अभाविकांचे गुण । संसारीं आसक्त होऊन ।
स्त्रीपुत्रादिकीं गोवुनी मन । थोर आपण ह्मणविती ॥
मनीं धरूनि अभिमान । संतांसी न करिती नमन ।
ऐसे जे दुर्जन जन । तयांसी श्रीकृष्ण नुद्धरी ॥
अंतरीं नाहीं विश्वास । उदास होती परमार्थास ।
उडी घालिती प्रपंचास । ऐसियां मूढांस कोण तारी ॥
शरीरीं असतां अभाव । लटिकाचि दाखविती भाव ।
कित्येक ऐसेही मानव । केवळ गाढव पैं असती ॥
गुरूसि शरण जावें ह्मणती । ह्मणौनी मग माघारे यती ।
ऐसी अभक्तांची स्थिति । सांगतां चित्तीं विकल्प वाटे ॥
वरी वरी बोलती गोड । जीवीं नाहीं अनुग्रहाची चाड ।
गुरुमर्यादेची भीड । न धरिती लंड खळपणें ॥
अखंड सत्पुरुषांची निंदा । करणें हाच त्यांचा धंदा ।
नाठविती हरि गोविंदा । हृदयीं कदा मूढ ते ॥
ऐसा ज्यांचा स्वभाव । तैशांस कैसा भेटे देव ।
आणि स्वरूपाचा अनुभव । कैसेनि गुरुराव सांगेल ॥
ते वंचले मूर्खपणें । त्यांसी गुरूची खूण न बाणे ।
ऐसें जाणोनि जे शाहणे । ते गुरूसी शरण रिघती ॥

आतां भाविक लोकांसंबंधाचे कवीचे उद्गार पहा:—

आतां तयांचीं लक्षणें । सांगिजेल, श्रवणीं चित्त देणें ।
जे गुरूसी अंतःकरणें । जीवें प्राणें नित्य भजती ॥
धन पुत्र दारादि संपत्ति । जे श्रीगुरुसी भावें अर्पिती ।
शेखीं आपणातेंही न वंचिती । अनन्य प्रीती गुरुभजनीं ॥
सदां करितां श्रवण कीर्तन । स्मरण आणि पादसेवन ।

अर्चन वंदन दास्यपण । सख्य आत्मनिवेदनही ॥
ऐसी भजनाची परवडी । करूनि सेविती स्वरूपगोडी ।
त्यांची बोलवेना आवडी । मन घे मुरकुंडी गुरुचरणीं ॥
ऐसे जे गुरुभक्त । तेचि होती जीवन्मुक्त ।
ऐसेंचि भागवतीं शास्त्रोक्त । स्वयें भगवंतु बोलतु ॥
तेचि विरक्त तेचि ज्ञानी । त्यांचा महिमा कोण वानी ।
जे समरसले निर्गुणस्थानीं । आत्मानुसंधानी ते जाले ॥
त्यांसी जन्ममरणाची वार्ता । कल्पातींही नाहीं पाहतां ।
परब्रह्मीं पावोनि तद्रूपता । तेथेंचि तत्त्वता राहिले ॥
धन्य धन्य ते भक्तराज । जन्मा आलियाचें काज ।
तयांसीच फळलें वोज । जेहीं निजगुज ओळखलें ॥

योगशास्त्रोक्त मुद्रामार्गानें योगसाधन करणाऱ्या लोकांविषयीं कवि ह्मणतातः—

कोण्ही चारी मुद्रेच्या साधनीं । अर्धोन्मिलित दृष्टि करुनी ।
लक्ष लाविती गगनीं । नानारूप नयनीं अवलोकिती ॥
सूर्य चंद्र उगवले जैसे । तैसें गगनगर्भी तेज भासे ।
किंवा तारांगणें उदेलींसी दिसे । साधक उल्हासें पाहती ॥
मुक्ताफळांचिया पंगती । लखलखीत भासों लागती ।
सोनियाचे चूर दिसती । तार उठती प्रकाशाचे ॥
कां उजळले रत्नदीपक । झळझळीत जैसा मयंक ।
तैसें तेज निष्कळंक । भक्त भाविक अनुभविती ॥
जैसा चांदण्याचा गोंधळ । उगवला दिसे सोज्वळ ।
तैसा प्रकाश भासे निर्मळ । नाहीं मळ प्रपंचाचा ॥
थळथळीत ज्योतिप्रभा । दीप्ति फांके तया नभा ।
जैसी विद्युल्लतेची सभा । तैसी शोभा दृष्टीं दिसे ॥
दंडाकारें नभोदरीं । अर्धचंद्राचिये परी ।
ज्योति झळके अखंडाकारीं । नाना प्रकारीं दिसती चिन्हें ॥
ते दिसोनि न दिसती । न दिसोनियां दिसती ।

पुनरपि पालटती । ऐसें देखती सद्भक्त ॥
रक्त श्वेत कृष्ण नीळ पीत । डोळां पांचही वर्ण भासत ।
तयांत व्यापूनि सदोदित । दिसे झमकत ब्रह्मतेज ॥
तया ब्रह्मतेजामाझारी । कळा दिसती परोपरी ।
पाहतांची सामोरी । देहाची उरी न उरेची ॥
जिकडे तिकडे ब्रह्मरूप । दिसतसे आपेंआप ।
हा चांचरी मुद्रेचा प्रताप । न्याहाळिती अमूप तेज कोण्ही ॥

हें सगळें योगशास्त्राचें विवेचन आहे आणि इतकें सुरस विवेचन प्रत्यक्षानुभवाशिवाय करितां येणें शक्य नाहीं. अर्थात् योगशास्त्राभ्यासांत कवीनें पुष्कळच प्रगति केली असली पाहिजे, हें उघड दिसतें.

---

# ज्योतिपंत महाभागवत.

इसवी सनाच्या अठराव्या शतकांत महाराष्ट्रांत जे अनेक संतकवि होऊन गेले त्यांपैकीं **ज्योतिपंत महाभागवत** हे एक प्रमुख संतकवि होत. यांची थोडीशी माहिती ' इतिहाससंग्रह ' मासिकांत व 'इंदुप्रकाश ' पत्राच्या १९०७ च्या ता० ३० आगष्टच्या अंकांत प्रसिद्ध झालेली आहे. शिवाय त्यांच्या संप्रदायांतील सखाराम नामक एका गृहस्थांनीं शके १८२३ त, " **श्रीस्वयंज्योतिकथामृत** " नामक १३ अध्यायांचा एक ओवीबद्ध ग्रंथ लिहिला आहे, त्यांत ज्योतिपंतांचें विस्तृत चरित्र दिलें आहे; व त्याच ग्रंथाच्या आधारानें प्रस्तुत चरित्रलेख मी लिहित आहें.

रघुनाथ या नांवाचा गोदातीरस्थ एक ब्राह्मण गंगेच्या कावडी नेऊन रामेश्वरास घालीत असे. अशा प्रकारें त्यानें सहा वेळ कावडी घातल्या. सातव्या खेपेस रामेश्वरचा सेतु घेऊन तो कर्नाटकांतून

चालला असतां, माध्यान्हकालीं एका सरोवराच्या कांठीं, अश्वत्थ वृक्षाखालीं विश्रांतीस बसला. त्याजपाशीं १०० मोहरा होत्या, त्या व आपलीं वस्त्रें वृक्षाखालीं ठेवून तो ब्राह्मण स्नानार्थ सरोवरांत उतरला. जवळच्या शेतांत एक चोर नांगर हांकीत होता, त्याच्या मनांत असा विचार आला कीं ब्राम्हणास लुटावें. मग तो धांवत आपल्या घरीं गेला व ब्राह्मणापाशीं असलेलें द्रव्य लांबविण्याचा आपला विचार त्यानें आपल्या आईस कळविला. तेव्हां तिनें त्याचा धिक्कार करून ह्मटलें, "यांत मला काय विचारावयास आलास ? चोरी करणें हा आपला कुलधर्मच आहे, तरी त्या ब्राह्मणास मारून त्याचें द्रव्य तूं घेऊन ये. " हें ऐकतांच तो चोर पळत तलावावर आला. ब्राह्मण स्वस्थपणें आपलें नित्यकर्म करीत आहे असें पाहून त्यानें एक मोठा पाषाण उचलून तो ब्राह्मणाच्या डोक्यावर टाकला. त्या आघातानें ब्राह्मण तत्क्षणीं पंचत्व पावला. चोरानें त्याचें द्रव्य व वस्त्रें नेऊन आपल्या आईपाशीं दिलीं. इकडे तो ब्राह्मण समंध होऊन त्या अश्वत्थ वृक्षावर राहिला ! परंतु चोर जातीचा रामोशी असल्यामुळें त्या समंधास त्याला कांहीं उपद्रव करितां येईना. तेव्हां, जन्मांतरीं त्याचा सूड घेण्याचा त्यानें निश्चय केला. इकडे त्या चोराच्या पत्नीस, ब्रह्महत्येचें पातक करून आपल्या पतीनें द्रव्य आणिलें ही हकीकत समजतांच खेद वाटला व त्रिवार शिवनामोच्चार करून तिनें देहविसर्जन केलें. " मृत्युकालीं माझ्या नांवाचा त्रिवार उच्चार करून तूं सोमवारीं पंचत्व पावलीस तरी ह्या तुझ्या पुण्यकृत्यामुळें मी तीन वेळां तुझ्या उदरीं जन्म घेईन, " असें प्रवरदान शंकरानीं तिला दिलें. तो

तस्करही कांहीं दिवसांनीं मरण पावला व एका अथर्ववेदी ब्राह्मण-कुलांत जन्मास आला. कुलाचें गोत्र उपमन्यु होतें. त्या तस्कराची पत्नीही ब्राह्मणकुलांत जन्म पावली होती, तिच्याशींच त्याचें लग्न झालें. तिला पुत्र होतांच, समंधानें तिच्या पतीस पछाडल्यामुळें त्याला भयंकर पोटशूळ उत्पन्न झाला:—

उभा राहोनि तो महापुरुष । पूर्वजन्मींच्या बोले वृत्तांतास ।
हरण केलें माझिया वित्तास । प्राण घेतला तूंचि पैं ॥
दांत खातसे क्रोधें करकरां । अरे पापिष्ठा तस्करा ।
पोसावया रांडा पोरां । मज पाषाणें हाणितलें ॥
क्रोधें ऐसें बोलून । छळूं लागला अतिघन ।
दारिद्र्य सुदाम्याचें येऊन । प्राप्त झालें तेधवां ॥

याप्रमाणें त्या ब्राह्मणानें पुष्कळ दिवस दुःख भोगलें, परंतु अनेक उपाय केले तरी व्याधीचा उपशम होईना. हा ब्राह्मण विटें येथील रहिवासी होता. गांवापासून दोन कोसांवर रामेश्वर नामक देवस्थान आहे, तेथें जाऊन नित्य देवदर्शन घेण्याचा त्या ब्राह्मणानें क्रम सुरू केला. त्याचें नांव नारायण होतें. त्यानें पुष्कळ दिवस शंकराची उपासना केली. त्याच्या पत्नीच्या पोटीं अंशरूपानें शंकरानीं जन्म धारण केला. ह्या पुत्राचें नांव गंगाधर.तो निस्सीम शिवोपासक असून नित्य रामेश्वराचें अनुष्ठान करीत असे. एकदां तो रामेश्वरास जात असतां घाटेंत चोरांनीं त्याला गांठलें. तेव्हां धांवत धांवत देवळांत जाऊन त्यानें शंकराची प्रार्थना केली कीं " भगवंता, हे तस्कर माझा पाठलाग करीत आहेत, यांपासून माझें रक्षण कर." इतक्यांत देवळांतील पिंडी दुभंग झाली. गंगाधरानें पिंडींत प्रवेश केला. नंतर पिंडी पूर्ववत् झाली. चोरांनीं देवळांत येऊन पाहिलें तों ब्राह्मण कोठें दृष्टीस

पडेना. इतक्यांत एका चोराची नजर पिंडीकडे जातांच, ब्राह्मणाच्या धोतराचा पदर थोडासा बाहेर राहिला होता तो त्याच्या दृष्टीस पडला. हा चमत्कार पाहतांच चोरांस मोठें आश्चर्य वाटलें व हा शंकराचा मोठा भक्त आहे असें समजून—

तस्करीं सांडिला द्वेष त्याचा । भक्त देखिला श्रीहरीचा
अभय देती निश्चय साचा । उपद्रव यासी न लावूं आह्मी ॥
शंकरस्तुति ते वेळां । करीत उभा तस्करमेळा ।
संतोष झाला कंठनीळा । तंव तो निघाला ब्राह्मण ॥
शपथ करिती रामेश्वरासी । उचलून देती बिल्वपत्रीसी ।
उपद्रव न करितां समागमेसी । प्रतिदिवशीं गृहा पोहोचऊं ॥

हें वचन त्या चोरांनीं शेवटपर्यंत पाळिलें. महान् शिवभक्त ह्मणून गंगाधराची फार प्रसिद्धि झाली. नित्य शंकराची उपासना करीत असतां गंगाधराच्या मनांत एके दिवशीं असें आलें कीं चरितार्थाचें कांहीं तरी कायमचें साधन भगवंतापाशीं मागावें. मग त्यानें शंकराची प्रार्थना केली कीं:—

माझे मनींची वासना । तुवां पुरवावी त्रिनयना ।
अखंड अन्न आच्छादना । नव्हे तुटी तुझ्या कृपें ॥

तेव्हां, त्याच दिवशीं शंकरांनीं स्वप्नांत दृष्टांत दिला कीं:—

माझिया देउळा शिखरीं । नेत्र झांकोनि प्रदक्षिणा करीं ।
फळ पावशील निर्धारीं । मग दिशा अवलोकिजे ॥
अवलोकन करिसी जिकडे । वृत्तिमान प्राप्त तुजपुढें ।
फिटेल जन्मींचें सांकडें । वंशपरंपरा अक्षयी ॥

ही दृष्टांताची गोष्ट गंगाधरानें अगदीं गुप्त ठेविली; व प्रातःकाळीं पूजासामग्री घेऊन दृष्टांतांत सांगितल्याप्रमाणें, सर्व विधि पुरा केला. देवळावर चढून शिखरासभोंवतीं तीन प्रदक्षिणा केल्यावर डोळे उघ-

हून पाहतो तों पूर्वदिशा समोर आली. नंतर तो घरीं येण्यास निघाला. तेव्हां वाटेंत त्यास अनेक शुभशकून झाले. तिकडे विजापूरच्या बादशहास भगवंतानें स्वप्नांत असा दृष्टांत दिला कीं, " माझा भक्त गंगाधर विटें येथें राहतो. त्याला आणवून आपलें मंत्रिपद तूं त्यास दे. " सकाळीं बादशहानें वाजंत्री, पालखी वगैरे सरंजाम देऊन, गंगाधरपंतांस आणण्यासाठीं माणसें पाठविलीं. तीं विटें येथें शोध करीत करीत गंगाधराच्या घरीं आलीं; तेव्हां त्यास दृष्टांताची आठवण होऊन,

हृदयीं आनंद झाला पूर्ण । पाचारितसे तयांलागुन ।
कोठोनि आलां काय कारण । गुज तुमचें कथन करा ॥
ऐकोनि तयांचें वचन । दूत देती प्रतिवचन ।
आमुच्या रायें तुम्हांलागुन । पाचारिलें मंत्रिपणें ॥
राज्य आहे मंत्रिहीन । प्रजा करिती यथेष्ट आचरण ।
आपण त्यांतें करोनि शासन । राज्यभार चालवावा ॥

हें ऐकून गंगाधरानें श्रीशंकराचें भक्तिपूर्वक स्मरण केलें व आपल्या आईबापांसहवर्तमान तो विजापुरीं जाण्यास निघाला. त्याच्या ओळखीनें आपल्यासही कांहीं लाभ झाला तर पहावा या हेतूनें कांहीं नागरिक जनही त्याजबरोबर जाण्यास निघाले. विजापुरीं गेल्यावर बादशाहानें गंगाधरास प्रधानकीचीं वस्त्रें देऊन शिक्कामोर्तब त्याच्या स्वाधीन केलें. गंगाधरानेंही यथान्याय प्रजापालन पुष्कळ वर्षें केलें. एके दिवशीं बादशहास पुनः दृष्टांत झाला कीं, गंगाधरास कायमचें मोठें उत्पन्न देऊन त्याचा व त्याच्या वंशजांचा योगक्षेम अखंड चालेल अशी व्यवस्था करावी. त्याप्रमाणें बादशहानें खटाव प्रांतांतील एकशें पांच गांवांचा सरंजाम गंगाधरास तोडून दिला. पुढें गंगाधराच्या वृद्ध आईबापांस काशीयात्रेची इच्छा झाली. तेव्हा गंगाधरानें त्यांजब-

रोबर काशीयात्रेस जाण्याची परवानगी बादशहाकडे मागितली. तेव्हां बादशहास वाईट वाटलें. आतां पुढें आपल्या राज्याचा कारभार सुयंत्रपणें कसा चालेल, ही काळजी त्यास उत्पन्न झाली. तेव्हां गंगाधरानें त्यास सांगितलें:—

नाहीं भय तुम्हां आतां । द्वादश वर्षें जाण तत्त्वता ।
दृश्य होईल ईश्वर सत्ता । तदनुसार वर्तावें ॥

इतकें सांगून, व बादशहाचा आणि नागरिकांचा निरोप घेऊन, गंगाधर पूर्वोल्लेखित रामेश्वर महादेवाच्या दर्शनास गेला. तेथें त्यानें आपल्या आईबापांचा काशीयात्राहेतु देवास निवेदन केला व तो हेतु पूर्ण करण्याविषयीं देवाची प्रार्थना केली. तेव्हां रामेश्वर हांसून ह्मणाले "अरे, गंगास्नानार्थ इतकें दूर जावयास नको. येथेंच गंगास्नान करा. येथून २००० पावलांवर ईशान्य दिशेस एका जागीं तीन पाषाण आहेत त्यांजजवळ गंगा आहे." हें ऐकतांच गंगाधरानें त्या ठिकाणीं जाऊन पाहिलें. तों पांढऱ्या शुभ्र उदकाचा झरा त्याच्या दृष्टीस पडला. तेव्हां गंगाधरानें माणसें पाठवून आपल्या आईबापांस त्या ठिकाणी आणविलें. गंगा आल्याची बातमी सर्वत्र पसरतांच शेंकडो लोकांनीं येऊन स्नान केलें; व गंगाधराच्या निस्सीम शिवभक्तीची सर्वांनीं फार तारीफ केली. गंगाधरानें मातापित्यास गंगोदकस्नान घालून, गोप्रदान दिलें; व ब्राह्मणभोजन घालून मोठा समारंभ केला. अस्तमानीं सर्व मंडळीं घरीं गेली. अद्याप श्रावणी सोमवारीं या रामेश्वराची यात्रा भरते, व भागीरथी कुंडांत लोक स्नान करितात.

एके दिवशीं गंगाधर रामेश्वरास अभिषेक करीत असत। त्याच्या हातांतलें अभिषेकपात्र पिंडिकेवर पडून तिला टेंगूळ आलें. तेव्हां

गंगाधरानें तेंच पात्र घेऊन आपल्या मस्तकावर ताडन केलें ! शंकर प्रसन्न होऊन त्यांनीं त्यास आश्वासन दिलें कीं, " तुझ्या वंशांत जो सातवा पुरुष होईल त्याच्या हातून हें टेंगूळ जिरेल. तुझ्या मातेच्या उदरीं मला तीन वेळ जन्म घ्यावयाचा आहे. तुझे आईबाप आतां लवकरच पंचत्व पावतील. मग तूंही लवकरच देहविसर्जन करून मत्स्वरूपीं लीन हो. " नंतर गंगाधर घरीं आला. कांहीं दिवसांनीं आईबाप मरण पावले. त्यांचा अंत्यविधी यथासांग रीतीनें करून व आपल्या मालकीच्या १०५ गांवांपैकीं ४० गांव आपल्या धाकट्या भावास व ६५ गांव आपल्या वंशजांस देऊन गंगाधर मल्हार क्षेत्रीं गेला व तेथें त्यानें देह ठेविला. समाधि लावून ब्रह्मांडीं प्राण चढविले, तेव्हां

ब्रह्मरंध्र भेदुनियां । लीन झाले ब्रह्मीं तया ।
पंचतत्वें गेलीं विलया । स्वस्वरूपीं मिळाले ॥
मलवडी नामें विख्यात । प्रसिद्ध असे विश्वांत ।
मल्हार म्हाळसा देव नांदत । तयां चरणीं देह अर्पिला ॥

गंगाधरापासून चरित्रनायक ज्योतिबुवा महाभागवतांपर्यंत सात पुरुष झाले त्यांचीं नांवें येणेंप्रमाणें:—१ गंगाधर, २ कोन्हेरपंत, ३ तिमाजी, ४ कोन्हेरपंत, ५ राघोपंत, ६ तिमाजी, ७ गोपाळपंत, ८ ज्योतिपंत. गंगाधरावर शंकराची कृपा झाल्यापासून समंधानें त्याला उपद्रव केला नाहीं; परंतु प्रस्तुत चरित्रनायक ज्योतिपंत महाभागवत यांच्या वडिलांचा त्यानें बराच छळ केला. गंगाधराच्या वंशांतील सहावे पुरुष गोपाळपंत ( ज्योतिपंतांचे वडील ) हे निर्मळ अंतःकरणाचे असून, फर्डे कारकून होते. परंतु समंधाचा त्रास होऊं लागल्यामुळें त्यांनीं देशत्याग केला. फिरतां फिरतां विटें येथें त्यांचे

आप्त होते, त्यांच्या सान्निध त्यांनीं वास्तव्य केलें. ग्रामस्थ लोकांच्या मुलांस शिक्षण देऊन, त्यावर जें काय मिळे त्यांत ते आपला योगक्षेम चालवीत. अशा रीतीनें विटें येथें त्यांची पुष्कळ वर्षे गेलीं. त्यांचे चिरंजीव ज्योतिपंत हे वीस वर्षांचे झाले तरी विद्याभ्यासाकडे त्यांचें लक्ष लागेना; तेव्हां एके दिवशीं गोपाळपंतांनीं रागानें त्यांस मारून घराबाहेर घालविलें. ते त्यांस म्हणाले:—

माझिया उदरीं पाषाण । केंवि जन्मलासि तूं जाण ।
वृद्धपणीं आम्हां दूषण । देती सकल स्वजनही ॥
नको राहूं जाईं परता । नको दाखवूं वदन आतां ।
विद्याभ्यास शिकोन येतां । घेईन आपल्या स्वगृहीं ॥
माझी विद्या लाधली । सर्व मुलें फळासि आलीं ।
आपल्याला गृहासि गेलीं । पूर्ण जालीं संसारीं ॥

" मौंजीबंधनापासून सारखे सहा महिने याला मी गायत्री मंत्र शिकविला पण त्यांतलें एक अक्षरदेखील याच्या ध्यानांत राहिलें नाहीं ! असला मतिमंद पुत्र घरांत ठेवून काय उपयोग ?" इत्यादि शब्द बोलून गोपाळपंतांनीं आपल्या मुलास घरांतून काढून लाविलें तेव्हां त्यांच्या पत्नीस मोठा खेद झाला. ती ह्मणाली:—

एकचि पुत्र आपुले पोटीं । बाहेर घातला विद्येसाठीं ।
काय लिहिलेंसे ललाटीं । ईश्वरसत्ते घडेल तें ॥

इकडे ज्योतिपंत गांवांतलीं मुलें बरोबर घेऊन गांवाबाहेर निघाले. तेथें श्रीगणेशाची मूर्ति होती तिजपाशीं जाऊन सर्व मुलांस त्यांनीं सांगितलें कीं हा विद्यादाता गजानन येथें आहे, याजकडून आपण चौदा विद्या चौसष्ट कला मागून घेऊं. मात्र ही गोष्ट गांवांत कोणास कळवूं नका. सर्व मुलांस ही गोष्ट पटली, परंतु इतक्या मुलांस

बसण्यापुरती जागा तेथें नसल्यामुळें गणपतीचें देऊळ बांधण्याचें त्यांनीं ठरविलें. पाणी आणि माती आणून त्यांनीं एक लहानसें देऊळ उभारलें. नंतर ज्योतिपंत सर्व मुलांस म्हणाले " आतां आपण या देवळांत बसून श्रीगणपतीची आराधना करूं म्हणजे आपणास सर्व सिद्धि प्राप्त होतील." तेव्हां मुलें म्हणालीं " तूंच येकटा येथें खुशाल बैस. आम्हांस घरीं जाण्यास अगोदरच उशीर झाला आहे, त्यांत आणखी कांहीं वेळ आम्ही येथें थांबलों, तर आम्हांस घरीं मार मात्र खावा लागेल. " पंतांनीं त्या मुलांची पुष्कळ समजूत केली, पण तीं ऐकेनात. तेव्हां पंत त्यांस म्हणाले " तुह्मी जाणार तर जा, पण जाण्यापूर्वी देवळाचें एवढें द्वार बुजवून टाका; व मी देवळांत बसलों आहें, ही गोष्ट गांवांत कोणास सांगूं नका. " इतकें बोलून ज्योतिपंत देवळांत गणपतीजवळ जाऊन बसले व देवळाचें द्वार मातीनें बुजवून टाकून मुलें आपापल्या घरीं गेलीं. घडलेली हकीकत गांवांत त्यांनीं कोणासही सांगितली नाहीं. इकडे, ज्योतिपंत घरीं आले नाहींत म्हणून त्यांचीं मातापितरें चिंताक्रांत झालीं.

" हा हा देवा काय केलें । रागें पुत्रासी दवडिलें ।
हातींचें रत्न झोंकुनी दिधलें । आतां रडावें कासया ॥
एकचि पुत्र आमुचे वंशीं । क्रोधें धाडिला देशांतरासी ।
गति नाहीं परलोकासी । प्रपंचही न जाहला ॥ "

अशा रीतीनें खेद करीत, अन्नपाण्यावांचून त्यांनीं सहा दिवस काढले. सहाव्या दिवशीं रात्रौ श्रीशंकरानीं विप्रवेषानें स्वप्नांत देऊन त्यांस सांगितलें कीं, तुमचा पुत्र माझ्या प्रसादानें मोठा कीर्तिमान् होईल.

इकडे ज्योतिपंत गजाननमूर्तीजवळ सहा दिवस बसून होते, तेवढ्या वेळांत त्यांस क्षुधा तृष्णा कांहीं लागली नाहीं. सातवे दिवशीं

चतुर्भुज गजाननमूर्ति प्रगट होऊन तिनें त्यांच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेविला; व ' वरं ब्रूहि ' असें म्हटलें. तेव्हां पंत हात जोडून म्हणाले:—

मागणें तें हेंचि ऐका । विद्यान्न द्यावें विनायका ।
ज्ञान आणि निष्कामिका । प्रेमसहित भक्तीतें ॥
यावेगळें मागणें नाहीं । हेचि चतुर्विध पुरुषार्थ पाहीं ।
आवडती मजला याच देहीं । कृपासागरा गुणमूर्ति ॥

ही मागणी ऐकून गजानन फार संतुष्ट झाले व आपली जिव्हा बाहेर काढण्यास त्यांनी पंतांस सांगितलें. पंतांनीं जिव्हां बाहेर काढतांच गजाननानीं तिजवर ओंकार चिन्ह काढलें व म्हटलें:—

आतां जालासि पूर्ण । विद्यान्न दिधलें तुजलागुन ।
भक्ति आणि सत्य ज्ञान । प्राप्त होईल निःसंशयीं ॥
भक्ति आणि ज्ञानासी । शक्ति आहे मजपाशीं ।
उपाय नाहीं प्रारब्धासी । योगायोग पुढें आहे ॥
जाणें आहे वाराणसीतें । षण्मास करीं अनुष्ठानातें ।
व्यासप्रसाद होईल तूतें । गायत्रीमंत्र गंगोदकीं ॥
हा योग पूर्वजन्मींचा । निश्चय ठेवीं मद्वचनाचा ।
वर लाधेल बरवा साचा । भक्तिज्ञानी होसील तूं ॥
जेव्हां संकट पडेल तुजसी । स्मरण करावें माझें मानसीं ।
त्वरित भेट देईन तुजसी । जावें आतां स्वगृहा ॥

इतकें बोलून गजानन अंतर्धान पावले. नंतर ज्योतिपंतानीं घरीं येऊन इत्थंभूत वर्तमान आपल्या आईबापांस सांगितलें. तें ऐकून त्यांच्या आईनें त्यांस सांगितलें कीं, तुझा मामा महिपती पुण्यास असतो, त्यास जाऊन भेट म्हणजे तुझा पुढील कार्यक्रम सुलभ होईल. पंतांस गजाननदर्शन झाल्याचें वर्तमान गांवांतील लोकांस कळतांच ते पंतांचे घरीं येऊन " तुह्मी आपल्या जन्माचें सार्थक केलें." अशा

शद्बांनीं त्यांचें गौरव करूं लागले. परंतु जीं मुलें पंतांबरोबर गांवाबाहेर गेलीं होतीं त्यांना मात्र ही गोष्ट ऐकून वाईट वाटलें. जर आपण निर्धारानें गणपतीपाशींच बसून राहिलों असतों तर आपणासही त्याचें दर्शन झालें असतें असें ह्मणून तीं पश्चात्ताप करूं लागलीं.

पुढें लवकरच ज्योतिपंत पुणें येथें आपला मामा महिपति याजकडे गेले. महिपती मोठा पैसेवाला होता. ज्योतिपंताचें व आपलें काय नातें आहे हेंच पहिल्यानें त्याच्या लक्ष्यांत येईना. पुढें पंतांनीं सविस्तर हकीकत सांगितल्यावर मामास त्यांची ओळख पटली; व दारिद्र्यांत दिवस कंठीत असलेल्या आपल्या बहिणीच्या मंडळीस घरीं आणून ठेवावें असा विचार त्याच्या मनांत येऊन त्यानें आपल्या पुत्रास बोलावलें; परंतु पुत्र द्रव्यमदानें उन्मत्त झाला असल्यामुळें "हे कोठले कोण, यांच्याशीं आपणास काय करावयाचें आहे ?" असें उडवाउडवींचें उत्तर देऊन त्यानें त्या विषयाकडे दुर्लक्ष केलें, व तो प्रश्न तसाच राहिला. पुढें एके दिवशीं जेवणाचे वेळीं मामाची गांठ पडतांच पंतांनीं त्यांस विनविलें कीं, मला कांहीं तरी काम सांगा. तें ऐकून सगळी मंडळी हंसूं लागली. हा बेअकली निरक्षर मनुष्य कसले काम करणार ? असें ह्मणून पंतांचा त्यांनीं उपहास केला. महिपतीने पंतांस विचारलें "तुला कांहीं लिहिणें वाचणें येतें का ?" पंत ह्मणाले "श्रीगणपतीच्या प्रसादानें मला थोडीशी विद्या प्राप्त झाली आहे." तें ऐकून महिपतीनें पेशव्यांच्या लकडखान्यांत दरमहा चार रुपये पगारावर पंतांची नेमणूक केली. कांहीं दिवस गेल्यावर, दप्तरखान्यांतील बरेच हिशोब चुकलेले आहेत, असें श्रीमंतांस आढळून आलें. मग त्यांनीं सगळ्या कारकून मंडळीस कचेरींत बोलावून

बसावया एकांत स्थान । मशी कागद लेखणी जाण ।
दीप ठेवावा भरोन । स्नेहादिकीं भरोनियां ॥
आणि द्यावें उपाहारासी । ताट भरोनि विस्तारेसी ।
शय्या असावी उत्तम ऐसी । लोडतक्या वोडगण ॥
उदक भरोनि द्यावी झारी । या बोलाचा अव्हेर कराल जरी ।
स्वस्थ बसाल आपुले घरीं । हानि थोर होईल जाणा ॥

भाच्याची ही मागणी मामानें लागलीच पुरी करून दिली. तेव्हां जवळचे सर्व लोक मामाची थट्टा करूं लागले. "याच्या नादीं लागून तुह्मी आपलें नुकसान मात्र करून घ्याल. हा वीस वर्षांचा पोर; आमच्यासारख्या जाणत्या माणसांस जी गोष्ट करतां येईना ती हा काय करणार? अजून तरी विचार करा आणि दुसरा एखादा हुशार कारकून शोधून काढून त्याकडे हें काम सोंपवा. नाहीं तर मागाहून पश्चात्ताप करण्याचा प्रसंग येईल," इत्यादि बोलून पंतांविषयीं महिपतीचें मन कलुषित करण्याचा त्यांनीं प्रयत्न केला, परंतु महिपतीनें तिकडे लक्ष्य दिलें नाहीं. "गणपतीच्या कृपेनें काय होईल तें पाहूं." असें ह्मणून, पंतांवर विश्वास ठेवून तो स्वस्थ बसला.

इकडे ज्योतिपंतांनीं एकांतीं जाऊन गजाननाची प्रार्थना केली व गजानन प्रगट होऊन त्यानें सर्व दप्तरें तपासून हिशोबाच्या नवीन वह्या लिहून तयार केल्या. इकडे मंडळी महिपतीस म्हणाली, "तुमचा भाचा आज तीन दिवस खोलीचें दार बंद करून आंत बसला आहे. तरी त्याची काय अवस्था आहे, याची कांहीं वास्तपुस्त करावयास नको काय? कांहीं कमीजास्त झालें तर फुकट ब्रम्हहत्या तुमच्या माथीं बसेल याचा विचार करा." ही बाहेर चाललेली मंडळीची भाषा ऐकून "माझें कार्य पुरें झालें, दार उघडा," असें आंतून पंतांनीं त्यांस सांगितलें, तेव्हां:—

द्वार उघडलें त्यांणीं त्वरित । दप्तरें आणिलीं सभेंत ।
येवोनी सर्व लोक पाहत । आश्चर्य करिती जन सर्व ॥
ह्मणती हें कैसें विपरीत जालें । लेखन हें यानें कैसें केलें ।
मातुलातें वर्तमान कळलें । त्वरित आले धावोनियां ॥
येवोनी लेखन अवलोकिती । दृष्टि न फिरे मागुती ।
श्रीकृष्णकंठीं वैजयंती । ओविलीं अक्षरें रेषासूत्रें ॥

हा आश्चर्यकारक देखावा पाहून महिपतीनें पंतांस विचारिलें, "अरे, हें कोणी लिहिलें, खरें सांग." तेव्हां पंतांनीं सांगितलें "गजवदन--करणी सत्य होय." हें ऐकून सर्व मंडळी आश्चर्य-चकित झाली. लोक आपसांत बोलूं लागले कीं हें कांहीं मानवी लेखन नव्हे. यानें कांहीं तरी साधन केलें असलें पाहिजे." यांवर एक गृहस्थ म्हणाला "अहो कुठला गजानन आला आहे? ही कांहीं तरी जारणमारण विद्या असली पाहिजे." अशा प्रकारें जो तो त्या प्रकाराची आपापल्या परी उपपत्ति लावण्याचा प्रयत्न करीत आहे, तों इकडे महिपतीनें एक पालखी आणवून, तींत तीं दफ्तरें ठेविलीं व वाद्यघोषांत सर्व मंडळी राजसभेस निघाली:—

वाद्यांचा दणदणाट भारी । करीत गेले सभेभीतरी ।
श्रीमंत आले बाहेरी । सभेमाझारी तेधवां ॥
मामा करिती साष्टांग नमन । उभे राहिले कर जोडून ।
दप्तरें टेविलीं आपण । पुढें तेव्हां तात्काळीं ॥
लेखन श्रीमंत अवलोकितां । आश्चर्य वाटतसे चित्ता ।
नाहीं आमुच्या राष्ट्रीं लिहिता । कवणें केलें कार्य हें ? ॥

श्रीमंत महिपतीस म्हणाले, "तुम्हाला मीं तीन दिवसांची मुदत दिली होती; पण खरें पुसाल तर हें काम एका महिन्यांत देखील पुरें होण्यासारखें नव्हतें; व हें काम करण्यास समर्थ असा लेखकही

क्वचित् मिळाला असता." तेव्हां महिपतीनें श्रीमंतांस सांगितलें, "हें लेखन माझ्या मुलानें केलें!" गांव इनाम मिळविण्यासाठीं महिपतीनें हें धडधडीत खोटें सांगितलें. श्रीमंत ह्मणाले "तुमच्या मुलास इकडे बोलवा." इतक्यांत महिपतीस आपल्या असत्य विधानाबद्दल लाज वाटून, त्यानें आपल्या मंडळीस सांगितलें कीं, "ज्योतीस चांगला नटवून सजवून पालखींत घालून घेऊन या." त्याप्रमाणें मंडळी पंतांस आणावयास घरीं गेली व बहुमोल वस्त्रें आणून तीं परिधान करण्याविषयीं त्यांनीं ज्योतिपंतांस सांगितलें. परंतु पंतांनीं त्या वस्त्रांचा स्वीकार केला नाहीं. आपल्या साध्या वस्त्रांनिशीं ते पालखीबरोबर पायींच निघाले. ते राजसभेंत प्रविष्ट होतांच त्यांची तेजस्विता पाहून सर्व सभाजन तटस्थ झाले. पंतानीं श्रीमंतांस नमस्कार केला व ते दूर उभे राहिले. श्रीमंतांनीं त्यांस जवळ बोलावून आपला सविस्तर वृत्तांत सांगण्याची आज्ञा केली. तेव्हां पंतांनीं सांगितलें:—

महिपतराव आमचे मामा। ज्येष्ठ भगिनीसुत ज्योतिनामा।
चिरंजीवासम आलों कामा। आश्रय करोनि राहिलों॥
मामानें सांगितले कामीं। नित्य करीत आहें नेमीं।
चार मुद्रिका रौप्य घेउनि समाधान मी। स्वस्थचित्तें राहिलों॥
ऐकोनि स्वयंज्योतिची वाणी। श्रीमंत विचारिती तयालागुनी।
" कागदीं अक्षर लिहिलें कोणी। ऐसें कधीं न देखिलें॥
सत्य सांगावा वृत्तांत। मिथ्या न बोलावें यथार्थ।
सांगा खरी काय मात। नवल वाटतें आम्हासी॥ ".

तेव्हां ज्योतिपंतांनीं नम्रपणें सांगितलें कीं "हें लेखन श्रीगजाननाच्या हातचें आहे; माझ्या हातचें नव्हे." श्रीमंतानीं तत्काळ पुरं-

दर किल्ल्याची फडणिशी ज्योतिपंतांस दिली व स्वहस्तानें वस्त्रें व शिक्का देऊन, त्यांची रवानगी केली. श्रीमंतांची आज्ञा घेऊन पंत महीपतीसह घरीं आले. त्या दिवशीं महीपतीच्या घरीं पंतांचा जो मानसन्मान झाला त्याचा थाट काय वर्णावा ?

" ते दिनीं भोजनाचा काय वर्णूं थाट । मातुलासन्निध विस्तीर्ण पाट ।
मांडिले सुवर्णाचे वाटयाताट ; अन्न वाढिलें षड्रस ॥ "

भोजन झाल्यावर पंत पुण्याहून पुरंदरास गेले, व तेथें कांहीं दिवस घालविल्यावर त्यांनीं आपल्या आईबापांस किल्ल्यावर आणविलें. त्यांच्या सेवेंत पंत नेहमी दक्ष असत. कांहीं दिवसांनीं पंतांचे वडील पंचत्व पावले.

पुढें उत्तर हिंदुस्थानांत गिलच्यांची स्वारी झाली, त्या वेळीं गोविंदपंत बुंदेले व राघोराम पागे यांसहवर्तमान पंत लढाईवर गेले. तेथें एके दिवशीं रात्रीं ज्योतिपंतांस स्वप्नांत असा दृष्टांत झाला कीं, येथें क्षणभर देखील राहूं नये. दुसरे दिवशीं सकाळीं पंतांनीं श्रीमंतांस पत्र लिहिलें कीं, " आजपासून शस्त्र आणि लेखणी यांचा मी न्यास केला आहे." नंतर एका ब्राह्मणास बरोबर घेऊन व जवळच्या सर्व द्रव्याची खैरात करून ते काशी क्षेत्रीं गेले. तेथें त्यानीं सहा महिने वास्तव्य केलें. मनकर्णिका तीर्थांत कंबरभर पाण्यांत उभें राहून बारा वाजेपर्यंत गायत्री मंत्राचा जप करावा व नंतर मधुकरी मागून व तिचा देवास नैवेद्य दाखवून ती भक्षण करावी असा त्यांचा नित्यक्रम असे. अशा रीतीनें सहा महिने अनुष्ठान केल्यावर एके दिवशीं श्रीवेदव्यासांनीं गंगातीरीं म्लेच्छरूपानें त्यांस दर्शन दिलें. पंतांचा चरि-

त्रकार लिहितो, एके दिवशीं पंत मनकर्णिकेंत उभे असतां व्यास तेथें म्लेच्छरूपानें प्रगट झाले आणि त्यांनीं पंतांच्या अंगावर पाणी उडविलें. तेव्हां पंतानीं पुनः स्नान केलें. परंतु व्यासानीं पुनः त्यांच्या अंगावर पाणी उडविलें तेव्हां मात्र त्यांस राग आला.

" द्वितीय वेळीं उदकसिंचन। तंव रागें फिरविले नयन।
बोलते जाले म्लेच्छालागुन। हिंदुपद आहे अद्यापि॥
तूं समजलासी काय मनीं। शिक्षा करवीन तुजलागुनी।
ब्राह्मणाचा छल करुनी। कोण तरला दावीं बा ?॥

पंतांचा हा पुण्यप्रकोप पाहून व्यासानीं हास्य केलें व प्रत्यक्ष व्यासरूपानें दर्शन देऊन पंतांस सांगितलें, " आतां अनुष्ठान पुरें करून व्यासमंडपीं जाऊन निद्रा करा. तेथें रात्रौ मी तुह्मास श्रीमद्भागवत आणून देईन. त्याचें वाचन करितांच तुह्मास ज्ञानप्राप्ति होईल." इतकें सांगून व द्वादशाक्षरी मंत्राचा उपदेश करून व्यासमूर्ति अंतर्धान पावली.

आपल्या अभिवचनाप्रमाणें व्यासानीं रात्रौ, श्रीमद्भागवताचे बारा घरचे बारा स्कंध आणून ते ज्योतिबुवांच्या उशाजवळ ठेविले. सकाळीं उठतांच तो ग्रंथ बुवांच्या दृष्टीस पडला तेव्हां त्यानीं त्याजपुढें साष्टांग नमस्कार घातला. मग मनकर्णिकेवर स्नान करून ज्ञानमंडपांत त्यांनीं ग्रंथाचें पारायण सुरू केलें. सूर्योदयापासून सूर्यास्तापर्यंत अठरा हजार ग्रंथसंहिता त्यांनीं पूर्ण केली. याप्रमाणें त्यांचा नित्यक्रम सुरू असतां, त्यांचें हें वाढतें तपोबल व तज्जन्य तेजस्विता पाहून काशीच्या ब्रह्मंडळास मोठी पराजयभीति उत्पन्न झाली; व त्यांनीं श्रीविश्वेश्वराकडे गाऱ्हाणें केलें कीः—

तुझिया नगरींचें यश । कोणी न मिळविलें सायास ।
कलंक लागेल विद्यापीठास । दुर्यश होईल तुझें कीं ॥

हें ऐकतांच विश्वेश्वर वृद्ध ब्राह्मणरूपानें ज्ञानमंडपांत गेले व तेथें ज्योतिपंतांचें भागवतपारायण श्रवण करीत तटस्थ उभे राहिले. तेव्हां पंतांची जिव्हा स्खलन पावूं लागली, स्पष्ट शब्दोच्चार होईना. ही त्यांची स्थिति पाहून विश्वेश्वर विनोदानें ह्मणाले " तुह्मी रोज असेंच का वाचतां ?" हा दुसरा तिसरा कोणी नसून श्रीविश्वेश्वरच आहे, हें पंतानीं तात्काल जाणलें व उठून भगवंतांच्या चरणीं मस्तक ठेविलें. तेव्हां भगवंत त्यांस ह्मणाले,

आतां पुरे अनुष्ठान । कार्य जालें तुझें संपूर्ण ।
प्राप्त जालें भक्तिज्ञान । आणखी साधन नको आतां ॥

* * *

ऐसें दुजें नाहीं साधन । सर्व पुरुषार्थां कारण ।
लावीं भजनमार्गीं जन । स्वरूपप्राप्ति येणेंची ॥

इतकें सांगून भगवान् शंकर गुप्त झाले. ज्योतिपंतांस विश्वेश्वर-दर्शन झालें हे ऐकतांच, जे ब्राह्मण पंतांचा पूर्वी द्वेष करीत असत, ते

" बोलूं लागले विचक्षण । हा साक्षात् अवतारी ॥

मग भगवदाज्ञेप्रमाणें पंतानीं भागवताची पोथी बांधून ठेविली. तेव्हां नगरांतले सहस्त्रावधि लोक तेथें जमून पंतांचा जयजयकार करूं लागले. त्यांनीं भागवताची पोथी पालखींत ठेवली व तिची मोठ्या थाटानें मिरवणूक काढिली. ब्राह्मणांनीं ज्योतिपंतांस " महा-भागवत " ही पदवी दिली. पंतांच्या आश्रमांत नित्य भजनपूजन, नामसंकीर्तन, ब्राह्मणभोजन यांचा थाट होऊं लागला. काशीनजीक

रामनगर येथें पंतांनीं श्रीशुक आणि व्यासगुरु यांच्या मूर्तींची स्थापना केली. हें स्थल वाराणशीच्या दक्षिणेस असून त्यास व्यासकाशी असें म्हणतात. पूर्वी मोगल बादशहांच्या कारकीर्दींत हिंदु लोकांच्या देव-मूर्ति फोडण्याचा जेव्हां सपाटा सुरू झाला, तेव्हां वाराणशीचा त्याग करून व्यास, शुकादि देव रामनगरांत जाऊन गुप्त रूपानें राहिले होते. ज्योतिपंतांनीं त्यांच्या मूर्तीची पुनः स्थापना केली तेव्हां रात्रौ पंतांस त्यांनीं प्रत्यक्ष दर्शन दिलें, अशी कथा त्यांच्या चरित्रांत लिहिली आहे. ज्योतिपंत महाभागवतांची कीर्ति ऐकून काशीच्या राजानें त्यांस सन्मानपूर्वक पाचारण करून मोठ्या थाटमाटानें, वाद्यांच्या गजरांत, आपल्या राजवाड्यांत आणलें. स्वारीबरोबर बाळंभट शास्त्री, नारायण दीक्षित, केशवभट, रामाचार्य पुराणिक, वगैरे ब्रह्ममंडळ होतें. राजानें पंतांचा मोठा बहुमान करून त्यांचा चांगला परामर्ष घेतला. इतकें झाल्यावर पंत दक्षिणेंत आपल्या मातृभूमीस येण्यास निघाले. वाटेंत त्यांचा शिष्यवर्ग वाढत चालला. कांहीं दिवसांनीं ज्योतिबुवा महाभागवत पंढरपुरीं आले. तेथें चंद्रभागेचे कांठीं पंढरिनाथानें बुवांस विप्रवेषानें दर्शन दिलें व सांगितलें कीं, “मला नास्तिक लोक जैनाचा देव म्हणतात, तरी ठिकठिकाणीं माझीं देवालयें बांधून भागवत धर्माचा विस्तार करा.” नंतर बुवांनीं पंढरपुरीं शास्त्रीपंडितांची सभा बोलाविली. तींत कांहीं पंडितांनीं असा आक्षेप घेतला कीं, “वेदशास्त्रांत विठ्ठल या नांवाचा देव आढळत नाहीं.” तेव्हां बुवा म्हणाले:—

“अश्विनोपासोनि चवथे भगणीं । जन्म श्रीहरीचें तृतीय चरणीं ।
बोवाविवेति रोहिणीं । नाम ठरलें ज्योतिषमतें ॥

दुजा शास्त्राचा विचार । वेदानुसार बोलती साचार ।
व्याकरणशास्त्र धुरंधर । वेदांत शास्त्र तैसेंची ॥
विद धातु ज्ञानाविषयीं । ठ धातु शून्यमयी ।
लकार असे ग्रहणाठायीं । भाविकातें ग्रहण करी जो ॥ "

ज्योतिबुवांनीं सांगितलेली विठ्ठल नामाची ही उपपत्ति ऐकतांच सर्व वैष्णवांनीं विठ्ठलनामाचा मोठा गजर केला. पंढरींत चार महिने राहिल्यावर, पांडुरंगाचा निरोप घेऊन ज्योतिबुवा आपल्या शिष्यसमुदायासह प्रवासास निघाले. पहिल्यानें नीरा निरासिंगपूर येथें मुक्काम करून, नंतर स्वारी फलटणास आली. तेथें सगुणाबाई निंबाळकर यांच्या आग्रहावरून बुवा तेथें एक मास राहिले. नंतर स्वारी पुण्याकडे निघाली. पुण्याजवळ जातांच नानाफडणविसादि मुत्सद्दी मंडळीसह श्रीमंत बुवांस सामोरे गेले. राजवाड्यांत गेल्यावर, शिष्यवृंदानें, वाराणशींत घडलेला समग्र वृत्तांत सर्व मंडळीस सांगितला; व पंढरपुरीं बुवांनीं " मी पंधराशें विठ्ठलमूर्ति स्थापन करीन " अशी प्रतिज्ञा केली असल्याचेंही श्रीमंतांस कळविलें. पुढें,

श्रीमंतानीं जोडोनि पाणी । आतां वास्तव्य व्हावें स्वस्थपणीं ।
कोठें न जावें येथोनी । कृपा असावी राष्ट्रावरी ॥
हें राज्य अवघें आपुलें । आम्हीं तों सर्व आपुलीं मुलें ।
आज्ञेप्रमाणें वर्तूं भलें । संशय न धरावा मानसीं ॥

अशी विनंति केली तेव्हां, श्रीविठ्ठलाचीं १५०० देवळें बांधण्याचा माझा संकल्प मला शेवटास न्यावयाचा आहे, असें बुवांनीं श्रीमंतांस सांगितलें. श्रीमंत ह्मणाले "या आपल्या संकल्पित कार्यास आपण येथेंच प्रारंभ करावा. आपण देवळाचें काम सुरू करून अन्य स्थलीं जावें व देवालय पुरें झाल्यावर, परत येऊन मूर्तीची

स्थापना करावी." हा विचार बुवांस पसंत पडून, पुणें येथें लकडी-पुलाजवळ देवालयाच्या कामास त्यांनीं सुरुवात केली. नंतर ते साताऱ्यास गेले व तेथें त्यांनीं विठ्ठलमंदिर उभारलें. इकडे श्रीमंतांनीं ठिकठिकाणच्या सुभ्यांस, गांवोगांवीं देवळें बांधण्याचा हुकूम सोडला. त्याप्रमाणें देवळें बांधून तयार होतांच, त्या त्या ठिकाणीं जाऊन बुवांनीं मूर्तींची स्थापना स्वहस्तें केली. ह्या प्रवासांत त्यांनीं भागवताच्या अठरा सहस्र संहितेवर अठरा सहस्र अभंगांची समश्लोकी टीका केली. हे अभंग लिहून काढण्याचें काम खंडोपंत नामक गृहस्थानीं केलें. शिवाय श्रीमद्भागवतावर बुवांनीं दुसरी ओवीबद्ध टीका लिहिली. परंतु तिचा बराच भाग ठिकठिकाणीं शिष्यांकडे राहिला; बुवांच्या मठांत सदर ग्रंथाचे फक्त दोनच अध्याय शिल्लक आहेत. असो. एकदां ज्योतिबुवा वाई येथें असतां, त्यांचें कीर्तन सुरू होतें व ते परब्रह्मस्वरूपाचें वर्णन करीत होते. इतक्यांत हरि-पंडित या नांवाचा एक गर्विष्ठ पंडित कीर्तनास येऊन बसला. त्यानें

"प्रश्न केला तये वेळे। वस्तु कैसें पिवळें निळें काळें।
आम्हा दाखवा याच वेळे। पाहूं आम्ही कैसें ब्रह्म॥
सवें आणिले शिष्यमांदी। सर्व जन लाविले नादीं।
वृथा कासया जमविली उपाधी। दावावया सर्व जना॥"

पंडितानें बुवांचा केलेला हा उपहास ऐकून सर्व श्रोते आश्चर्य-चकित झाले. हरिनामाचा गजर चालू होता. इतक्यांत ज्योति-बुवांनीं पंडिताजवळ जाऊन त्याच्या मस्तकावर आपला हात ठेविला. तेव्हां तत्क्षणीं त्यास समाधि लागली! या समाधि-स्थितींत तो तीन दिवस होता. तो प्रकार पाहून कांहीं लोक

असें बोलूं लागले कीं, बुवानें कांहीं तरी जादू करून या ब्राह्मणाचा जीव घेतला ! तिकडे त्या पंडिताचीं बायकोमुलेंही खेद करूं लागलीं. लोकवार्ता कानीं पडतांच बुवांनीं पंडिताची समाधि उतरली व तो जागृत होतांच त्यास प्रश्न केला कीं " तुमचें पांडित्य आतां कोठें गेलें ? गेल्या तीन दिवसांत कोणकोणत्या गोष्टी तुम्ही पाहिल्या ? " पंडितानें बुवांच्या चरणीं मस्तक ठेवून सांगितलें कीं " मी अत्यानंदांत होतों. मला आपण कां जागृत केलें ? " तेव्हां ज्योतिबुवा त्यास म्हणाले, " समाधिसुखाची थोडीशी गोडी आम्ही तुम्हांस दाखविली. आतां तुम्ही योग्याभ्यास चालू ठेवा म्हणजे या सुखाचा पूर्ण अनुभव तुम्हास घेतां येईल." इतकें सांगून बुवांनीं पंडितास घरीं पाठविलें. वाई येथें सोनेश्वर नामक देव आहे, त्याच्या सन्निध बुवांनीं श्रीविठ्ठलाचें मंदिर बांधिलें व मूर्तिस्थापना केली. पुढें कृष्णावेणीसंगमीं माहुलीस प्रतिनिधींनी स्थापलेला विश्वेश्वर देव आहे, त्याच्या देवळाजवळ बुवांनीं विठ्ठलमंदिर बांधविलें. यानंतर चरेगांव, पाटण, मसूर, उंब्रज, कऱ्हाड वगैरे अनेक ठिकाणीं बुवांनीं देवालयें बांधविलीं. हीं ज्योतिबुवांनीं बांधलेलीं देवळें ओळखण्याची मुख्य खूण म्हटली म्हणजे प्रत्येक देवळापुढें असलेला अश्वत्थ वृक्ष होय.

पुढें ज्योतिबुवा कोल्हापूर येथें गेले असतां, एके दिवशीं त्यांनीं आपल्या कांहीं शिष्यांस जवळ बोलावून सांगितलें कीं तुम्हीं वेंगुर्लें बंदरास जाऊन समुद्रास आमचा निरोप कळवा कीं, ज्योतिबुवानें तुजपाशीं पांच हजार रुपये मागितले आहेत. त्यावर शिष्य म्हणाले " महाराज, समुद्राबरोबर आम्हांस भाषण कसें करितां येईल ?

" समुद्र आहे खारें पाणी। तेथें काय करावें आम्ही जाउनी ।
द्रव्य कैचें देईल आम्हालागुनी। कैसें घडे स्वामिया ॥
लोक करितील विटंबना । म्हणतील काय हा शहाणपणा ।
जळीं काष्ठीं पाषाणा । द्रव्य कैचें मिळेल तुम्हासी ॥"

तेव्हां ज्योतिबुवा शिष्यांस म्हणाले " तुम्हीं सगळे आपणास शहाणे म्हणवितां आणि या नारायणास ' वेडा नारायण ' म्हणून त्याची थट्टा करितां. तरी मी आतां त्यालाच ह्या कामगिरीवर पाठवितों. " वेडा नारायण या नांवाचा बुवांचा एक शिष्य होता, तो मोठा गुरुभक्त असून, बुवांचाही त्याजवर पूर्ण कृपा असे. त्याजपाशीं बुवांनीं समुद्रास पत्र लिहून दिलें. तें पत्र घेऊन वेडा नारायण वेंगुर्लें येथें जाऊन व पत्र समुद्रांत टाकून रुपयांची वाट पहात बसला. त्यानें समुद्रास सांगितलें कीं " पांच हजार रुपये लवकर आणून दे, नाहीं तर तुला ब्रह्महत्येचें पातक लागेल. " अन्नपाण्याला स्पर्श न करितां वेडा नारायण तेथें तीन दिवस बसून राहिला. तिसरे दिवशीं सायंकाळीं समुद्र बटुवेषानें त्याजपाशीं आला व ह्मणाला " तुह्मी सावंतवाडीस जा. तेथें तुह्मास मुद्रिका मिळतील अशी व्यवस्था मी करितों; व त्याप्रमाणें तेथें तुह्मास रुपये मिळाले नाहींत तर परत मजकडे या, ह्मणजे मी तुह्मास दुप्पट रुपये देईन." परंतु त्याच्या बोलण्याकडे दुर्लक्ष करून वेडा नारायण तेथेंच बसला व " येथल्या येथें रुपये मिळाले पाहिजेत" असें त्यानें समुद्रास निक्षून सांगितलें. तेव्हां समुद्र मोठ्या संकटांत पडला. त्यानें सावंतवाडी येथील एका सावकाराच्या स्वप्नांत जाऊन त्यास कळविलें कीं " तुझा मुलगा नाहींसा झाला आहे. तो तुला परत आणून देतों. तरी तुजपाशीं जो ब्राह्मण येईल त्याला पांच हजार रुपये दे. "

असा दृष्टान्त होतांच, इतका तेजस्वी ब्राह्मण कोण आहे हें समक्ष जाऊन पहावें, या हेतूनें तो सावकार वेंगुर्ल्यास गेला. तेथें समुद्रकांठीं बसलेल्या वेड्या नारायणास पाहून त्याच्या विषयीं त्याचा चांगला ग्रह झाला नाहीं. मग त्यानें वेड्या नारायणाकडून एकंदर हकीगत विचारून घेतली व तुम्ही सावंतवाडीस मजबरोबर या, तेथें तुम्हांस पैसे देतों असें त्यास सांगितलें. नंतर ते दोघे सावंतवाडीस गेले. तेथें सावकारानें पांच हजार रुपयांची हुंडी लिहून त्याच्या स्वाधीन केली. परंतु वेड्या नारायणानें असा हट्ट धरला कीं " हा कागद कांहीं कामाचा नाहीं. रोख रुपये पाहिजेत. " मग सावकारानें ती हुंडी ज्योतिबुवांकडे रवाना करून त्यांचें उत्तर आणवून वेड्या नारायणास दाखविलें तेव्हां त्याची समजूत पडली. मग सावकाराकडून आठ दिवसांची पोटगी घेऊन तो कोल्हापुरीं बुवांकडे जाण्यास निघाला. तेथें गेल्यावर त्याच्या कर्तबगारीची तारीफ करून, बुवांनीं आपल्या इतर शिष्यांस म्हटलें " तुम्ही याला वेडा नारायण म्हणतां, पण जें कार्य तुमच्या हातून झालें नाहीं तें यानें कसें करून दाखविलें पहा ! " हें ऐकून ते शिष्य लज्जित झाले. समुद्राकडून आणविलेल्या द्रव्यानें बुवांनीं करवीर क्षेत्रीं पद्माळें या नांवाचा मोठा तलाव व त्याच्या कांठीं पांडुरंगाचें मोठें देऊळ बांधाविलें. हल्लीं कोल्हापूर येथें पद्माळ्याच्या कांठीं जें विठ्ठलमंदिर आहे व ज्याच्या सभामंडपाच्या एका तुळईत तोफेचा लोखंडी गोळा शिरलेला दिसतो तें हेंच मंदिर होय. पुढें करवीर प्रांतीं निरनिराळ्या गांवीं बुवांनीं अनेक देवालयें बांधविलीं. नंतर निपाणीवरून पटवर्धन घराण्याच्या जहागिरींत त्यांनीं प्रवास केला.

ज्योतिबुवांचा, पुष्कळ दिवसांपासून, सांवतवाडीकडे जाण्याचा विचार होता. सांगली मिरज वगैरे प्रांतीं देवालयें बांधण्याचें काम पुरें होतांच ते बेळगांवास गेले व तेथें देवालय बांधून, सांवतवाडीस गेले. तेथें भटवाडींत त्यांनीं विठ्ठलमंदिर बांधून, पूजेअर्चेचें काम आपल्या एका कऱ्हाडा ब्राह्मण शिष्याकडे सोंपविलें. पुढें रत्नागिरी, उरण वगैरे ठिकाणीं देवळें बांधून बुवा मुंबईस गेले. तेथें विठ्ठलवाडींत विठ्ठलमंदिर उभारलें. नंतर ठाणें, वसई, कल्याण, वगैरे गांवीं देवळें बांधलीं. पुढें, देशावर, तळेगांवचे दाभाडे बुवांचे स्नेही होते, त्यांच्या भेटीस बुवा तळेगांवीं गेले. बुवांच्या आगमनाची वार्ता ऐकतांच दाभाड्यानीं त्यांस मोठ्या थाटमाटानें आपल्या वाड्यांत नेलें. या प्रसंगाचें वर्णन वाचण्यासारखें आहे:—

ऐकतां गडबडीनें उठिला । सर्वां सांगे दर्शनासी चला ।
ज्योतिपंत साधु होऊन आला । पूर्वीं होता आम्हासवें ॥
कामदार लई झोकनोकी । चौमुलखीं डंका वाजला कीं ।
लिवणार लई अलौकिकी । पेशवाईत नाहीं दुजा ऐसा ॥
आतां जाला देवभगत । सोडिलें काम नोकरी नाहीं करित ।
देवळें बांधीत हिंडत । व्यसन लागलें देवाचें ॥
ऐसे बोलत बोलत निघाले । सामोरे येवोनि भेटले ।
स्मरण असे तुह्मा पहिलें । एकमेकां विचारिती ।
तुह्मी जागीरदार खुशालचेंडू । आम्ही तंव लागलों देश हिंडूं ॥
आतां उभयतां कशाकरितां भांडूं । पहिल्या गोष्टी राव असूं द्या ॥

अशा प्रकारें विनोद करण्यांत व आनंदांत बुवांनीं दाभाड्यांकडे चार दिवस मुक्काम केला. दाभाडे फार विनोदी व प्रेमळ होते.

बुवांच्या चरणीं नमन करितांना त्यांच्या तोंडाकडे पाहून हांसत हांसत ते ह्मणाले:—

नोकरी बि लई दिवस नाहीं केली ।
श्रीमंतानीं झागीर बि नाहीं दिली ।
पैक्याचीं कुट पेवं होतीं भरलीं ।
त्याचा हिशेब आम्हा न कळे बा ॥

असो. दाभाडयांचा निरोप घेऊन ज्योतीबुवा पुण्यास आले. तेथें श्रीमंतांनीं त्यांस सांगितलें कीं "आज्ञेप्रमाणें विठ्ठलमंदिर बांधून तयार आहे. आतां आपण प्रतिमा स्थापन कराव्या." मग मोठ्या समारंभानें मूर्ति स्थापन करण्यांत आल्या. कांहीं दिवस पुण्यांत राहून बुवांनीं मूर्तिस्थापनार्थ उत्तरेकडे जाण्याचा आपला विचार श्रीमंतांस कळविला. तेव्हां श्रीमंतानीं आपल्या वाडयांत बुवांस नेऊन मोठा भोजनसमारंभ केला. रात्रौ बुवांचें कीर्तन झालें. त्या वेळीं एक चमत्कार घडला तो असा:—चारदोन घटका कीर्तन केल्यावर बुवांनीं एकदम नेत्र मिटले व आपले हात चोळले. तेव्हां नाना फडणाविसांनीं असें करण्याचें कारण बुवांस विचारलें. बुवा ह्मणाले, आमच्या सांगण्यावर कोणी विश्वास ठेवणार नाहीं. परंतु मंडळींचा फारच आग्रह पडला तेव्हां बुवांनीं सांगितलें कीं, रात्रीं पंढरपुरास विठ्ठलमंदिरांत काय प्रकार घडला याची हकीकत पत्रद्वारें आणवावी. मग श्रीमंतानीं लागलीच पत्र देऊन सांडणीस्वार पंढरपुरास पाठविला. दुसरे दिवशीं बडव्याकडून उत्तर आलें कीं, "गेल्या रात्रीं पांडुरंगाच्या नेसत्या वस्त्रानें अकस्मात् पेट घेतला.तेव्हां वस्त्र चोळून तो अग्नि कोणी तरी विझविला." हें वर्तमान ऐकतांच बुवांच्या साक्षात्कारीपणाबद्दल

सर्व लोकांची खात्री झाली. पुढें बुवा उत्तर देशीं जावयास निघाले. तेव्हां त्यांच्या दर्शनास लोकांची मोठी गर्दी उसळली. पैशाच्या राशी पडल्या. कित्येक लोक तर घरदार सोडून बुवांबरोबर जाण्यास तयार झाले. श्रीमंतही बुवांच्या पालखीबरोबर कांहीं योजनें गेले होते, त्यांस दोन उपदेशाच्या गोष्टी सांगून बुवांनीं परत पुण्यास पाठविलें. पुढें बुवा नासिक, त्र्यंबकावरून खानदेशांत गेले. ठिकठिकाणीं देवळें बांधण्याचा उद्योग सुरूच होता. त्र्यंबकेश्वरीं भगवंतानें त्यांस आशीर्वाद दिला कीं—

> अखंड चालेल तुझी वाणी । पराभव न होय कोणा हातुनी ।
> ऋद्धि सिद्धि राबतील सदनीं । संशय न धरीं मानसीं ॥

पुढें येवलें, बाळापूर, अकोलें वगैरे ठिकाणीं प्रवास करून व देवळें बांधून बुवा नागपुरास गेले. तेथें धोंडभट कटके नामक शिष्यानें आपल्या विद्वत्तेच्या जोरावर आपलें मोठें प्रस्थ वाढाविलें होतें. त्यांचें दोन शास्त्रांचें अध्ययन असून श्रीमद्भागवत त्यांना मुखोद्गत होतें. नागपूरकर भोंसले त्यांचे शिष्य होते व त्यांच्या वाड्यांत त्यांचें नित्य कीर्तन होत असे. धोंडभटांची परीक्षा पाहण्याच्या उद्देशानें, आपल्या आगमनाची बातमी गुप्त ठेवून, ज्योतिबुवा एके दिवशीं भिक्षेस निघाले. पालखींत बसून, मुखानें हरिनामाचा गजर करीत ते दारोदार भिक्षा मागत चालले. बरोबर शिष्यसमुदायही मोठा होता. तें पाहून गांवांतले लोक आपसांत बोलूं लागले कीं "पूर्वी एक धेंड गांवांत येऊन बसलेंच आहे, पण त्याहून हें नवीन धेंड बडें दिसतें" ज्योतिबुवांची स्वारी धोंडभटांच्या घरानजीक येतांच, स्वारीच्या भजनाचा शब्द ऐकून, आपले

गुरुजी आले कीं काय, अशी शंका त्याच्या मनांत उत्पन्न झाली. तो ह्मणाला " गुरुजी स्वदेशीं होते ह्मणून मी इकडे येऊन राहिलों, पण आतां ते इकडे येऊन दाखल झाल्यावर, लोक माझी मानहानि करतील व सद्गुरूंच्या भजनीं लागतील." धोंडभटांचा हा विचार ज्योतिबुवांनीं अंतर्ज्ञानानें जाणला. नंतर ते भिक्षेहून शहराबाहेर आपल्या मुक्कामीं गेले; व भिक्षेच्या द्रव्यानें सुग्रास अन्न तयार करवून गांवांतील ब्राह्मणास भोजन दिलें. याप्रमाणें त्यांच्या मुक्कामाच्या जागीं नित्य समाराधना चालू असे. एक महिना मुक्काम झाल्यावर भोंसल्यांस कळलें कीं गांवाबाहेर कोणी महंत येऊन राहिला आहे. हा महंत नित्य ब्राह्मणभोजन घालतो व ब्राह्मणास वस्त्रालंकार देतो, त्या अर्थी त्यास कांहीं तरी सिद्धि साध्य झालेली असावी, अशीही लोकवार्ता त्यांनीं ऐकली. तेव्हां, आपले गुरु धोंडभट यांस पालखींत बसवून, त्यांच्या समवेत ज्योतिबुवांच्या दर्शनास ते निघाले. हत्ती, घोडे, पायदळ, स्वार, वाद्यें वगैरे थाटांत भोंसल्यांची स्वारी गांवाबाहेर येतांच बुवांचें वसतिस्थान त्यांच्या दृष्टीस पडलें. तेथें हरिनामाची गर्जना चालली होती, ती त्यांनीं ऐकली व गळ्यांत तुळशीच्या माळा घातलेले, बुवांचे शिष्यही त्यांनीं पाहिलें. मग वाहनांतून खालीं उतरून आपल्या गुरुजींसह भोंसले ज्योतिबुवांपाशीं आले. त्यांची तेजस्विता अवलोकन करितांच भोंसले चकित होऊन धोंडभटांकडे पाहूं लागले, तों त्यांची चर्या लज्जेनें काळीठिक्कर पडली आहे असें त्यांस दिसलें. धोंडभटांनीं एकदम पुढें होऊन ज्योतिबुवांचे पाय धरले व " स्वामी, आपण केव्हां आलां ?" असें त्यांस विचारलें. बुवानीं सांगितलें, आम्ही गांवांत असल्यामुळें

आपली प्रतिष्ठा कमी होईल, अशा प्रकारचे विचार तुमच्या मनांत घोळत होते, त्यावेळीं आम्हो भिक्षेसाठीं गांवांत फिरत होतों. " हें ऐकतांच धोंडभटजींस आपल्या डोक्यावर धोंडा पडल्यासारखें वाटलें. पुढें तेथें नवीनच बांधलेल्या विठ्ठलमंदिरांत मूर्तींची स्थापना करण्याचा प्रश्न निघाला. सदर स्थापना आपल्या हातून व्हावी अशी भटजींची फार इच्छा होती म्हणून बुवांपाशीं त्यांनीं हळूच गोष्ट काढली; व आपल्या हातून प्रतिमा स्थापना होण्यास कांहीं हरकत नाहीं, अशा अर्थाचे शास्त्राधार बुवांस त्यांनीं काढून दाखविले. बुवांनीं स्पष्ट सांगितलें, " तुमची इच्छा आम्हांस पूर्ण करितां येत नाहीं, कारण देवालयें बांधून प्रतिमा स्थापन करण्याचा संकल्प आम्ही सोडून चुकलों आहों. तरी तुम्ही आग्रह धरूं नये. " परंतु धोंडभटजी अगदीं हट्ट घेऊन बसले. पुढें लवकरच देवालयाचें काम पुरें झालें. मुधोजी भोसले यानीं स्वतः येऊन विनंति केली कीं, आज्ञेप्रमाणें देवालय बांधून तयार आहे, व प्रतिमास्थापनेचीही तयारी झाली आहे, तरी स्थापनेचा मुहूर्त मुक्रर करावा. त्याप्रमाणें बुवांनीं दिवस ठरविला व अगोदरच्या दिवशीं प्रतिमा नेऊन पाण्यांत ठेविल्या. दुसरे दिवशीं होमहवनादि सर्व क्रिया झाल्यावर प्रतिमा आणण्यास मंडळी पाठविली. तों प्रतिमा पाण्यांत विरून गेल्या, असें त्यांच्या दृष्टीस पडलें. सर्व लोक आश्चर्यचकित झाले. धोंडभटजींच्या हातून आपल्या मूर्तींची स्थापना व्हावी हें देवास इष्ट वाटत नाहीं, असा निष्कर्ष निघाला. आतां मूर्तींची स्थापना न होतां मुहूर्त निघून जाणार अशीही कित्येकांस भीति पडली. तेव्हां ज्योतिबुवानीं राजे भोंसले यांस सांगितलें कीं तुमच्या जामदारखान्यांत पांढऱ्या संगमरवरी दगडाच्या मूर्ति

आहेत त्या आणवा. आपल्या जामदारखान्यांत मूर्ति आहेत हें भोंसल्यांस तावत्कालपर्यंत ठाऊक नव्हतें. त्यांनीं मूर्ति शोधून आणण्यास ताबडतोब माणसें पाठविलीं. तीं जामदारखान्यांत जाऊन पाहतात तों वस्त्रांत गुंडाळलेल्या मूर्ति एका जागीं त्यांच्या दृष्टीस पडल्या. त्या पालखींत घालून त्यांनीं बुवांपाशीं आणल्या. वाद्यांचा व हरिनामाचा मोठा गजर झाला. चरित्रकार म्हणतोः—

आश्चर्य जालें सर्व जनीं । जामदारखानीं आल्या प्रतिमा कोठोनी ।
ही असे ईश्वराची करणी । भंगला मनोरथ धोंडभटाचा ॥

असो. मुहूर्त संपण्यापूर्वी बुवांनीं यथाविधि मूर्तीची स्थापना केली. सहस्रावधि ब्राम्हणास भोजन घातलें. आंधळ्या पांगळ्यांस गोरगरीबांस यथेच्छ जेवण दिलें. पुढें बुवांनीं भागवताचा सप्ताह केला. द्रव्याच्या राशी पडल्याः—

द्रव्यालागीं नाहीं गणती । तीन याम पूजा होत होती ।
धन उचलितां बहु जाली यातायाती । भरलीं पोतीं धान्यासारखीं ॥
वस्त्रांचे पडले ढिगारे । कवळितां शिष्य थकले सारे ।
वाद्यघोष होतसे मंदिरद्वारीं । शब्द कोणाचा न पडे श्रवणीं ॥
नाना प्रकारच्या अगरबत्त्या । दक्षणा तांबूल मंगल आरत्या ।
बहुविध पुष्पें जाती मालत्या । स्वयंज्योतितें अर्पण करिती ॥
षड्सादि पक्वान्न । कितीएक दिलीं गोदानें ।
संहितेसहित पुस्तक देऊन । जाती आपुले स्वस्थळासी ॥
नववे दिवशीं गोपाळकाला । वर्तमान कळविलें सर्वत्रांला ।
दधि लाजा घेउनी पताकीला । त्वरित यावें हरिभजनीं ॥
स्वयंज्योति करिती कीर्तन । लक्षावधि भोंवतीं निशाण ।
आपण भासती विठ्ठलस्वरूपानें । मोहित जाले जन सर्व ॥

\+ \+ \+ \+

असो ऐसा जाला काला । प्रसाद वांटिती एकमेकांला ।
यातायाती धर्म नाहींसा झाला । प्रसादा झोंबती परस्परें ॥
स्त्रीपुरुषभेद उरला नाहीं । आलिंगिती कोणाही ।
कृष्णमय सर्व देखती पाहीं । न उरे तयां अष्टही भाव ॥
परस्परें घालिती लोटांगण । सद्भावें धरिती हातीं चरण ।
कृष्णरूप जालें मन । हरि सर्वत्र देखती ॥
मग करुनी मंगल आरती । कृष्णनामें ध्वनि गर्जती ।
वृक्षपाषाणादि नाचती । भासूं लागले तेधवां ॥
टाळनादें कोंदलें अंबर । अंगीं लोटिला प्रेमाचा पूर ।
नेत्रीं वाहातसे नीर । निर्लज्ज होउनी नाचती ॥
मुखीं राधाकृष्ण म्हणती । नाहीं उरली देहस्थिती ।
तन्मय जाल्या सकळ वृत्ति । सच्चित्सुखातें पावले ॥
स्वयंज्योतीनीं गाढ गर्जना केली । अविद्या शक्ति चालविली ।
वृत्ति देहीं जागृत केली । मग बैसले सभेसी ॥
राजा येऊनि चरण धरी । म्हणे येथेंचि आली पंढरी ।
या रंगणीं नाचला मुरारी । संशय नाहीं सर्वथा ॥

\+ + + +

कितीएक विरक्त होऊनि गेले । कित्येक भजनमार्गीं लागले ।
किती ज्ञानसंपन्न जाले । अधिकारानुरूप वर्तती ॥

एकंदरींत, ज्योतिबुवांनीं नागपूरच्या लोकांस भक्तिरसामृतांत अगदीं बुडवून टाकलें ! अधिकारी पुरुषाच्या वाणीवर जनता कशी लुब्ध होते आणि अशा अधिकारी पुरुषास आपल्या विलक्षण लोकप्रियतेच्या जोरावर केवढी महत्वाची कामगिरी किती सुलभतेनें करून दाखवितां येते याचें, ज्योतिबुवा महाभागवत, हें एक ढळढळीत उदाहरण होय. असो. नागपूर येथील देवालयांत एका पूजकाची योजना करून बुवा पुढें उज्जनीस गेले. तेथें महाकालेश्वराच्या

मंदिरासमोर त्यांचा मुक्काम होता. भजनपूजन, कथाकीर्तन, ब्राह्मण-भोजन वगैरे प्रकार चालू होते.

एके दिवशी, उज्जनींतील एका जैन गृहस्थाच्या पत्नीस, ज्योतिबुवांचें कीर्तन ऐकण्याची इच्छा उत्पन्न झाली, म्हणून तिनें आपल्या पतीपाशीं कीर्तनास जाण्याची आज्ञा मागितली. तेव्हां तो रागावून बोलला कीं " जैनधर्मीय लोकांनीं हिंदु लोकांच्या कीर्तनास जाऊं नये:—

तेथें लोक येती खोटेनाटे । आपण जाऊं नये तसल्या वाटे ।
ऐसे किती येती बावा फटे । लोकां भुली घालिती ॥
माझे आज्ञेवीण जासी जरी । न घें तुला घराभीतरीं ।
भ्रष्ट करीन संसारीं । मग जावें त्यासमागमें ॥

पतीनें इतका निषेध केला असतांही, तिचें मन परावृत्त झालें नाहीं. तिनें नाना प्रकारीं आपल्या पतीची विनवणी केली, परंतु त्यानें कठोर शब्द बोलून लाथेनें तिचें ताडन केलें. पुढें एके दिवशीं चार दिवसांच्या मुदतीनें तो जैन व्यापारासाठीं दुसऱ्या गांवीं गेला. जातांना, घरांतून बाहेर न पडण्याची आपल्या बायकोस त्यानें सक्त ताकीद दिली होती. परंतु तिकडे लक्ष्य न देतां ती स्त्री ज्योतिबुवांच्या कीर्तनास गेली. तों इकडे तिचा पति अकस्मात् घरीं आला. घरांत बायको नाहीं असें पाहतांच—

क्रोधें दांत खातसे करकरा । बोले व्यापार फळला आम्हां बरा ।
स्त्री गेली दुसरियाचे घरा । आतां वांचावें काय काज ॥

असा विचार करून व हातीं दंड घेऊन पत्नीस शिक्षा करावी या उद्देशानें तो कीर्तनस्थलीं गेला. तेथें जमलेल्या स्त्रियांत त्याची स्त्री

बसली होती ती त्याच्या दृष्टीस पडली नाहीं, परंतु तिनें मात्र याला पाहिलें. आतां कांहीं हा आपणास जीवंत ठेवीत नाहीं, या भीतीनें, " गुरुराया, तुह्मीच आतां माझें रक्षण करा" अशी ज्योतिबुवांची मनांतल्या मनांत तिनें प्रार्थना केली. अंतर्दृष्टीनें हा प्रकार बुवांस ज्ञात होतांच:—

स्वामी बोलूं लागले कीर्तनीं । ज्याचा निश्चय जैसा असे मनीं ।
तो पुरवीतसे चक्रपाणी । दृढविश्वास असावा ॥
हरि काय करणार नाहीं । इच्छिलें फळ देतो पाहीं ।
म्हणोनि त्वरित लागा पायीं । कल्पद्रुम म्हणवितो ॥

हें बुवांचें भाषण ऐकून जैन मनांत ह्मणतो " याचा देव स्वतः कल्पद्रुम म्हणवितो, तर याची सत्यता आतांच पाहूं. मी दोन बैलांच्या पाठीवरून कांच आणली आहे, तिची जर याच्या देवानें चांदी केली तर ती गुरुदक्षिणा म्हणून या बुवांस मी अर्पण करीन." असा संकल्प करून बुवांच्या नांवानें चडफडत तो तेथें उभा असतां, बुवांची रसाळ वाणी ऐकून त्याचा क्रोध हळुहळू शांत होत चालला. कांहीं वेळानें कीर्तन आटोपल्यावर तो आपल्या घरीं गेला व बायकोस कांहीं न बोलतां स्वस्थ निजला. सकाळीं जाऊन कांचेच्या गोण्यांत पाहतो तों तेथें कांच नसून चांदी भरली आहे असें त्याच्या दृष्टीस पडलें ! तो अत्यंत आश्चर्यचकित होत्साता आपल्याशींच बोलला—

" रात्रौ बोलिलों मी थट्टे । कांच आणिली गेली कोठें ।
स्वामीप्रतापाचें बळ मोठें । आतां न राहें मी संसारीं ॥ "

मग ती सगळी चांदी घेऊन तो ज्योतिबुवांकडे गेला परंतु बुवांनीं चांदीचा स्वीकार केला नाहीं; तेव्हां जैन हात जोडून त्यांस

म्हणाला " महाराज, मी आतां घरीं जाऊं इच्छित नाहीं. " इतकें बोलून तो आपल्या इष्टमित्रांकडे गेला व त्यांस त्यानें सांगितलें कीं, " माझा व्यापार सफल झाला. मी आतां सद्गुरूंस शरण गेलों आहे व त्यांना आपलें तन मन धन वाहिलें आहे. " नंतर आपल्या स्त्रीसह तो स्वामिसन्निध येऊन राहिला व त्यांच्या सेवेंत काळ घालवूं लागला. नित्य नामस्मरण करितां करितां तन्मय होऊन अवस्थात्रयाचा त्यानें त्याग केला व गुरुकृपेनें योगी होऊन समाधिसुखानुभव घेऊं लागला. त्याच्या कांचेची चांदी झाली होती, ती विकून त्या पैशानें बुवांनीं विठ्ठलमंदिर बांधविलें. नंतर उज्जनींतील लोकांचा व श्रीमहाकालेश्वराचा निरोप घेऊन बुवा दक्षिण हैदराबादेस गेले. तेथें नगराबाहेर तंबू देऊन बुवा राहिले. नित्य हरिनामाचा गजर होऊं लागला; त्यामुळें मुसलमान लोकांचें कपाळ उठूं लागलें. ते येऊन बुवांच्या शिष्यवर्गास धमक्या देऊं लागले. शिष्यांनीं ही हकीकत ज्योतिबुवांस कळविली. बुवांनीं निजामसाहेबांस पत्र लिहिलें कीं " भजन करणें हा आमचा स्वधर्म आहे. तरी त्यास आड न येण्याविषयीं आपण आपल्या प्रजाजनास ताकीद द्यावी. " पत्र वाचतांच निजामसाहेबांस आश्चर्य वाटलें. इतकी स्पष्ट भाषा उपयोजिणारा हा कोण आहे याची चौकशी करण्यासाठीं त्यानीं आपले नोकर पाठविले. त्यांनीं बुवांपाशीं येऊन सामोपचारानें विचारलें कीं " आपण कोण? कोठून आलांत ?" शिष्यांनीं सांगितलें कीं, "हे आह्मा हिंदु लोकांचे काजी आहेत. संचार करीत करीत तुमचें राज्य पाहण्यासाठीं हे येथें आले आहेत. भजनपूजन करणें हा आमचा स्वधर्म आहे व त्याला जर कोणी प्रतिबंध केला तर आह्मी त्यास शिक्षा करूं. हे

गुरुजी पुण्याचे रहिवासी असून, श्रीमंत पेशवेदेखील त्यांजपुढें हात जोडून उभे राहतात आमच्या गुरुजींच्या सामर्थ्याची प्रतीति तुह्मांस लवकरच येईल." ही हकीकत नोकरांनीं निजामसाहेबांस जाऊन सांगितली तेव्हां ते आश्चर्यचकित होऊन ह्मणाले "ये तो बात बडी जादा है."

हैदराबाद येथील माणिकचौकांत बुवांचें नित्य कीर्तन होत असे. याप्रमाणें एक महिनाभर त्यांचीं कीर्तनें तेथें चालू होतीं. एके दिवशीं रात्रौ शहरांतल्या कांहीं मुसलमान काजींनीं कीर्तनाचे वेळीं बुवांस मुसलमानी धर्माविषयीं कांहीं प्रश्न विचारले, तेव्हां त्यांचीं समर्पक उत्तरें देऊन बुवांनीं त्यांस गप्प बसविलें. दुसरे दिवशीं पुनः वाद-विवाद झाला. त्यांतही काजींस बुवांनीं निरुत्तर केलें. मग 'शेषं कोपेन पुरयेत्' या न्यायानें काजी म्हणाले " तुमचा देव मारुती हा महार आहे, म्हणूनच त्याचें देऊळ गांवाबाहेर असतें.—

" कोठें नाहीं गांवांत वस्ती । वेशीबाहेर राहतो मारुती ।
दूर असती धेडवस्ती । तैसें आम्हा दिसतसे ॥"

हें ऐकून बुवा क्रोधायमान झाले. ते यवनास म्हणाले " ह्या तुमच्या मोगलाईच्या जागीं पूर्वीं दंडकारण्य होतें. तेथें पहिल्यानें श्रीरामचंद्रानें मनुष्यांची वसाहत करविली व ग्रामरक्षणार्थ मोकाशी म्हणून, गांवाबाहेर मारुतीची स्थापना केली. तुमची मशीद गांवांत असते आणि निमजगा गांवाबाहेर डोंगरांत असतो, त्याचें कारण काय ? " हें ऐकून काजीची वाचा बसली, हें सांगावयास नकोच. तितक्यांत हिंदु लोकांनीं हरिनामाचा गजर केला त्यामुळें काजी अधिकच चिडले. त्यांनीं दुसरे दिवशीं रात्रौ बुवांच्या कीर्तनांत हत्ती

आणून सोडला; त्यामुळें श्रोतेमंडळी पळून गेली. कांहीं शिष्यही पळून गेले. परंतु तिघा शिष्यांनीं स्वामीभोंवतीं कडें करून, तेथून न हालण्याचा निश्चय केला. इतक्यांत हत्ती त्यांच्या अंगावर चालून आला. तेव्हां बुवांनीं त्यास म्हटलें " उभा रहा; पुढें येऊं नकोस." बुवांच्या शब्दास मान देऊन हत्ती जागच्याजागीं तटस्थ उभा राहिला. बुवांनीं गजेंद्रमोक्ष पठन करून हत्तीस उपदेश केला. तो ऐकून हत्ती शांत झाला आणि त्यानें बुवांच्या चरणकमलीं मस्तक टेकून तेथेंच देह विसर्जन केला. बुवानें जादू करून हत्ती मारला अशी बातमी नबाबांच्या कानीं गेली तेव्हां त्यांनीं स्वतः येऊन बुवांस विचारलें कीं " ही गोष्ट कशी घडली ? " तेव्हां

" गुरु बोलती तयासी । नाहीं जादू आम्हापाशीं ।
मुक्त जाला पायापाशीं । पशुयोनी टाकिली तेणें ॥

तरी आतां याच्या समाधीचें काम सुरू करा. " यावर नबाबानीं सांगितलें " पुनः एक वेळ या हत्तीस तुम्ही जिवंत करा; व त्याजकडून मुजरा करवा. म्हणजे तुमच्या म्हणण्याप्रमाणें आम्ही करूं. " बुवानीं लागलीच हत्तीच्या अंगावरून हात फिरविला, तोंच हत्ती जीवंत होऊन त्यानें आसपासच्या एकदोन घरांची नासाडी करून टाकली ! परंतु बुवांनीं " हां हां " असें म्हणतांच हत्ती ताबडतोब शांत झाला व बुवांपुढें डोकें नमवून सर्वांस मुजरा करून त्यानें पुनः देह ठेविला. नबाबासुद्धां सर्व मुसलमानाची बुवांच्या अलौकिकपणाबद्दल खात्री होऊन चुकली. बुवांचा गौरव करून यवन निघून गेले. बुवांजवळ पांचशें शिष्य होते, परंतु या प्रसंगीं त्यांतले फक्त तीन असामीच काय ते कसोटीस उतरले, बाकी सगळे भोजनभाऊ निघाले. ढोंगी गुरुशिष्यांसंबंधानें चरित्रकार म्हणतोः—

सांप्रत गुरुशिष्य जाले फार । न करिती परलोकाचा विचार ।
मनीं मानिला ह्या एक व्यापार । मार्ग चुकोनि जाताती ॥
शिष्य इच्छितो गुरुघरची पोळी । आग्रहें वाढावो वेळोवेळीं ।
उपेक्षा केलिया तळमळी । तुच्छ मानी गुरूतें ॥
गुरूही मनीं विचार करिती । नित्य शिष्य येती जाती ।
भोजना जागा न पुरती । लाभ नाहीं कवडीचा ॥
यासी परमार्थ कैसाजे । व्यर्थ दाविती गुरुशिष्याचें ओझें ।
उभयतां स्वहित न समजे । बुडोनि जाती संसारीं ॥

असो. पुढें संचार करीत करीत बुवा पुण्यास आले. श्रीमंत समारंभानें त्यांस सामोरे गेले होते. दर्शनार्थ नागरिक स्त्रीपुरुषांचा तोबा उडाला होता. मिरवणूक विठ्ठलमंदिरानजीक गेल्यावर सभामंडपांत बुवा बसले. श्रीमंतही त्यांच्या शेजारीं बसले. तेव्हां बुवांनीं हळूच श्रीमंतांस सांगितलें कीं " आम्हीं आतां लवकरच कृष्णातटीं जाणार आहों." श्रीमंत म्हणाले, "येथें आपणास काय कमी आहे ? आपला काय मनोरथ असेल तो कळवावा." बुवानीं सांगितलें " ज्येष्ट पुत्राचें कुटुंब वारलें. त्याचा द्वितीय विवाह करावयाचा आहे. आमचे सगळे आप्त कृष्णातीरीं आहेत, तेव्हां तिकडेच जाण्याचा आमचा विचार आहे." तेव्हां श्रीमंत म्हणाले " मुलाचें लग्न येथेंच करावें. आम्ही आपल्या सगळया आप्तांस इकडे आणण्याची तजवीज करितों." परंतु बुवांनीं ही गोष्ट मान्य केली नाहीं. ते म्हणाले " कृष्णातीरीं जाण्याचें दुसरें एक कारण आहे. हा देह आतां जीर्ण झाला आहे, त्याचें विसर्जन कृष्णातीरीं व्हावयाचें आहे." हें ऐकून सर्व मंडळीस फार वाईट वाटलें.

पुण्यास असतांना, एके दिवशीं एक स्त्री बुवांपाशीं येऊन ह्मणाली " महाराज, मी सहस्रभोजनाचा संकल्प केला आहे, परंतु मी इतकी दारिद्री आहें कीं, चरितार्थासाठीं मला भीक मागावी लागते. तर हा माझा संकल्प आतां कसा सिद्धीस जाणार? " बाईचें निष्कपटी भाषण ऐकून बुवांनीं तिला सांगितलें, "तुम्ही उद्यां कोरान्न भिक्षा मागून आणा आणि त्याचीं पक्वान्नें करून आह्मांस आपल्या घरीं भोजन द्या. मग सहस्रभोजनाचा तुमचा संकल्प पूर्ण होण्याची युक्ति मी तुह्मास सांगेन. " बुवांस वंदन करून ती बाई आपल्या घरीं गेली. दुसरे दिवशीं तिनें कोरान्न भिक्षा मागून आपली व सड्यासंमार्जन करून शुचिर्भूतपणानें सुंदर पाकनिष्पत्ति केली. इकडे बुवांनीं आपल्या मंडळीस सांगितलें कीं " आज आह्मास भोजनाचें निमंत्रण आहे. आह्मी तिकडे एकटेच जाणार. " इतकें सांगून बुवा पालखींत बसून निघाले, तेव्हां त्यांचा कनिष्ठ पुत्र लक्ष्मण यानें, आपणास बरोबर नेण्याची बुवांस विनंति केली. तेव्हां त्यालाही बरोबर घेऊन बुवा त्या विधवा स्त्रीच्या घरीं गेले. जेवणाची तयारी झाली होती, पण नेसावयास सोंवळें नव्हतें. बाईनें एक जीर्ण धाबळी दिली, ती नेसून बुवा पाटावर बसले; व त्या विधवेच्या हातून त्यांनीं उदक सोडविलें:—

अनेन सद्गुरुभोजनेन । सिद्धि होवो सहस्र ब्राह्मण ।
उदक टाकिलें करांतुन । मग घेतल्या प्राणाहुति ॥

जेवण झाल्यावर बुवांनीं बाईस सांगितलें कीं, "आमचें खरकटें ताट आधीं उचला व मग घरांतील शेषान्न तुह्मी ग्रहण करा." त्याप्रमाणें बाईनें बुवांची पत्रावळ उचलून बाहेर नेऊन टाकली व

शेण घेऊन घरांत आली. तों त्याच जागीं दुसरी पत्रावळ तिच्या दृष्टीस पडली !—

" आश्चर्य वाटतें मानसीं । दुजे काढिलें उच्छिष्टासी ।
निक्षेप केला बाह्य देशीं । पुनः वाहतां तैशीच तिसरी ॥
तिसरी काढिली चवथी असे । तीही काढितां पांचवी दिसे ।
एक एक पात्र काढीतसे । गणती जाली सहस्राची ॥ "

हां हां म्हणतां सर्व शहरभर या चमत्काराची प्रसिद्धि झाली. श्रीमंत पेशव्यांस हें वर्तमान कळतांच तेही बुवांच्या दर्शनास आले; व त्यांनीं नम्रपणें बुवांस विचारिलें कीं " एका वाढितां भोजनासी । सहस्र कैसे तृप्त झाले ? "

स्वयंज्योति बोलिले हांसून । द्रौपदीनें दिधलें भाजीपान ।
जालें त्रैलोक्य समाधान । तैसे रीतीं सहस्र जेविले ।
एक्या भाजीपानें विश्व जेविलें । सहस्रांस अन्न एक जेवितां कां न पोचलें ।
तिच्या भावासारिखें घडलें । जाली समाधान विप्रवनिता ॥

सभाविसर्जनसमयीं नाना फडणिसांनीं बुवांस विनोदानें प्रश्न विचारला, " महाराज, आपण आजवर जें काय संपादन केलें, तें कोठें ठेवलें आहे ?" स्वयंज्योतीनीं उत्तर दिलें " नाना, आपलें द्रव्य आपण कोठें ठेवलें आहे, हें कोणी कोणास सांगत नाहीं. आमचें द्रव्य आह्मी अमूक ठिकाणीं ठेवलें आहे असें जर आह्मी तुह्मास सांगितलें, तर तुह्मी पडलां अधिकारी पुरुष. अधिकाराच्या जोरावर तुह्मी जर त्या द्रव्याचा अपहार केला तर माझ्या मुलांचें पुढें कसें होईल ? परंतु, जें द्रव्य राजपुरुषांस हरण करितां येईल असें द्रव्य आह्मी मिळविलेंच नाहीं. आमचें द्रव्य ह्मणजे—

एकनिष्ठ भजन करिती । हाता येतील चारी मुक्ति ।
भिक्षे करुनी उदरपूर्ती । वश करितील श्रीहरीतें ॥
भय नाहीं यासी कदा । ही तंव वैष्णवांची अद्भुत संपदा ।
अखंड कृष्णकथेचा धंदा । भक्ता उणें मग कोणतें ? ॥

बुवांच्या गुप्तधनाची ही माहिती ऐकून सर्व सभाजनांनीं माना डोलविल्या. दुसरे दिवशीं बुवा कृष्णातटीं जाण्यास निघाले. श्रीमंतांसह हजारों स्त्रीपुरुष पुण्याबाहेर दोन कोस त्यांना पोंचविण्यास गेले होते. नंतर त्यांना निरोप घेतांना बुवांनीं त्यांस सांगितलें कीं,

" आम्ही जातों स्वदेशा । सोडावी आतां आमुची आशा ।
सर्वांनीं वर्णावें श्रीकृष्णयशा । सुख पावाल अक्षयी ॥

बुवांचा हा शेवटचा निरोप ऐकून सर्व पुणेंकरांस मोठें दुःख झालें. आतां यापुढें कांहीं बुवांचें दर्शन पुनः आपणास होत नाहीं असें त्यांस वाटलें. असा थोर पुरुष आपणास आतां कायमचा अंतरला असे उद्गार काढीत श्रीमंतांसुद्धां सर्व लोक मोठ्या दुःखानें मागें परतलेः—

चालतां वर्णिताती गुण । मनुष्य नोहे अवतार पूर्ण ।
विश्वोद्धाराकारण । शंकर आला भूमंडळा ॥
कर्तुं अकर्तुं शक्ति अंगीं । प्रसिद्ध करुनी दाविली जगीं ।
ऐसें बळ मनुष्या अंगीं । ईशावांचोनि घडे केवी ॥
हत्ती कैसा उद्धरिला । साडेसातशें ते विठ्ठलमूर्तिला ।
केंवि केलें स्थापनेला । मानव कैसें म्हणावें तया ॥
एकटे जेवोनि झालें सहस्रभोजन । हें का घड मनुष्याहातुन ।
कृष्णस्वरूप भासले आपण । गोपाळ काल्या माझारी ॥
ऐशा बहुत ऐकिल्या गोष्टी । किती देखिल्या आम्ही दृष्टी ।
तारावया चराचर सृष्टि । अवतार सत्य श्रीहरीचा ॥

तीन दिवसांत लिहिलीं कैसीं दप्तरें । मृत्युलोकीं नाहीं तैसीं अक्षरें ।
प्रत्यक्ष ईश्वरानें लिहिलें खरें । सामर्थ्य नाहीं जीवांना ॥
चार यामांत श्रीभागवतसंहिता । कोण असे भूमंडळीं वाचिता ।
जन्म घेतला प्रत्यक्ष शुकताता । संशय यांत नाहीं कांहीं ॥

असो. याप्रमाणें पुणेंकरांचा निरोप घेऊन बुवा निघाले ते जेजुरीस आले. तेथें त्यांस मल्लारी मार्तंडानें दर्शन दिलें. पुढें नीराकांठानें स्वारी चिंचणेरकडे निघाली. चिंचणेरला जाण्यापूर्वी तेथील लोकांस जासुदाबरोबर पत्र पाठवून, "आमच्याबरोबर हजारों माणसें आहेत, त्यांच्यासह आम्ही अमुक दिवशीं येतों" असें बुवांनीं कळविलें. बुवांचे व्याही चिंचणेरास होते त्यांनीं गांवाबाहेर डेरे देऊन मंडळीच्या उतरण्याची व्यवस्था केली. ठरल्याप्रमाणें बुवांच्या पुत्राचें लग्न मोठ्या थाटानें झालें. समारंभ आटोपल्यावर "आतां आम्ही आमच्या गांवीं जातों" असें बुवांनीं सर्वांस सांगितलें. तें ऐकून, हे जाणार तरी कोठें, या विचारांत लोक आहेत, तोंच बुवांनीं समाधि लावून तात्काळ देह ठेविला. शके सतराशें दहा, कीलक नाम संवत्सर, मार्गशीर्ष कृष्ण त्रयोदशी, या दिवशीं बुवांचें निर्याण झालें. इकडे बुवांनीं देह ठेवला त्याच वेळीं तिकडे पंढरपुरास पांडुरंगाच्या देवालयाचे दरवाजे आपोआप बंद झाले. देवाचें दर्शन होईना म्हणून हजारों लोक महाद्वारापुढें जमून, पुढें काय करावें याचा विचार करूं लागले. इतक्यांत, वैकुंठस्वामी नामक सत्पुरुष तेथें होते त्यांस साक्षात्कार होऊन त्यांनीं सांगितलें कीं "पांडुरंग येथें नाहीं. येथून तीस कोसांवर, स्वयंज्योतिबुवांनीं देह ठेवला, म्हणून देव तिकडे गेला आहे. तुम्ही जाऊन देवास घेऊन या, मग दरवाजे उघडतील." हें ऐकून बडवे ताबडतोब चिंचणेरास जाण्यास निघाले. श्मशानांत

बुवांची रक्षा भरली जात असतां तेथें येऊन बडव्यांनीं लोकांस सांगितलें कीं " आम्ही उपाशी आहों. तरी आमचा देव आमच्या स्वाधीन करा. नाहींतर आम्ही प्राणत्याग करूं " मंडळी बुवांची रक्षा भरीत होती, तींत त्यांस एकहि अस्थि आढळला नाहीं ! त्या मंडळींत कोणी विठ्ठलभट होता, तो बडव्यांचें भाषण ऐकतांच गुप्त झाला. तो चमत्कार पाहून सर्व मंडळीस वाटलें कीं श्रीविठ्ठलच विठ्ठलभटाच्या रूपानें येथें आला असावा. विठ्ठलभट गुप्त होतांच, देव पंढरीस गेला असें समजून बडवेही पंढरीस जाण्यास निघाले. साक्षात् पांडुरंग येथें आला असतां, त्यास आपण ओळखिलें नाहीं, या विचारानें ज्योतिबुवांचे ज्येष्ठ पुत्र रामचंद्रबुवा यांस फार वाईट वाटलें व उपरति झाली:—

तेणें वैराग्य संपादिलें । विषयीं असोनी विषयातीत राहिले ।
वेदव्यासचरणीं लक्ष ठेविलें । भागवतचर्चा सर्व काळ ॥
वाळुवंटीं बांधिली समाधि । कृष्णावेणीउदकसन्निधी ।
जे जन तेथें भजती त्रिशुद्धि । आधिव्याधि तयां बाधेना ॥

नदीतटाकीं लक्ष्मीनारायणाचें देऊळ बांधून रामचंद्र बुवांनीं तेथें आजन्म वास्तव्य केलें. त्याचे पुत्र पांडुरंग हेही मोठे हरिभक्त होते. ज्योतिबुवांचे कनिष्ठ चिरंजीव लक्ष्मण यानीं पुत्रकलत्रत्याग करून ब्रह्मावर्ती गंगातीरीं वास्तव्य केलें. पंचाऐशीं वर्षांचें वय झाल्यावर, आपला अंतकाल समीप आला आहे हें जाणून, कृष्णातीरीं देहविसर्जन करावें या उद्देशानें लक्ष्मणबुवा दक्षिणेंत चिंचणेर मुक्कामीं ज्योतिबुवांच्या समाधिस्थलीं आले. अंतसमय प्राप्त होतांच, जवळच्या मंडळीस परमार्थोपदेश करून, हरिनामाची गर्जना करीत, बुवांनीं देह ठेविला. लक्ष्मणबुवांचे पुत्र नारायण हे अल्पवयी मृत्यु पावले.

ते भजनकीर्तनादिकांत आपला काल घालवीत असत. त्यांस रघुनाथ आणि गोविंद असे दोन पुत्र होते. हल्लीं ज्योतिबुवांची पांचवी पिढी सुरू आहे; चरित्रकार म्हणतोः—

स्वयंज्योतीचा वंश ऐसा । कोणी न करिती शास्त्रअभ्यासा ।
निरंतर भजती वेदव्यासा । होतसे ज्ञान तया ग्रंथार्चे ॥
अभ्यासाविना बोलती ज्ञान । मोहित होती सकल जन ।
ही सद्‌गुरुकृपा वरदान । दिधला ग्रंथ ते वेळीं ।
पूर्वापर जो महापुरुष असे । निरंतर वंशा रक्षितसे ।
तो आज्ञापील जैसें । वर्ततातो सन्मार्गी ॥

ज्या ओवीबद्ध चरित्राच्या आधारानें प्रस्तुत लेख लिहिला आहे, त्या चरित्राचे कर्ते सखाराम हे, उपरिनिर्दिष्ट रघुनाथबुवांचे शिष्य होत. ज्योतिपंत हे अथर्व वेदी देशस्थ ब्राह्मण; या ब्राह्मणांचीं कांहीं घरें सातारा जिल्ह्यांत व नगर जिल्ह्यांत आहेत; तीं सुमारें २५० होतील. सांप्रत हे लोक आपलीं नित्यकर्में ऋग्वेदमंत्रांनीं करितात. ज्योतिबुवांचे समकालीन संतकवि म्हटले म्हणजे, मोरोपंत, रामजोशी, तुका विप्र हे होत. यांपैकीं तुका विप्रांचा व बुवांचा विशेष स्नेह असून, बुवांच्या निर्याणकालीं तुका विप्र त्यांच्या सन्निध होते, असें विप्रांच्या पुढील अभंगावरून वाटतें:—

लग्नाचे तांतडी ज्योतिपंत आला । ठाव मागितला कृष्णेपाशीं ॥ १ ॥
कीलक वत्सर मार्गशीर्ष मासीं । कृष्णत्रयोदशी गुरुवारीं ॥ २ ॥
वैष्णव गर्जती वाजविती टाळ । तंव प्रदोष काळ प्राप्त जाला ॥ ३ ॥
ज्योतीमाजी ज्योती मिळाला देखोन । करीत गायन तुकाविप्र ॥ ४ ॥

असो. येथें ज्योतिपंत महाभागवतांचें चरित्र संपलें. अलौकिक चमत्कारांनीं भरलेलें हें चरित्र अर्वाचीन चिकित्सकांस कसें काय

पसंत पडेल हा एक मोठा प्रश्नच आहे, परंतु लेखकाचा त्याला कांहीं उपाय नाहीं. संतांच्या अंगीं ही अलौकिक शक्ति कशानें येते हें स्वतः संत झाल्याशिवाय, समजणें कठीण आहे. ज्योतिबुवांची महाराष्ट्रीयांवर केवढी छाप होती हें, त्यांनीं निरनिराळ्या ठिकाणीं बांधलेल्या शेंकडो विठ्ठलमंदिरांवरून, स्पष्ट दिसत आहे. लक्षावधि रुपये मिळवून त्यांचा व्यय अशा सत्कर्माकडे बुवांनीं केला व लक्षावधि लोकांस उपासनामार्ग सुलभ करून दिला ही एकच गोष्ट त्यांची निरपेक्षता सिद्ध करण्यास पुरेशी नाहीं काय ? पुणें येथें लकडीपुलाजवळ जें विठ्ठलमंदिर आहे, त्यांत हल्लीं श्रीशिवाजी उत्सव साजरा करण्यांत येतो. बुवांनीं आपल्या भागवत संप्रदायाचें पुढील अभंगांत वर्णन केलें आहे:—

वेदव्यास आमुचे गुरू । जे कां भवाब्धीचें तारूं ॥ १ ॥
जाणा शुद्ध भागवत । आमुचा संप्रदाय होत ॥ २ ॥
**कृष्ण उपास्य देवता । वासुदेव एक सत्ता ॥ ३ ॥**
सवरूपी नारायण । हेंचि मनापई ध्यान ॥ ४ ॥
हरिस्मृतीचें आसन । तदाकार मुद्रा पूर्ण ॥ ५ ॥
एकादशी व्रत । पांडुरंग कुळदैवत ॥ ६ ॥
**आत्मा अभेद पाहणें । भूतदया आचरणें ॥ ७ ॥**
द्वादश तिलक । कंठीं तुळसीमाला देख ॥ ८ ॥
श्रीमद्भागवत कानीं । मनीं वाणीं सदा ध्यानीं ॥ ९ ॥
नवविध भजन । मुखीं नारायण कीर्तन ॥ १० ॥
कलियुगीं ज्योती म्हणे । याचि मार्गी सर्वी येणें ॥ ११ ॥

यासंबंधानें, रा. पांडुरंग महादेव बाक्रे यांनीं एके ठिकाणीं लिहिलें आहे " रामदासानीं स्थापन केलेल्या रामदासी

संप्रदायांत व ह्या भागवत संप्रदायांत अर्थातच फार अंतर आहे व त्याचें कारणही उघडच आहे. रामदासांच्या वेळीं परराज्याचा वरवंटा सर्वांच्या डोक्यावरून फिरत होता. ज्योतिपंतांच्या वेळीं महाराष्ट्र भाग्यशाली सवाई माधवरावांच्या छत्राखालीं शीतल छायेंतील सुखाचा उपभोग घेत होतें. राजकीय परिस्थितींत हा असा भेद असल्यामुळें दासांच्या संप्रदायांत राजकारणाचा अंतर्भाव झाला व ज्योतिपंतांचा संप्रदाय निवळ भक्तिप्रधान असाच राहिला. ह्या भेदामुळेंच रामदासी संप्रदायाकडून अत्यंत महत्त्वाचें असें जें कार्य घडून आलें—म्हणजे महाराष्ट्र गुलामगिरींतून मुक्त झालें—तशा प्रकारचें कार्य भागवत संप्रदायानें घडून येणें शक्यच नव्हतें. तरी त्यामुळें त्याची योग्यता कांहीं कमी होत नाहीं. " आत्मा अभेद पाहणें । भूतदया आचरणें " हें ज्या संप्रदायाचें मूलतत्त्व त्याचा हातून कांहीं महत्वाची कामगिरी घडली नाहीं, असें म्हणतां यावयाचें नाहीं. " रा. बाक्रे यांचें हें विवेचन पुष्कळ अंशीं यथार्थ आहे. शिवाय, महाराष्ट्राची गुलामगिरींतून सुटका करण्याचें बरेंच श्रेय रामदासी संप्रदायास देण्यास इतिहासाचा आधार फार थोडा आहे, हें लक्ष्यांत ठेवलें पाहिजे. यवनाच्या गुलामगिरींतून महाराष्ट्राची सुटका करण्याचा विचार शिवाजी महाराजांच्या मनांत त्यांच्या बालपणापासूनच घोळूं लागला होता व ती प्रेरणा आरंभीं त्यांना रामदासांकडून झाली असें ह्मणणें ह्मणजे ऐतिहासिक कालक्रमाचा विपर्यास करणें होय. शिवाजी महाराजानीं स्वयंप्रेरणेनें सुरू केलेल्या स्वराज्यस्थापनेच्या कार्यास रामदास संप्रदायाकडून नैतिक व धार्मिक पाठबळ मिळालें नसेल असें माझें ह्मणणें नाहीं, परंतु " महाराष्ट्राची गुलामगिरींतून

सुटका " करण्याचें श्रेय रामदासी संप्रदायास देणें ह्मणजे शिवाजी महाराजांच्या कामगिरीचें महत्त्व कमी करणें होय, ही गोष्ट डोळ्याआड करण्यांत ऐतिहासिक सत्यप्रियतेचा जो उघड उघड अभाव दिसतो, तो दिसूं नये इतकेंच माझें ह्मणणे आहे. असो.

ज्योतिबुवांनीं समग्र श्रीमद्भागवतावर एक ओवीबद्ध व एक अभंगबद्ध अशा दोन विस्तृत टीका लिहिल्या आहेत, परंतु त्यांतला एकही ग्रंथ आज सामग्र्येंकरून उपलब्ध नाहीं, ही खेदाची गोष्ट होय. श्रीमद्भागवतावर मोरोपंतांशिवाय अन्य मराठी कवीचा समग्र ग्रंथ आज उपलब्ध नाहीं. मुक्तेश्वरानीं श्रीमद्भागवतावर एक मोठा ओवीबद्ध ग्रंथ लिहिला असल्याचा उल्लेख कांहीं ठिकाणीं आढळतो, पण तो ग्रंथ अद्याप कोठें सांपडत नाहीं व यापुढें सांपडेल अशी फारशी आशाही नाहीं. अशा स्थितींत ज्योतीबुवांचें भागवत त्यांच्या संप्रदायिक लोकांनीं किंवा ऐतिहासिक कागदपत्रांचा शोध करण्यासाठीं गांवोगांव फिरणाऱ्या रा. राजवाड्यांसारख्या गृहस्थानीं शोधून काढण्याचा प्रयत्न अवश्य करावा अशी त्यांस माझी सविनय विनंति आहे. ज्योतिबुवांची भागवतावरील टीका ' खंडोपंत ' नामक गृहस्थानीं लिहून काढल्याचा उल्लेख पूर्वीं आला आहे. ज्योतिपंतांस श्रीव्यासांनीं काशी येथें जी भागवताची पोथी दिली ती हल्लीं चिंचणेर येथें त्यांच्या वंशजांपाशीं आहे असें समजतें. वरील दोन ग्रंथांशिवाय, ज्योतिबुवांची भागवतावर एक गद्यरूप मराठी टीका आहे, असें इतिहाससंग्रह मासिकाच्या दुसऱ्या वर्षाच्या ६ व्या अंकांत लिहिलें आहे. ' **प्रवृत्तिनिवृत्तिऐक्यता रत्नावलि** ' या नांवाचा यांचा आणखी एक गद्यग्रंथ असल्याचा उल्लेख त्याच मासिकांत

आढळतो. ज्योतिपंतांच्या ओवीबद्ध भागवताचा कांहीं भाग, पुणें येथें मोडक्या बाजारांत रद्दी विकणाऱ्या एका बोहऱ्यापाशीं मला मिळाला, त्यांत भागवताचा एक संपूर्ण अध्याय असून त्याच्या ओव्या १४५६ आहेत. मूळांतील ५० संस्कृत श्लोकांवर ज्योतिबुवांनीं १४५६ ओव्या लिहिल्या आहेत, यावरून समग्र भागवतांतील १८००० श्लोकांवरील त्यांचा टीकाग्रंथ फारच मोठा असला पाहिजे हें उघड दिसतें. या अध्यायाच्या शेवटीं पुढील ओव्या आहेत:—

भगवंत भक्त भागवत । भक्तिही चतुर्विध दुर्लभ बहुत ।
त्यांस करीं प्रणिपात । श्रवणें सर्व मंगळ जोडे जें ॥
गुरुत्वें कीर्तनाधिकार ब्राह्मणाचा। इतर वर्णा स्त्रियांदिकां श्रवणीं साचा ।
हा नेम असे भगवदाज्ञेचा । हरिदास सर्जीं तो पाळावा ॥
केवळ हरिपदीं जे रंगले । सर्वथा देहाभिमान जिहीं सांडिले ।
ते ब्रम्हादिकां पूज्य जाले । त्यांसी स्त्रीशूद्रादि नीच कोण म्हणे तो॥
एवं हरिगुणकीर्तनाधिकार । कालयुगीं सर्वां येकपर ।
गंगाजीवन जेवीं न विटाळे निर्धार । भागवत धर्मीं नरमात्र तेंवी अधिकारी तो॥
जयजया अच्युता अनंता । जयजय श्रीनारायण कृष्णनाथा ।
जयजया हरिवासुदेवा अनंता । तुज नमस्कारीं सर्वापराध सहावे ते ।
शुद्ध शब्द पदवाक्यार्था नेणें । तुवां ते पूर्ण करावें असे जें उणें ।
सर्व जीवकल्याण करणें हें विनवणी । मी दासानुदास नमतें करीं अनंत ॥
स्वयंज्योतिवाणी हे सुवर्णी । सज्जना भूषवो सर्वांगा जाऊनि कर्णीं ॥
विश्वव्यापक साम्राज्य धणी । करील हे प्रतिज्ञा दयासगुरुकृपेची ॥
शके १७०९ प्लवंग संवत्सरीं । दक्षिणायन शरदृतु कार्तिकांतरीं ॥

यापुढील ओंव्या गहाळ झाल्या आहेत. बुवांची वाणी फार प्रौढ, परमार्थिक अधिकार मोठा, व विद्वत्ताही दांडगी दिसते. बाळपणीं

ज्याचें फारसें अध्ययन झालें नाहीं, त्यानें भागवतासारख्या अध्यात्म-प्रचुर ग्रन्थावर एवढी विस्तृत टीका लिहावी, हा तरी एक चमत्कारच नव्हे तर काय ? आतां बुवांच्या कवितेंतले कांहीं उतारे देऊन हा चरित्रलेख पुरा करूं.

परीक्षुदुवाच । ब्रह्मन् ब्रम्हण्य निर्देश्ये निर्गुणे गुणवृत्तयः ।
कथंचरंति श्रुतयः साक्षात्सदसतः परे ॥

ब्रम्हन् । ब्रम्हवित ब्रम्हा भिन्न । म्हणून शुका तूं ब्रम्ह पूर्ण ।
द्वैताद्वैत वेदार्थ गहन । ज्याचा त्यास विदित तो ॥ १२ ॥
शब्द निःशब्द गात । याचा जाणसी तूं सिद्धांत ।
तुजचि पुसणें हें उचित । परम गुह्य सर्वी जें ॥ १३ ॥
जीव पांथिकाचा मार्ग । वेदचि नानाविध सांग ।
तत्तदाज्ञापाळण सत्वग । ब्रम्हलोका पाटवी ॥ १४ ॥
विधि निषेध मिश्रपणें । रज मार्ग भरितां जाणे ।
मृत्युलोकीं जीवा फिरणें । नराकृति धरुनियां ॥ १५ ॥
अकर्म विकर्म तमपथ । भरितां जीवा अधःपात ।
नरक तमयोनी समस्त । फिरणें एवं गुणयोगे ॥ १६ ॥
हा एक कर्ममार्ग वेदांचा । दुसरा उपासनारूप साचा ।
सेव्यसेवक भेदाचा । प्रत्यक्ष लोकप्राप्ति त्या ॥ १७ ॥
आतां उपनिषद् ज्ञानपथ । कर्मी अंतःकरणशुद्धि दावित ।
उपासनसाह्यें ज्ञान दृढावत । ईश्वरप्रसादें करोनी ॥ १८ ॥
मग ज्ञानें दृश्य भेद बाधित । जीव अद्वय ब्रह्म होत ।
ऐसी एकवाक्यता भागत । अद्वैत पथ वेदाचा ॥ १९ ॥
जीव ब्रम्ह होत । त्याचें स्वरूप न बोलवत ।
कांहीं नुरे शून्य राहत । विषय नव्हे शब्दासी ॥ २० ॥
कां शब्दा विषय न होत । तेंही मी हें बोलत ।
त्रिविधा शब्द प्रवृत्ति नसत । निर्धर्मिक ब्रम्हीं यापरी ॥ २१ ॥

त्रम्हणि । शब्द ब्रम्हणि त्रिप्रकारक । त्यांतुनी ब्रह्मीं न संभवे एक ।
त्याच्या निरासार्थ सम्यक । विशेषणत्रय देताती ॥ २२ ॥

प्रथम मुख्या नामें प्रवृत्ति । दुसरी लक्षणा बोलती ।
तिसरी गौणी निश्चिती । शब्दज्ञ जाणती या सर्वा ॥ २३ ॥

मुख्या ही द्विप्रकारका । रूढी आणि यौगिका ।
त्यांत रूढी त्रिप्रकारका । स्वरूपज्योति गुणेंही ॥ २४ ॥

निर्देश्य योग्य वस्तुमात्रीं । संज्ञा संज्ञीं संकेतसूत्रीं ।
रूढी प्रवर्तते पवित्रीं । उदाहरण जाणावें ॥ २५ ॥

लेखकाच्या अशुद्ध लेखनसरणीमुळें मूळ ओंव्यांतील कांहीं शब्दांचें स्वरूप इतकें पालटून गेलेलें दिसतें कीं त्यामुळें अर्थबोध होण्यास मोठी अडचण पडते. तरी पण ज्योतिपंतांच्या भागवतांतल्या आणखी कांहीं ओंव्या वाचल्याशिवाय त्या ग्रंथांच्या स्वरूपाची यथार्थ कल्पना वाचकांस बरोबर होणार नाहीं म्हणून, दुसऱ्या एका श्लोकावरील साग्र टीका येथें उतरून घेतों:—

श्लोक । तस्मैह्मवोचद्भगवान् ऋषीणां शृण्वतामिदं ।
यो ब्रह्मवादःपूर्वेषां जनलोकनिवासिनां ॥

ऋषीणां शृण्वतां । भगवान् । तस्मै । इदं । हि । अवोचत ॥
ते कलापग्रामवासी ऋषी । श्रवण करित असतां शुद्ध मानसीं ।
नारायण ऐश्वर्यराशी । त्या नारदाकारणेंच हें बोलता जाला ॥
पूर्वेषां । जनलोकवासिनां । यः । ब्रह्मवादः ॥
हें तें कोणतें दावित । अनादि शिष्टाचार प्रमाणभूत ।
इतिहास परमामृत । आरंभिती हा ऐसा ॥
त्रिलोक मस्तक । भृग्वादि ऋषींचा महर्लोक ।
त्याहीवरी निष्कलंक । जनलोक नामें जो ॥
त्या जनलोकाच स्वामी । ब्रह्मपुत्र ब्रह्मचारी नेमी ।

सर्वां पूर्वे सनंदनादि नामी । त्याचा जो वेदवाद परस्परें ॥
श्रीभगवानुवाच । श्लोक । स्वायंभुव ब्रह्मसत्रं जनलोके भवत्पुरा ।
तत्रस्थानां मानवानां मुनीनामूर्ध्वरेतसां ॥
स्वयंभूव । हे मज्जनकबंधो । ब्रह्मपुत्रा कृपासिंधो ।
परम भागवता साधो । सर्वज्ञशिरोमणी उदारा ॥
किंवा स्वशब्दें आत्मा नारायण । स्वयें होय जाणे आपण ।
म्हणोनी हे स्वयंभुनंदन । मत्पुत्र पुत्रार्थी द्योतवी ॥
अथवा ब्रम्हयाचें धन । शब्दब्रह्म होय पूर्ण ।
त्याचा तूं विभागी सनकादिकां जाण । पांक्तिक योग्य त्या लाभा ॥
जनलोके । ब्रह्मसत्रं । पुरा । अभवत् ॥
सत्य तप लोकातळीं । उक्त जो महर्लोकाचे मौळीं ।
त्या जनलोक निर्मळीं । ब्रम्हसत्र पूर्वी होतें जालें तें ॥
सर्व यजमान समान । तेचि ऋत्विजरूपेंकरून ।
जेथें कर्म करिती प्रमाण । कर्मसत्र प्रसिद्ध जैसें तें ॥
तैसेंचि हें ब्रम्हसत्र । श्रोतेवक्ते समान जेथें पवित्र ।
करीत बैसती ब्रम्हविचारमंत्र । तें ब्रह्मसत्र संज्ञे जाणावें ॥
तत्रस्थानां । मानसानां । मुनीनां । ऊर्ध्वरेतसां
तें सत्र म्हणसी कोणाचें । तरी ऐक मम वाचे ।
त्या लोकनिवासी सनकादिकांचें । स्वानंदजनक रम्य जें ॥
जे तुझे श्रेष्ठ भ्राते । सर्व विदित असे तूतें ।
ब्रह्मदेवें कल्पिलें जें तें । पुत्र ब्रम्हविचार कराया ॥
नव्हेत जे योनिसंभव । त्यांस कैंचा जडदेहभाव ।
आत्ममननशील वैभव । साजे कीं त्या मुनिवरां ॥
स्त्रीपुरुषभेदा नेणती । तयां कोठुनी कामोत्पत्ति ।
कौमार बालवद्दशा अनुष्ठिती । रेतपातरहित वृत्ति जे ॥
या लोकां स्त्राव्यात्क । नस यथाथ कीं नृपती ।
अखंड ब्रह्मचर्य संपत्ति । ब्रह्मविचार ब्रह्मिष्ठां ॥
त्या तव बंधूंचें सत्र होत । मी तेथील मज कां न विदित ।
परि तुज न कळावयाचा वृत्तांत । ऐकें सकारण मम मुखें ॥

कलियुगांत हरिनामस्मरणासारखा दुसरा भवतरणोपाय नाहीं, हें सांगतांना ज्योतिपंत म्हणतात—

म्हणोनी तयां भाविकीं सेविजे । तन्मुखें श्रवणादि साधनीं शीघ्र तरोनि जाइजे ।
कलियुगीं मायातारणा अन्य उपाय न जाणिजे । श्रुतिसिद्धांत हरिकीर्तीवांचुनी ॥
अमोल्य आयुष्य व्यर्थ जाऊं देऊं नका । नर हो या श्रवणकीर्तनें भजा यदुनायका ।
विषयी जना विषयसुखसाधन मार्ग निका । निरतिशय अत्यंत सुखलाभ हा ॥
मुमुक्षूचें मोक्षसाधन । भवरोगाचें औषध हें प्रमाण ।
श्रीनारायणगुणश्रवणकीर्तन । मग अखंड हरिस्मरणें स्वानुभव जोडे तो ॥
स्वानुभवें अन्यथा भावनिवृत्ति । सहज बंधनाभावें स्वरूपस्थिति मुक्ती ।
त्यासी स्वरूपानंद भोगणें ठेवुनी चरमवृत्ति । श्रवण कीर्तन सद्धर्मानें ॥
हें मुक्तांचें भजन स्वप्रयोजनें । आणिक परप्रयोजन तिहीं हरिकीर्तन करणें ।
अन्यथा भासें दुःख पावलों होतों या स्मरणें । मुमुक्षु अज्ञानबंधना छेदिती ॥
सर्व स्वरूपें सगुण हरी । विराट् देही पुरुषावतारी ।
दृश्य न बाधितां अद्वय भावें अभय वरीं । स्थूळावरुनी सहज सूक्ष्म अनुभवें ॥
हें हरिउपासनेचें मुख्य फळ । हरि स्वात्मानुभव केवळ ।
अवांतर सृष्ट्यादि सामर्थ्य निर्मळ । येणें विषयी जनां हरिनिष्ठ मुक्त करिती ते ॥
एक हरी जीवां न कळतां । पृथकत्वें तदंगजा ब्रह्मादि देवां भजतां ।
क्षणिक क्षुल्लक फळें लाभती निरतिशयार्थी । म्हणोनी अद्वय सर्वेश सर्वी भजावा॥
वृक्षमूळीं जीवन सिंचितां । सहज वृक्षपत्रांत होय पुष्टता ।
किंवा प्राणा उपाहार अर्पितां । रोमांत तुष्टी होय देहीं ते ॥
तेवीं एक सर्वात्मा भजतां । सकळ विश्व पूजिलें तत्वता ।
तो हृदयीं स्वानुभवा ये नरां समस्तां ।......गीतश्रवण कीर्तनें तो ॥
या श्रुतिगीताचा वक्ता । श्रीकृष्ण नारायण होय स्वतां ।
तो सर्वांतर्यामी स्वतः सिद्ध जाणता । प्राकृत शब्दें तदर्थकर्ता अन्य नव्हे कीं ॥
सर्वस्वरूपें जेव्हां हरी । तेव्हां महाराष्ट्र भाषा नव्हे भिन्न तरी ।
हें सुजनीं विचारावें अंतरीं । आत्महित साधावें श्रवणादि पथानें ॥
कामधेनु कल्पतरु जरी जोडे । तरी रंका साम्राज्यवैभव प्राप्त रोकडें ।
तैसें व्यासगुरुप्रसादें मज हें जोडे । सर्वोपनिषद्रसपान प्रगटता ॥

अद्वय स्थितीनें म्या कां नसावें । परी तृप्तीनंतर ढेंकर येत स्वभावें ।
किंवा हरिगुण तैसेचि बरवे । आत्मारामा श्रवणकीर्तनें रमविती जे ॥
अन्य विषयविरति घडत । स्वानंदें अखंड तृप्ति देत ।
आपली गोडी वाढवी न करी विरक्त । हरिगुणप्रताप हा कळे हरिभक्तां ॥

## श्रीमद्भागवताच्या द्वादशस्कंधावरील द्वादश अभंग.

१

नारदाच्या उपदेशें । ग्रंथ आरंभिला व्यासें ॥ १ ॥
आदौ स्कंध तो प्रथम । उपोद्घात दावी नेम ॥ २ ॥
परीक्षितीजन्मकर्म । प्रायोपवेशी शुकागम ॥ ३ ॥
अध्याय एकोणीस ज्योती । राजप्रश्न शुकाप्रती ॥ ४ ॥

२

सर्ग विसर्ग तें स्थान । पोष कला उती जाण ॥ १ ॥
द्वितीय स्कंध दशाध्याय । संक्षेप वर्णन तें होय ॥ २ ॥
उती मन्वंतर । ईश कथा लय च्यार ॥ ३ ॥
मुक्ति ऐसे नव ज्योती । आश्रेयासी लक्षिताती ॥ ४ ॥

३

विदुरउद्धवसंगम । मैत्रेयासी तो उत्तम ॥ १ ॥
तेतिस अध्याय तृतीय । सर्वलक्षण उदय ॥ २ ॥
ब्रह्मांडसंभूती । क्षिति वराह धरी दंतीं ॥ ३ ॥
कर्दमपत्नी देवहूती । कपिल बोधी ह्मणे ज्योती ॥ ४ ॥

४

मनुवंश यज्ञ हरी । दक्ष प्रसूतीतें वरी ॥ १ ॥
विसर्ग चतुर्थी । एकतिस अध्यायातें कथी ॥ २ ॥
सती ध्रुव पृथुकथा । प्राचीन बर्ही यज्ञकर्ता ॥ ३ ॥
शंकर नारदप्रसादें । प्राचेतस ज्योती शुद्ध ॥ ४ ॥

५

प्रियव्रतवंशी भला । नाभीपुत्र वृषभ जाला ॥ १ ॥
पंचमीं वैकुंठ प्रियजय । सव्वीस अध्याय स्थान होय ॥ २ ॥

भरतकथा वंशी दीप । स्वर्गपाताळीं प्रताप ॥ ३ ॥
नरक स्थिति स्थळ कार्य । विश्वरूप ज्योतिमय ॥ ४ ॥

६

अजामिळ तरुनी जाय । नारायणवमा इंद्रराय ॥ १ ॥
षष्ठीं पोषण भक्ताचे । एकोणीस अध्यायानें साचे ॥ २ ॥
चित्रकेतू वृत्र झाला । शेष भक्त ज्ञानी भला ॥ ३ ॥
विष्णुव्रतें दितीपुत्र । मरुत ज्योती ते पवित्र ॥ ४ ॥

७

शिशुपाळ सायोज्यता । धर्मा नारद सांगता ॥ १ ॥
शुभाशुभ कर्मप्रती । पंधरा अध्यायीं हे उती ॥ २ ॥
हिरण्यकशिपु पुत्रा छळी । नरहरी प्रगटे ते काळीं ॥ ३ ॥
प्र्‍हाद सप्तमीं वर्णिला । धर्मनिर्णय ज्योती केला ॥ ४ ॥

८

स्वायंभुवा रक्षि यज्ञ । गज सोडविला सुज्ञ ॥ १ ॥
चोवीस अध्यायीं हा क्रम । चवदा मनुकथनप्रेम ॥ २ ॥
अमृतमथनीं अजित । कांसवरूप तें धरित ॥ ३ ॥
बळी पाताळीं वामन । मत्स्य झाला ज्योती म्हणे ॥ ४ ॥

९

सूर्यवंश सोमवंश । नाना कथा भरे रस ॥ १ ॥
अध्याय चोवीस नवम । ईशकथा गाती प्रेमें ॥ २ ॥
वैवस्वत मनुसुत । दक्ष इक्ष्वाकादि होत ॥ ३ ॥
ऐलवंशीं यदुकुळीं । ज्याति जन्मे वनमाळी ॥ ४ ॥

१०

भूमीभार हरावया । वासुदेव होत कार्या ॥ १ ॥
नव्वद अध्याय दशम । निग्रह तो होय नेम ॥ २ ॥
मथुरे जन्मुनी । क्रीडा केली वृंदावनीं ॥ ३ ॥
कंसांतक पांडवमित्र । ज्योति संहारी अमित्र ॥ ४ ॥

११

वसुदेव देवकीला । नारदें उपदेश केला ॥ १ ॥
एकादशी मुक्ति । एकतीस अध्यायीं निश्चिती ॥ २ ॥
कृष्णउद्धवसंवाद । आत्मविद्याविशारद ॥ ३
ब्रह्मशाप कुलक्षय । स्वयंसिद्ध ज्योतिर्मय ॥ ४ ॥

१२

कली धर्मातें निर्दळी । कलंकी विष्णु होत बळी ॥ १ ॥
आश्रयलक्षण द्वादशीं । तेरा अध्याय सारांशीं ॥ २ ॥
परीक्षित ब्रह्मभूत । शुकमुखें अमृत होत ॥ ३ ॥
वेदभाग मार्कंडेय । कथा सर्व ज्योतिर्मय ॥ ४ ॥

१३

नारायण विधि सांगे । लाभ नारदा तत्संगें ॥ १ ॥
भागवत संप्रदाय । परंपराक्रम होय ॥ २
व्यासा नारद बोलत । शुका व्यास पढवीत ॥ ३
ज्ञानदीप परीक्षिती । शोकहर्ता लाभे ज्योती ॥ ४ ॥

रामायणांतील "यःपृथ्वीभरवाराणायदिविजैः" या श्लोकावरील अभंगः—

भूमीभारनिवारणा । देवीं प्रार्थिला जो जाणा ॥ १ ॥
नारायण रघुकुळीं । अवतरे भूमंडळीं ॥
माया मनुष्य जो होत । सदा विनाशरहित ॥ ३ ॥
निर्मूळ राक्षसाचें कुळ । करुनि पावे निजमूळ ॥ ४ ॥
जीव पापहरा कीर्ती । ज्योती भजा प्रेमें चित्तीं ॥ ५ ॥

## स्फुट अभंग.

१

अहो वेदव्यास गुरु । तुम्हा माझा नमस्कारु ॥ १ ॥
माझें कल्याण करावें । मज दासपद द्यावें ॥ २ ॥
अहो आनंदनिधाना । कृष्णमूर्ति नारायणा ॥ ३ ॥
ज्योती म्हणे दीनोद्धारा । कृपासिंधू जी दातारा ॥ ४ ॥

२

पांडुरंग बापा कृपा करीं आतां ।
वारीं भवचिंता दयानिधे ॥ १ ॥
शरण आलों तुज सर्वस्व सद्भावें ।
अनुसरलों जीवें तुझे पायीं ॥ २ ॥
**ज्योती** म्हणे नंदकुमारा श्रीवरा ।
निर्मळ हो करा भक्तिमार्ग ॥ ३ ॥

**पद**

गुरुनें माझी मजपाशीं । दाविली काशी ॥ ध्रु० ॥
मजला पूर्वेहुनि काढिलें । पश्चिमपंथें चालविलें ।
एकवीस स्वर्गांवरती नेलें । मूळ तीर्थासी ॥ गुरुनें० ॥ १ ॥
अवघड पश्चिमेची वाट । बिकट त्रिकुटीचा घाट ।
श्रीहाट गोल्हाट औटपीठ । ओलांडुनि त्यासी ॥ गुरुनें० ॥ २ ॥
इडा पिंगला शुषुम्ना । गंगा सरस्वती यमुना ।
तिचे संगमीं स्नान करोनि । मुक्ति जिवनासी ॥ गुरुनें० ॥ ३ ॥
पाहिलें सहस्रदळ कमळ । तेथें मुनिजनाचा मेळ ।
हंस बाळ खेळे खेळ । केवळ संन्यासी ॥ गुरुनें० ॥ ४ ॥
ऐसी देहिंच यात्रा केली । कावड रामलिंगा वाहिली ।
**ज्योती** यानें खेप चुकविली । लक्ष चौऱ्याशींची ॥ गुरुनें० ॥ ५ ॥

ज्योतिपंतांची कविता—पद्यरचना ह्मटल्यास अधिक बरोबर होईल—अगदीं साधी आहे. साहित्य ग्रंथांत जिला 'काव्यप्रतिभा' ह्मटलें आहे, तिचा फारच थोडा अंश त्यांच्या कवितेंत आढळतो. अशा स्थितींत वामन, मुक्तेश्वर, आनंदतनय यांच्या वर्गांत त्यांची गणना न करितां दासोपंत, शिवकल्याण, वगैरे वेदांती कवींच्या वर्गांत त्यांना घातलें हंसराज पाहिजे हें उघड आहे. शेवटीं, ज्योतिपंतांची एक आरती यथे देऊन हें चरित्र पुरें करितों.

## आरती.

चित्ज्योतीची ज्योती अवतरतां धरणीं ।
धान्यांकुर रोमंचित आनंदें करुनी ॥
कलीकलंकित भाव त्यजुनी रत चरणीं ।
जय जगती गर्जतसे हरिनामस्मरणीं ॥ १ ॥
जयदेव जयजेव जय ज्योतीरूपा ।
महाभागवता तूं विद्वज्जनभूपा ॥ ध्रु० ॥
शुकमुख चंचुप्रहर फल भागवताचें ।
धारसुधारससरिता वंध्या निगमाचे ॥
सज्जन मज्जन जेथें यात्रा त्रिजगाची ॥
मुक्त मुमुक्षु विषयी धणि घे सुरसाची ॥ २ ॥
नरनारायण नरतनु आपलि दे ज्यास ।
विभाग भागवताचा वर दे गुरुव्यास ॥
वाचस्पति वाचाली कीर्तनिं सुविलास ।
पदकमलीं **सौमित्रा** भृंगासम वास ॥ ३ ॥

---

# दाजी कवि.

हे कवि सुमारें पाऊणशें वर्षांपूर्वीं सातारा प्रांतीं होऊन गेले. यांनीं सुमारें ५०००० कविता लिहिली असूनही, त्यांची किंवा त्यांच्या कवितेची महाराष्ट्रांत फारशी प्रसिद्धि नसावी, हें आश्चर्य होय. दाजी कवींची थोडीशी माहिती ‘ काव्यसंग्रह ’ मासिक पुस्तकांत प्रसिद्ध झाली आहे, तीच अल्पस्वल्प फेरफारानें, येथें उद्धृत केली आहे.

दाजी कवीचे मूळपुरुष मोरो गोपाळ गोळे हे थोरल्या बाजीराव पेशव्यांचे नातलग असून सन १७७६ सालीं वारले. त्यांचे चिरंजीव गंगाधरपंत यांजकडे कल्याणप्रांताची ‘ मजमू ’ असून, तेही

सन १७७९ त निवर्तले. त्यांचे चिरंजीव माधवराव हे, पेशवे अल्पवयी असल्यामुळें त्यांचे सन्निध पुरंदरास असत. यांना ग्रंथावलोकनाचा नाद असून, कवित्वाचीही अभिरुचि असे. ह्यांनीं लिहिलेलीं स्तोत्रें, साक्या, व रुक्मिणीस्वयंवरादि आख्यानें आहेत. ह्यांस इ. स. १७८० सालीं पुत्र झाला, तेच व्यंकटराव ऊर्फ दाजीमहाराज गोळे हे होत. त्यांच्या वयाच्या चौथ्या वर्षी त्यांच्या मातेनें सहगमन केलें. एवढ्या बालवयांत मातेचा अशा रीतीनें वियोग व्हावा, ही केवढी खेदाची गोष्ट ! आपली आई चालतां बोलतां एकाएकीं नाहींशी झालेली पाहून चार वर्षांच्या अर्भकाच्या अंतःकरणास ज्या भयंकर वेदना झाल्या असतील त्यांच्या नुसत्या कल्पनेनेंही अंगावर कांटा उभा राहतो, कंठ दाटून येतो आणि सतीच्या चालीसारख्या अमानुष्य चालीबद्दल द्वेष उत्पन्न होऊन, या एका बाबतींत तरी हल्लींचा काल फार चांगला, असे उद्गार तोंडावाटे आपोआप बाहेर पडतात. असो.

दाजी महाराज मोठे झाल्यावर पेशवाईंत त्यांनीं सरकारी कामें केलीं. गायकवाड, होळकर व निजाम यांकडून येणारा वार्षिक पैसा वसूल करण्याचें काम यांजकडे असे. त्यांजकडे ५०० स्वार, शिबंदी, हत्ती, घोडे, पालख्या इत्यादि खाजगी इतमामही असे. यशवंतराव होळकरानें पुणें शहर लुटलें तेव्हा दाजीबांस आपली सर्व दौलत सोडून पुण्यापासून दूर जावें लागलें. दुसऱ्या बाजीरावाच्या कारकीर्दींत त्यांनीं मक्त्याच्या मामलती केल्या. सन १८०० सालीं दाजिबांवर श्रीमंतांची गैरमर्जी झाल्यामुळें व नंतर लवकरच पेशवाईचा शेवट झाल्यामुळें दाजिबा आपल्या बंधूसह साताऱ्याजव-

ळील मर्ढे नावाच्या आपल्या इनाम गांवीं खाजगी व्यापार वगैरे करून राहूं लागले. ते दरसाल पंढरीस जात असत. तुकाराम, नामदेव, जनाबाई ह्यांचे अभंग त्यांना मुखोद्गत असत आणि त्यामुळेंच त्यांना स्वतंत्र कविता करण्याची स्फूर्ति झाली. यांच्या कवितेंत अभंगच पुष्कळ आहेत. तरी पण श्लोक, आरत्या, पदें, भुपाळ्या वगैरेची संख्याही कांहीं लहान नाहीं. सन १८३४ त दाजिबांनीं संन्यास घेतला तेव्हांपासून त्यांना दाजीमहाराज म्हणूं लागले. पांडुरंगाचे ठायीं त्यांची निस्सीम भक्ति असे. त्यांचें कवित्व भक्तिरसप्रधान आहे. दाजीमहाराजांचे वंशज मर्ढेकर गोळे यांचें साताऱ्यास जें घराणें आहे, त्याच्याच संग्रहीं ह्या कवीच्या कवितांच्या साठ वह्या असून प्रत्येक वहींत सरासरीनें १००० कविता आहे. म्हणजे सुमारें ६०००० कविता झाली. यापैकीं बराच भाग अप्पा व आबा या दोघां शिष्यांनीं लिहिलेला आहे. हे दोघे शिष्य शंभुमहादेव येथील राहणारे होते. " मनाचे श्लोक " नामक प्रस्तुत कवीचें एक प्रकरण काव्यसंग्रहांत छापलें आहे, तें सन १८३१ सालीं लिहून तयार झाले असा उल्लेख सांपडतो. सन १८५१ च्या सुमारास प्रस्तुत कवि समाधिस्थ झाले. त्यांची समाधि सातारा तालुक्यांत बोरखळ येथें कृष्णेच्या कांठीं आहे.

दाजी कवीच्या ' मनाच्या श्लोकां ' चा उल्लेख वर केला आहे, ते श्लोक एकंदर १३०० आहेत, परंतु त्यांपैकीं फक्त २८१ निवडक श्लोक काव्यसंग्रहकर्त्यांनीं प्रसिद्ध केले आहेत. " दाजी कवीची इतर कांहीं कविता आम्ही छापणार होतों, परंतु कांहीं कारणामुळें तो बेत तूर्त रहित केला आहे, " असें काव्यसंग्रहकार

म्हणतात. दाजी कवींचे जे २८१ श्लोक प्रसिद्ध झाले आहेत, तेवढ्यावरूनच जर त्यांच्या एकंदर कवितेची परीक्षा केली तर त्यांची रचना अगदीं सामान्य प्रतीची आहे, असेंच म्हणावें लागेल. त्यांची विद्वत्ता तर फारशी दिसत नाहींच, पण भाषाज्ञानही बेताचेंच दिसतें. परंतु त्यांच्या कवितेंतला भक्तिरसाचा ओघ एवढा दांडगा आहे, कीं त्यापुढें वरील दोषांची फारशी मातब्बरी नाहीं. मनाच्या श्लोकांची मूळ कल्पना श्रीसमर्थ रामदास स्वमींची. तिचें अनुकरण ' वामन ' ( वामन पंडित नव्हे ) नामक एका कवीनें पूर्वींच केलें होतें व त्यानंतर दाजी कवींनीं केलें. समर्थांच्या 'मनोबोधा' चे शेवटीं 'मनाचीं शतें ऐकतां दोप जाती । मतीमंद ते साधना योग्य होती । ' अशी फलश्रुति त्यांनीं सांगितली आहे. दाजी कवींनींही आपल्या श्लोकांचे शेवटीं " मनाचीं शतें सार्थ कीं ज्या नरातें । कळूं लागती भ्रांति नव्हे तयांतें " असें आश्वासन दिलें आहे. त्यांच्या श्लोकांपैकीं पंचवास निवडक श्लोक येथें उतरून घेतों---

रमामंदिरा सुंदरा चिद्विलासा । नमो तूजला सर्व भूताधिवासा ।
मती देइजे आपुले गूण गाया । कृपासागरा यादवा कृष्णराया ॥ १ ॥
मना शोधितां शोधितां सार पाहीं । हरीवांचुनी सार कोठेंच नाहीं ।
यदर्थीं तया ध्याउनीयां रहावें । दिसे दृश्य हें त्याचियानें पहावें ॥ २ ॥
मना संग रे सोडि या संसृतीचा । समूळी मना भ्रम वारीं मतीचा ।
भ्रमाच्या मुळें सूख स्वप्नीं असेना । हरीवांचुनी साच कोठे दिसेना ॥३॥
मना साच रे कृष्ण कैवल्यदाता । मना सशयो सोडिं र सोडिं आतां ।
यदर्थी जिवीं कृष्णरूपासि ध्यायीं । तुझा तूंचि रे कृष्ण होवोनि राहीं ॥४॥
मना कल्पना सर्व जाळोनि टाकीं । न ठेवी न ठेवीं कदा कर्मबाकी ।
अनन्यैकभावें स्मरोनी हरीसी । मना जागवीं जागवीं या जिवासी ॥ ५ ॥

मना जोंवरी तूझिया अर्थ गांठी । तुला मानिती धाकुलीं आणि मोठीं ।
फुका अर्थ जातांचि कोणि पुसेना । तुझें बोलणें कांहिं कोणा रुचेना ॥ ६ ॥
मना सोडिं रे वासना दन्यवाणी । प्रपचीं असे रे मना फार हानी ।
मना स्वप्निंहि लाभ कांहीं असेना । जयाचेनि रे कृष्ण जीवीं वसेना ॥ ७ ॥
मना साजिरा गोजिरा कृष्णराजा । तयाच्या पदीं सर्व विश्वास माझा ।
म्हणोनी तया सर्वभावें स्मरावें । तयाच्या पदीं सौख्य तें ऊमगावें ॥ ८ ॥
मना गोपिका कामयोगें निवाल्या । रतीच्या भरें रूप होवोनि ठेल्या ।
मना दैत्य हे वैरभावें पदातें । कसे पावले वारुनी आपदातें ॥ ९ ॥
मना जाहला पूर्ण विश्वास मातें । म्हणोनी जिवें लाविलें दृढ नातें ।
मना तूंहि रे क्षण त्यातें न सोडीं । चढोवाढिनें वाढवीं प्रेमगोडी ॥ १० ॥
मना रुक्मिणीवल्लभू सौख्यसिंधू । असा जाहला पाहिजे दृढ बोधू ।
नको नातळूं मानसा अन्य कर्मा । भजे आत्मया अच्युता सौख्यधामा ॥ ११ ॥
नको रे नको सेवुं तूं त्या नरातें । विचारें करोनी खरा पामरातें ।
जया अंतरीं सर्वदा अन्य धंदा । जिवीं नाठवी कृष्णपादारविंदा ॥ १२ ॥
चतुर्भुज चक्रायुधें चार हातीं । मना कुंडलें कर्णि त्या ढाल देती ।
असे रेखिला तीलकू कस्तुरीचा । जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा ॥ १३ ॥
मना हेमपीतांबर दिव्य कांसे । कशील्यावरी कांचि अत्यंत भासे ।
किरीटावरी तो तुरा मोतियांचा । जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा ॥ १४ ॥
गरूडासनीं शोभतें ध्यान पाहीं । जयाच्या पदीं न्यून कांहींच नाहीं ।
महाराज हा नाथ लोकत्रयाचा । जिवा लागला छंद त्याच्या रुपाचा ॥ १५ ॥
मना भाव हा पापतापा निवारी । मना भाव हा शोकसंताप वारी ।
मना भाव हा आवळितो हरीतें । पहा भावनेवांचुनी सर्व रीतें ॥ १६ ॥
मना सुख तें एक कृष्णासि ध्यातां । असे सार कीं हेंचि ग्रंथीं समस्तां ।
बहु हेंदरे शेंदरे देव नाना । कराया जना जाहले जे हनाना ॥ १७ ॥
खरा देव हा कृष्णदाता निजाचा । जया वर्णितां शीणली वेदवाचा ।
म्हणोनी मना गाइं ध्यायीं तयासी । मना होइं रे भागि त्याच्या सुखासी ॥१८॥
सदा सर्वदा राहिं एकांतवासी । न राहीं मना कांहिं मोहीं कुपाशीं ।
घडीनें घडी सार साधोनि घेई । मना पूर्ण आनंद होवोनि राहीं ॥ १९ ॥

नये रे मना कोणि कामास येथें । असे रे मना सर्व हें व्यर्थ नातें ।
नसे शांति रे मानसा अन्य ठायीं । जिवीं आपुल्या कृष्णरूपासि पाहीं ॥२०॥
मथीलीं मना सर्व शास्त्रें प्रमाणें । नसे रे नसे शाश्वतू अन्य पेणें ।
म्हणोनी मना धांव हा जीव घेतो । प्रकारेंकरोनी तुला शीकवितो ॥ २१ ॥
असे साच तें लाधलें कर्मयोगें । मना पाहृ पां वारिलीं सर्व सोगें ।
असावा तसा गोमटा योग आला । न सोडीं मना याजसाठीं तयाला ॥२२॥
करीं रे मना पान नामामृताचें । नको रे नको मत्त नाना मतांचें ।
मना कृष्णनामें गती या जिवासी । असे गूज रे ठाउकें त्या शिवासी ॥२३॥
करावी मना कासया व्यर्थ चिंता । महाराज राजेंद्र हा कृष्ण दाता ।
नुपेक्षी अनन्या कदां हा उदारू । असा कीर्तिचा ज्याचिया रे प्रकारू॥२४॥
महावीर गंभीर पूर्णप्रतापी । गुणें आगळा चिद्धन ज्ञानरूपी ।
नुपेक्षी अनन्या कदां हा उदारू । असा कीर्तिचा ज्याचिया रे प्रकारू॥२५॥

रामदासी मनाच्या श्लोकांचें हें अनुकरण असल्यामुळें, त्या श्लोकांतील बरेचसे शब्द व कल्पना ह्या श्लोकांत ठिकठिकाणीं दृष्टोत्पत्तीस याव्या यांत कांहीं आश्चर्य नाहीं. समर्थांनीं आपल्या अधिकारयुक्त धीरगंभीर वाणीनें जो उपदेश २०५ श्लोकांत केला आहे, तोच उपदेश करण्यास दाजी कवीनीं १३०० श्लोक रचिले आहेत.

---

## चिदंबरदास राजाराम.



पेशवाईच्या अखेरीस कर्नाटकांत गुर्लेहोसुर येथें **चिदंबर दीक्षित** नामक एक महान् सिद्ध पुरुष होऊन गेले, त्यांचे शिष्य हे चिदंबरदास राजाराम होत. त्यांची कविता पुष्कळच असून, ती बहुतेक सगळी अप्रसिद्ध व अप्रकाशित आहे. स्वतः राजराम बुवाच सांगतात कीं:—

एक लक्ष एकावन्न सहस्र । चारशें एक्याण्णव एकंदर ।
अभंग करविले सविस्तर । त्यामाजी चरित्रविस्तार लिहिला ॥

म्हणजे राजारामबुवांनीं नुसते अभंगच १५१४९१ लिहिले !!

महाराष्ट्रांत आजपर्यंत, श्रीपादश्रीवल्लभ, श्रीनृसिंहसरस्वती, श्रीमाणिक प्रभु, श्रीअक्कलकोटकर स्वामी वगैरे जे अनेक अवतारी सिद्ध पुरुष होऊन गेले त्यांच्याच मालिकेंत ओवण्याच्या योग्यतेचे श्रीचिदंबर दीक्षित हे महान् अवतारी पुरुष होत. यांचें जन्मस्थान मुरगोड. चिदंबरचरित्र नामक एका अर्वाचीन ओवीबद्ध ग्रंथांत यांचें विस्तृत चरित्र भाविकपणानें वर्णिलें असून, वर राजारामबुवांच्या ज्या लक्षावधि अभंगांचा उल्लेख केला आहे, ते सगळे अभंग चिदंबरचरित्रपरच असावेत हें वरील ओवींतील "चरित्रविस्तार" या शब्दांवरून उघड दिसतें. श्रीचिदंबर दीक्षित यांची थोडीशी कविता जरी उपलब्ध असती, तरी त्यांच्या विस्तृत व मनोरंजक चरित्राचा समावेश प्रस्तुत ग्रंथांत मी मोठ्या आनंदानें केला असता, परंतु 'कवि' या नात्यानें त्यांची प्रसिद्ध नसल्यामुळें, प्रस्तुत चरित्रविषयक राजारामबुवा यांचे गुरु या नात्यानें त्याचें अल्प मात्र चरित्र येथें देतों.

श्रीचिदंबर दीक्षितांचें घराणें मूळ विजापूर प्रांतांतील गोठे या गांवचें राहणारें. यांचें पूर्वीचें उपनांव जोशी. चिदंबर महाराजांचे तीर्थरूप मार्तंड मल्हार यांनीं एक सोमयाग केला, तेव्हांपासून त्यांना दीक्षित हें उपनाम प्राप्त झालें. नागेश भट्ट नामक एक शुक्ल यजुर्वेदीय कण्व शाखेचा देशस्थ ब्राह्मण फार सात्विक वृत्तीचा होता,

---

गुरुवार ता. ८ फेब्रुवारी १९१२ च्या 'मुमुक्षु' च्या अंकावरून.

त्याचा पुत्र शंकर भट्ट. या शंकरभट्टाचा पुत्र त्र्यंबक जोशी हा मोठा विद्वान् ज्योतिषी होऊन गेला. त्र्यंबक ज्योतिषी यांचे पुत्र मार्तंड दीक्षित हे चिदंबर महाराजांचे तीर्थरूप होत. त्यांना ऐन तारुण्यांतच कांहीं बलवत्तर पूर्वसंस्कारानें जोशीपणाचा कंटाळा येऊन ते श्रीक्षेत्र काशी येथें विद्याभ्यास व तपोवृद्धि करण्यास जाऊन राहिले. "**ब्राह्मणस्य तु देहोयं क्षुद्र कामाय नेष्यते**" ह्या श्लोकानें त्यांच्या मनास एकदां फार चटका लागला. कांहीं दिवसांनीं त्यांचें तपोबळ उदयास येऊन, मणिकर्णिकेच्या घाटावरील **स्वयंप्रकाश** नामक यथार्थ नामधारी सत्पुरुषांचें त्यांना दर्शन झालें. त्यांच्या सेवेस राहून गुरु-भक्तीचा संचय झाल्यावर, कांहीं तिखट परीक्षेच्या प्रकारानें हे मार्तंड जोशी, इतर शेंकडो शिष्यांपेक्षां, स्वामींच्या पसंतीस उतरले व त्यांनीं त्यांजवर पूर्ण अनुग्रह केला. नंतर त्यांच्या स्वतःच्या इच्छे-विरुद्ध, केवळ गुर्वाज्ञेमुळें, ते बेळगांव जिल्हयांत मुरगोड मुक्कामीं आपली मंडळी रहात होती तिकडे आले, आणि गृहस्थाश्रमी झाले. सौ. लक्ष्मीबाई नामक सुशील पत्नीसहवर्तमान ते प्रपंचपर-मार्थ यथासांग रीतीनें संपादूं लागले. ते चांगले योगशास्त्रसंपन्नही होते. लोकांत त्यांची मोठी मानमान्यता असे. गुर्वाज्ञेनुसार, वंशवृद्ध्यर्थ मार्तंड देवाचें क्षेत्र हिप्परगी येथें जाऊन त्यांनीं पुत्र-प्राप्त्यर्थ सहा महिने त्या आपल्या कुलदेवाची एकनिष्ठपणें आराधना केली. तेव्हां " दक्षिणप्रांतीं आकाश चिदंबर नामक माझें स्थान आहे तेथें जाऊन अनुष्ठान कर, " असा दृष्टांत त्यांस झाला. त्याप्रमाणें तेथें ते सहकुटुंब जाऊन बारा वर्षें राहिले. ते स्वतः केवळ निष्काम असे एकांतिक भक्त होते. गुरुवचनप्रतिपालनाचे पुण्य

ईनें अनुष्ठानान्तीं त्यांस, भगवान् चिदंबरांनीं ह्मणजे प्रत्यक्ष शंकरानींच दर्शन देऊन " मीच तुमचा पुत्र होऊन येतों, निर्भय असा, " असा आशीर्वाद दिला व त्यांच्या मस्तकीं वरद हस्त ठेवून ते गुप्त झाले. आनंदपूर्ण चित्तानें हें भाग्यवान् दांपत्य पुनः मुरगोडास आलें; आणि लवकरच साध्वी लक्ष्मीबाई गर्भवती झाल्या. मार्तंड दीक्षितांनीं मुरगोडाहून एकदीड कोसाचे अंतरावर असलेल्या सोगळ ( सुगल ) नामक पुण्यस्थलीं जाऊन ब्रह्मतेजोवृद्धीसाटीं तीन गायत्री पुरश्चरणें केलीं. पूर्ण नऊ मास भरतांच लक्ष्मीबाई प्रसूत होऊन त्यांस पुत्ररत्न झालें. तेच भगवान् **चिदंबर दीक्षित** होत. शके १६८० कार्तिक वद्य षष्ठी, सूर्योदयानंतर १० घटकांनीं मकरलग्नीं त्यांचें जन्म झालें.

दीक्षित महाराजांचें पुढील चरित्र ज्यांनीं प्रत्यक्ष पाहून वर्णिलें आहे त्यांपैकीं अब्बूनाना ( कोंकणस्थ ब्राह्मण ), राजाराम महाराज ( भाबूळगांवचे पाटील व प्रस्तुत चरित्रनायक ) व शिवशास्त्री ( दक्षिणेकडील तैलंगी ब्राह्मण ) हे तीन लेखक मुख्य होत.

चिदंबरमहाराजांच्या जन्मकालीं जे अनेक अलौकिक चमत्कार घडून आले त्यांची सविस्तर हकीकत देण्याचें हें स्थल नव्हे. राजारामबुवांनीं चिदंबरावतारोद्देश येणेंप्रमाणें सांगितला आहेः—

१ यांचा चिदंबरचरित्रात्मक ग्रंथ श्लोक, आर्या वगैरे वृत्तांत असून तो फारच रसाळ आहे. २ यांनीं चिदंबरचरित्रावर लक्षावधि अभंग लिहिल्याचा उल्लेख पूर्वी आलाच आहे. ३ यांचे संस्कृत श्लोकबद्ध लहान मोठे ग्रंथ आहेत. या तीन्ही कवींच्या कवितेचा एक सहस्रांशही अद्याप छापून प्रसिद्ध झालेला नाहीं.

अभंग

मागें झाले फार नाना अवतार । ब्राह्मण आचार घडला नाहीं ॥ १ ॥
वामनावतारीं ब्राह्मणाचे कुळीं । घातला पाताळीं बळी ऐसा ॥ २ ॥
विप्रकुळीं झाला असे परशुराम । क्षत्रियाचा धर्म सर्व केला ॥ ३ ॥
पृथिवी दानासी दिली ब्राह्मणासी । समाधान त्यासी झालें नाहीं ॥ ४ ॥
भृगूनें मारिली लात महाकोपें । भूषण अद्यापि वागवीत ॥ ५ ॥
कृष्ण अवतारीं मागूं गेले अन्न । कोपोनि ब्राह्मण निंदिताती ॥ ६ ॥
ह्मणतो याचे भणें आलों नदीतटीं । येथें आमुची पाठी पुरविली ॥ ७ ॥
ऐसे नानापरी करिती आचार । ह्मणे मी अवतार घेतों पुढें ॥ ८ ॥
**दास** ह्मणे ऐसे अनंत प्रकार । ह्मणोनि चिदंबर विप्र झाला ॥ ९ ॥

२

बहुत कठिण कली हा दुर्धर । भ्रष्टवी आचार चहूं वर्ण ॥ १ ॥
मुख्य वर्ण तोही आचार लोपला । इतर यातीला पुसे कवण ॥ २ ॥
वर्ण आश्रमाचा झाला कर्मलोप । कलि महापाप वर्ततसे ॥ ३ ॥
त्यालागीं अवतार धरिला चिदंबर । ब्राह्मण आचार अंगें वर्ते ॥ ४ ॥
अनंत जनांच्या उद्धारालागून । मूर्ति हे सगुण प्रगटली ॥ ५ ॥

चिदंबर दीक्षितांनीं बालपणींच दाखविलेले अनेक चमत्कार पाहून व ऐकून, हा अवतारी पुरुष आहे अशा समजुतीनें शेंकडो लोक यांच्या दर्शनार्थ येऊं लागले, तेव्हां आईबापांनीं—

गुप्तरूपें देवा असावें आपण । सुख तें संपूर्ण भोगूं आह्मी ॥
नाहीं तरी यात्रा मिळतसे दाटी । मग तुझी भेटी दुर्लभ कीं ॥

अशी त्यांस विनंति केली. आपण देह ठेवीपर्यंत मुलानें आपला अवतारीपणा प्रगट करूं नये अशी मार्तंड दीक्षितांची इच्छा व आज्ञा होती व मुलानेंही ती बिनचूक पाळिली. मार्तंड दीक्षितांचें देहावसान शके १७१४ त झालें, तेव्हांपासून चिदंबरनाथांचें देवपण

लोकांत प्रगट झालें. ब्रह्मचर्याश्रम पूर्ण होतांच चिदंबर गृहस्थाश्रमीं झाले. सरस्वती व सावित्री नांवांच्या दोन बायका त्यांना होत्या. सहा मुलगे व एक मुलगी अशीं सात अपत्यें त्यांस झालीं. मुरगोड येथें मोठी पाठशाळा स्थापन करून अनेक प्रकारच्या लीला व ज्ञान दान करीत देशोद्धार व धर्मसेवा करीत कांहीं वर्षे घालविल्या-वर तल्लूरकर देसायाच्या कांहीं प्रकरणावरून, मुरगोड येथें एक ब्रह्महत्या झाल्यामुळें, तत्काळ मुरगोडचें ठाणें उठवून चिदंबरमहाराज तेथून बारा मैलांवर मलप्रभेच्या कांठीं जाऊन राहिले. त्यासच **गुर्लहोसूर** ( कानडी ‘ गळ हास उरु ’ गुरुरायाचें नवें गांव ) ह्मणतात. पेशवे व रास्ते, गोखले वगैरे त्यांचे सरदार चिदंबर दीक्षितांच्या सेवेस येऊन रहात असत. त्यांनीं आपणासाठीं बांधलेले मोठमोठे वाडे अद्यापहि तेथें दिसतात. निपाणीकर, नरगुंदकर, वगैरे संस्थानिकही चिदंबर प्रभूचे एकनिष्ठ शिष्यभावानें वागणारे सेवक झाले.

अशा या महासिद्ध **चिदंबर** दीक्षितांचे **राजाराम बुवा** हे शिष्य होत. त्यांनीं आपलें थोडेंसें चरित्र **‘निजात्मबोध’** ग्रंथाच्या शेवटच्या प्रकरणांत दिले आहे तें येणेंप्रमाणें:—

ओव्या

जन्म गंगा गोदावरीतीरीं । रजपूत रघुवंशीं क्षत्रियाचे उदरीं ।
माता पिता वसती बाभुळगांव नगरीं । पूर्व जन्मभूमि असे ॥
तपोनिधि पंचाग्निसाधनी । द्वारकादास बैरागीबावा तया स्थानीं ।
वडिलीं गुरू करविला बाळपणीं । भागवतश्रवणीं जातसें तेथें ॥
ध्रुवासी भेटे देव पांचवे वर्षीं । ऐकोनि पश्चात्ताप झाला मजसी ॥
वय तेव्हां होतें अष्टवर्षी । झुरें चित्तासी निशिदिनीं ॥

नित्य प्रातःकाळीं जातसें स्नानासी । तीरीं शिवालयीं ईश्वरपूजनासी ।
तेथें मूर्ति देखिली दिगंबर ऐसी । ते संज्ञेसी सांगत ॥
मौनेंचि हातें दावितसे खूण । तेव्हां गंध लाविलें मुख प्रक्षाळून ।
चरणावरी मस्तक ठेवून । आलों जाण घरासी ॥
मातेलागीं सांगोनि त्यासी । बोलावूं गेलों भोजनासी ।
तों तो गुप्त त्या ठायासी । न पडे दृष्टीसी धुंडाळितां ॥
तणें अधिकचि वेध लागला चित्तासी । सगुण देव कधीं भेटेल मजसी ।
भाषण करील आनंदेंसी । डोहळे मनासी नित्य ऐसे ॥
मग गुरु आत्मज्ञानासि बाळेश्वर । तेणें ज्ञान उपदेशिलें प्रखर ।
मजसी कल्पना असे थोर । सगुण साक्षात्कार व्हावा आधीं ॥
तेणें सांगितलें कृपावचन । ईश्वर इच्छा पुरवील जाण ।
त्याच्या कृपेंकरून । भेटला सगुण चिदंबर ॥

यावरून, राजारामबुवांची परमार्थाकडे जन्मतःच प्रवृत्ति होती हें उघड दिसतें. क्षत्रियकुलोत्पन्न बालकास लहानपणींच परमार्थाची आवड उत्पन्न व्हावी, हें त्याच्या पूर्वजन्मींच्या सुकृताचें फल होय. बालपणीं द्वारकादास बैरागी, पुढें बाळेश्वर व शेवटीं चिदंबर दीक्षित असे तीन गुरु राजाराम बुवांनीं केले. चिदंबर दीक्षितांच्या दर्शनाचा व साक्षात्काराचा प्रसंग राजारामबुवांनीं येणेंप्रमाणें वर्णिला आहे:—

मज ऐसा पतित कोणी । दुजा नसे त्रिभुवनीं ।
चिदंबरा ऐसा पावन धनी । ब्रह्मांड भुवनीं दुजा नाहीं ॥
दूरदेशीं शत योजनें जाण । बळें बोलाविलें दृष्टांत देऊन ।
सप्त दिवस उपोषण करवून । अनुग्रह आपण करीतसे ॥
स्वप्नीं बसवोनि अंकावरी । मज हृदयीं आलिंगोनि धरी ।
श्रवणीं मंत्रोपदेश करी । बहुतापरी समजाविलें ॥
शर्करा नारिकेळ पात्र भरोनी । प्रसाद भक्षविला पोट भरोनी ।

आपुला प्रताप दावी बोलुनी । ईश्वरत्व नयनीं दाविलें ॥
जागृत जाल्या जाण । मुखीं प्रसादाची दावी खूण ।
तृप्ति जैसें झालें भोजन । मंत्रस्मरण आनंदयुक्त ॥
त्यावरी समक्ष दर्शन । दुरोनि पाहतां जवळी ये धावून ।
आनंदें बोले कृपा करून । झाला प्रसन्न चिदंबर ॥
ह्मणे काय इच्छा मानसीं । तेचि मागावें मजपाशीं ।
मागून घेतों ईश्वरासी । देतों तुजसी याचि वेळे ॥
ऐसा प्रसन्न होवोनि चिदंबर । बळें मागावें ह्मणे ईश्वर ।
यात्रा जन पाहती लहानथोर । बोले चिदंबर सर्वां देखतां ॥
एकांत बोलावें माझिया चित्तीं । मग बोलावूनी मज एकांतीं ।
मागावें ह्मणतसे कृपामूर्ति । अनुभवप्राप्ति करीतसे ॥
ऐसा प्रसन्न होवोनि चिदंबर । मागितले ते दिले वर ।
करोनि ठेविले दृष्टांतीं आज्ञाधार । निवविलें अंतर स्वामिरायें ॥

चिदंबर महाराजांनीं आपणास काव्यस्फूर्ति देऊळ आपल्याकडून काव्यलेखन कसें करविलें हें राजारामबुवा सांगतातः—

जयंतिकथा[1] विस्तारपूर्वक । अवतारीं अभंगीं चरित्र देख ।
पूर्वीं करोनि ठेविला लेख । अभंगसुख स्वामिसी बहुत ॥
दृष्टांतीं स्वमुखें अभंग सांगून । वरप्रसाद देउनियां जाण ।
अभंग करविले लेखन । झाला प्रसन्न चिदंबर ॥
एक लक्ष एकावन्न सहस्र । चारशें एक्याण्णव एकंदर ।
अभंग करविले सविस्तर । त्यामाजी चरित्र[2]विस्तार लिहिला सर्व ॥
म्हणोनि ग्रंथी[3] संकलित सांगत । चरित्रविस्तार असे बहुत ।
जैसें वाजविल्यावीण वाजत । मज बोलवीत चिदंबर त्यापरी ॥
येथें नसे कवित्वलाघव । मज बोलवी देवाधिदेव ।
अंध मी अज्ञानस्वभाव । हृदयीं प्रकटे देव चिदंबर ॥

पुढें राजारामबुवा आणखी चमत्कार सांगतातः—

---

१ चिदंबरजयंतिकथा. २ चिदंबरचरित्र ३ निजात्मबोध ग्रंथांत.

आज्ञा करोनियां मजसी । नग्न शस्त्रें वाहवी जोडयावरी तुळसी ।
नवा जोडा करवी प्रतिवर्षीं । प्रतीती करोनि एसी वर्तवी बळें ॥

\+ + + +

भोगमूर्ति बैसवोनि अश्वावरी । छत्रचामर नग्न शस्त्रेंसहित स्वारी ।
जोडा बांधोनि हृदयावरी । देशदेशांतरीं पाठविलें ॥
निशाणपातका भजनमंडळीसहित । प्रयाग काशी गंगा करित ।
मथुरा वृन्दावन दिल्ली कुरुक्षेत्रतीर्थ । जोडा मिरवीत आपुला ॥
लोमहर्ष जागा रेवाळेश्वर । पर्वत भेटे चालती पाण्यावर ।
भोगमूर्ति देखोनी समोर । चालोनि येती सत्वर यात्राजन पाहती ॥
ज्वालामुखी देवीसी जावोनी । यात्रा करवुनी आणिलें आपुले स्थानीं ।
अवतारप्रतापकरणी । उघड नयनीं दावीतसे ॥

यावरून चिदंबरमहाराजांची राजारामबुवांवर मोठी कृपा होती हें उघड दिसतें. स्वतः राजारामबुवांनींही अनेक चमत्कार केले होते असें सांगतात. यासंबंधानें, राजारामबुवाकृत 'पंचपदी अभंग' नामक पुस्तकाच्या प्रस्तावनेंत प्रकाशकानीं म्हटलें आहेः—' अद्भुत चमत्कार हे सिद्धीच्या योगें होत असतात आणि सिद्धि म्हटल्या म्हणजे ज्ञानाला त्या प्रतिबंधक होत असें म्हणून कांहीं ज्ञानी लोक व त्यांचे अनुयायी सिद्धींची व त्या सिद्धांची थोडीशी अवहेलना करीत असतात. सिद्धी ज्ञानाला प्रतिबंधक आहेत ही गोष्ट खरी पण त्या कोणाला ? ज्याचें ज्ञान अपरिपक्क असून देहात्मभाव पूर्णपणें नष्ट झालेला नाहीं अशा कच्च्या मनुष्याला त्या बाधक होतील. निःसंदेह झालेल्या पूर्ण ब्रह्मनिष्ठास तपानें प्राप्त झालेल्या सिद्धी ह्या लोककल्याणार्थ उपयोगी पडून, त्यांपासून जनतेचें पुष्कळ हित होतें. अवतारिक पुरुषांना तर सिद्धि या नैस-

र्गिकच असतात. वास्तविक पाहतां थोर महात्म्याच्या या अमानुष सामर्थ्यास ' सिद्धी ' ह्मणणेंच अयोग्य आहे. उज्ज्वल उपासनेनें, अपेक्षा नसतांही प्राप्त झालेलें व होणारें हें " अनंताशीं साधर्म्य" होय. प्राकृत महत्त्वांकाक्षा अंतरीं धरून केलेल्या योगाभ्यासानें प्राप्त होणाऱ्या योगसिद्धि व निष्काम पण उत्कट प्रेमळ उपासनेनें प्राप्त होणारें ' अनंताशीं साधर्म्य ' अथवा आत्मसिद्धि अगर ईश्वरप्रसादानें प्राप्त होणाऱ्या ' देवसिद्धि ' यांमध्यें महदंतर आहे. चांगदेवाचे ' चमत्कार' व तुकाराम रामदासादिकांच्या ' लीला ' यांचें स्वरूप बहिर्दृष्टीस एकच दिसतें, पण त्या त्या महात्म्याच्या योग्यतेंत जमीन अस्मानाचें अंतर आहे."

वरील विवेचनांत पुष्कळ तथ्यांश आहे यांत संशय नाहीं. अवतारी पुरुषांचे चमत्कार, चांगदेवासारख्या ज्ञानशून्य हठयोग्याचे चमत्कार, तुकारामादि संतांचे चमत्कार व गारुड्याचे चमत्कार एकाच स्वरूपाचे किंवा एकाच कारणानें घडणारे नाहींत. श्रीराम, कृष्ण, येशू ख्रिस्त यांस सिद्धींची अनुकुलता निसर्गतःच होती; चांगदेवासारख्यानीं ती योगबलानें प्राप्त करून घेतली होती व ज्ञानदेव, एकनाथ, तुकाराम, रामदास इत्यादि ज्ञानी भक्तांस, त्यांच्या उत्कट उपासनेच्या योगानें सहज साध्य झाली होती. असो.

राजारामबुवांचा जन्ममृत्युकाल उपलब्ध नाहीं. त्यांचे वंशज वगैरे कोठें आहेत कीं काय याचीही माहिती मिळाली नाहीं. त्यांच्या स्वतःच्याच शब्दांत वर दिलें, तेवढेंच काय तें त्यांचें चरित्र उपलब्ध आहे. त्यांनीं लिहिलेल्या सहस्त्रावधि अभंगांशिवाय, निजात्मबोध, ब्रम्हानंदलहरी, महानुभाव, ज्ञानगर्भ, ब्रह्मानुभव, सद्गुरूपदेश, गुरु-

गम्यठेव, अद्वैतसार हे त्यांचे ग्रंथ बेळगांव येथील ' रामतत्त्वप्रकाश ' छापखान्याच्या मालकांनीं प्रकाशित केले आहेत. राजारामबुवा जरी मोठे व्युत्पन्न नव्हते, तरी त्यांची ग्रंथरचना स्वानुभवयुक्त असल्यामुळें, तींत एक प्रकारच्या अधिकारीपणाचें तेज ठिकठिकाणीं चमकत असलेलें आढळून येतें. आतां त्यांच्या ग्रंथांतले थोडेसे वेंचे येथें देतों.

ज्ञानहीनाचें वेदांतज्ञानः—

वेदांत शास्त्र गोष्टी ऐकतां । वाटे समाधान बहुत चित्ता ।
तेथोनियां उठोनि जातां । जडे अहंता देहभाव ॥ ३ ॥
ज्ञान सांगावया येतें बहुतांपरी । मन निवांत न राहे क्षणभरी ।
विषय हिंडे दारोदारीं । साक्ष माझ्या अंतरीं येतसे ॥ ४ ॥
स्वामी तों ह्मणती तूंचि ब्रह्म । परी न जाय माझा देहभ्रम ।
न कळे निजस्वरूपाचें वर्म । कोण कर्म आड आलें ॥ ५ ॥
मी ब्रह्म ऐसें असतां । ब्रह्मासी भ्रम कैसेनि चित्ता ।
अंधकारें गिळिला सविता । नवलाई तेचि वाटे ॥ ६ ॥

\+ + + +

जोंवरी विषयासी न विटे मन । तंव कैसें होय वा उन्मन ।
वायां सांगे शब्दज्ञान । नव्हे समाधान कल्पांतीं ॥ ८ ॥
जंव विरक्ति मनासी नये हाता । चित्तासी नये नैराश्यता ।
वेदांत शास्त्र निर्माणकर्ता । जरी जाला विधाता न पवे सुख ॥ ९ ॥
मन इंद्रियें विषयासाठीं । आशा लोभ धरोनि पोटीं ।
कामक्रोधादि महा हटी । लिंगदेह गांठी वासनामय ॥ १० ॥
असुर दोनी रजतम । हेचि पाडिती देहभ्रम ।
हेंचि आड आलें खोटें कर्म । न कळे वर्म सत्वाचें ॥ ११ ॥
जाणत असतां आपणासी । देह अहंभावाच्या पडे फांसीं ।
जैसा राहू आड सूर्यासी । तैसी गती आत्मयासी जाणिजे ॥ १२ ॥

मन निवांत राहेल कैसें । मदमत्सरादि दुराशा विषय पिसे ।
ब्रह्मरूप स्वतःसिद्ध असे । पडळ येतसे मायेचें ॥ १३ ॥
मम माया दुरत्यया । श्रीकृष्ण सांगे धनंजया ।
मज शरण येतां माझी माया । न बाधे तया सद्भक्ता ॥ १४ ॥
साधकासी विघ्न थोर । करिती मन इंद्रिय विषयपर ।
न सुटे देह अहंकार । येथें बलात्कार कोणाचा ॥ १५ ॥
ऐसी कल्पना येईल जरी । तरी एकें बाधा सांगतों परी ।
कामक्रोध हे दोन्ही वैरी । आपुले अंतरीं असताती ॥ १६ ॥
कामक्रोध मांग महाहटी । ऋषिमुनि तप करिताति कोटी ।
या दोघांसि पाहतां दृष्टी । तपश्चर्या कोटी बुडविती ॥ १७ ॥
ब्रम्ह्यासि लाविती कन्येपाठीं । विष्णु वेडावे वृन्देसाठीं ।
शिवाची फिटे लंगोटी । मोहिनी दृष्टी पाहतां ॥ १८ ॥

\+ + + +

यासी म्हणती उपाय कोण । तरी नामस्मरण संकीर्तन ।
प्रेमयुक्त सद्भावें भजन । श्रीगुरुचरण सेवावे ॥ २० ॥

× × × ×

एक ईश्वर सर्वांचे हृदयीं । हें मुख्य भक्तीचें लक्षण पाहीं ।
ज्ञान विज्ञान लागे त्याचे पायीं । ब्रह्मसुख अक्षयी जाणिजे ॥ २६ ॥
श्रवण मनन निदिध्यास । निशिदिनीं पाहिजे हा अभ्यास ।
क्षणभरी बैसे श्रवणास । अहंता अंगास जडतसे ॥ २७ ॥
विषयकामना सोडोनि चित्तीं । भजन करावें अतिप्रीती ।
सदा धरावी सत्संगति । पालटे मती दुर्जनाची ॥ २८ ॥

**निजात्मबोध, प्रकरण ३**

ब्रम्हस्वरूपवर्णनः—

जेसें भिंतीवेगळें चित्र न दिसे । चित्र पाहतां भिंतचि दिसे ।
अज्ञानासी भ्रम भासे । सज्ञानासी असे स्वरूप एक ॥ ७ ॥

सूर्यापासोनि दिसती किरणें । परी तीं सूर्यासि वेगळीं न होती जाणे ।
तैसें जग ब्रह्म पूर्ण । कळे खूण अनुभवेंसी ॥ ८ ॥
नातरी औदुंबरासी फळें असंख्यात । एकेक फळामाजी जीव असंख्यात ।
ऐसीं प्रतिवर्षी फळें येत । औदुंबर निश्चित एकचि तें ॥ ९ ॥
तैसें ब्रह्मापोटीं ब्रह्मांडें अनेक । एकेक ब्रह्मांडीं जीव असंख्य ।
त्या ब्रह्मांडांसी संख्या नसे देख । ब्रह्मचि एक अनेकामाजी ॥ १० ॥

शब्दज्ञान्यांचें वर्णन:——

शब्दज्ञानें ब्रह्म न होती । सद्गुरुकृपवीण अनुभवप्राप्ती ।
ऐसें जे वाचाळ बोलती । सुख कल्पांतीं न मिळे त्यांसी ॥
जैसा जंबुक नीळकुंडामाजी पडला । निळेचा रंग देहावरी आला ।
तो ह्मणे सर्व वनचरांला । राज्यपद मला तुम्हांमाजी ॥
वनचरें देखोनि त्याच्या रंगासी । नकळे ह्मणती हा कोण जाती कैसी ।
राहती त्याच्या आज्ञेसी । होतां निशी मध्यरात्रीं ॥
तये वळीं भुंकती जंबुक । यासी नावरे जातिस्वभाव देख ।
जंबुक राजें केला भुंक । आपुले सुखें भुंकों लागे ॥
तों वनचरें म्हणती कोल्ह्यासी । स्वभावें परीक्षा कळली आम्हांसी ।
बरें ताडण करोनि त्यासी । अतिदु:खेंसी प्राण सोडी ॥
तैसे शब्दज्ञानी नर । वायां धरिती ज्ञान–अहंकार ।
दु:ख पडतां देहावर । दु:खें अपार शोक भोगिती ॥

## अभंग

श्वानसूकर ते किडे । जितके फिरती दृष्टीपुढें ॥ १ ॥
तितुके उद्धरती देख । जीवजंतु ते मशक ॥ २ ॥
अणू रेणू पक्षीकुळ । त्यांच्या उद्धाराचा वेळ ॥ ३ ॥
दास म्हणे महिमा थोर । जेथें असे चिदंबर ॥ ४ ॥

२

प्रत्यक्ष येवोनी राहावें भजनीं । तेव्हां माझे मनीं समाधान ॥ १ ॥
प्रसन्न होवोनी देईं वरदान । ऐसें हें भजन चालवावें ॥ २ ॥

कलिमाजी भक्त जाहले ते अपार । होतासी तत्पर भजनीं त्यांच्या ॥ ३ ॥
मजविषयीं कां हो करितां आळस । तरी भजनास कां लाविलें ॥ ४ ॥
दास म्हणे जैसें लाविलें भजना । तैसी ही वासना पुरवावी ॥ ५ ॥

३

बहुत होत आले भक्तांचे अवतार । केलासे विस्तार नानापरी ॥ १ ॥
ग्रंथ हे अभंग ठेविले लिहून । न करवे जाण लेखा त्यांची ॥ २ ॥
बोलिले जे बोल त्याहावे ते किती । विचारुनी चित्तीं उमजावें ॥ ३ ॥
देव भक्त होती नाना अवतार । त्या रीती विस्तार वाढतसे ॥ ४ ॥
दास म्हणे चित्तीं पहा विचारुनी । अवतार जनीं चिदंबर ॥ ५ ॥
सूर्य नारायणा प्रार्थी मी तुम्हासी । आम्ही सूर्यवंशी म्हणवितों ॥ १ ॥
आपुल्या वंशींचे पुरे देवासाटीं । येऊं द्यावी पोटीं करुणा त्याची ॥ २ ॥
अवतार ब्राह्मण दावीं तीं पाउलें । जेणें तोषविलें तुह्मां देवा ॥ ३ ॥
चिदंबरासाठीं दास तो प्रार्थितो । भानुसी विनवितो कोटी वेळां ॥ ४ ॥

४

चिदंबरनाम सौभाग्य संपूर्ण । सकळ आभरण नाम तुझें ॥ १ ॥
पांडुरंग नाम कंचुकी मी ल्याली । पीतांबर नेसली रामनाम ॥ २ ॥
केशवाचें नाम प्रकट मंगळसूत्र । पुतळ्यांचा हार नारायण ॥ ३ ॥
माधवाचें नाम पदक जडित । गोविंद ताईत मोतीमाळा ॥ ४ ॥
विष्णु तुझें नाम मोत्यांचा कठाण । सरी मधुसूदन जंबूमाळा ॥ ५ ॥
त्रिविक्रम नाम शोभे मोहनमाळा । चंद्रहार गळां वामन नाम ॥ ६ ॥
श्रीधर हें नाम रत्नजडित काप । बाळ्या ते अमूप हृषीकेशी ॥ ७ ॥
पद्मनाभ नाम मोत्यांची बुगडी । भोकरांची जोडी दामोदर ॥ ८ ॥
संकर्षण नाम वांक्या बाजूबंद । विराजत छंद वासुदेव ॥ ९ ॥
प्रद्युम्न नाम रवींसम चूडा । पाटल्यांचा जोडा अनिरुद्ध ॥ १० ॥
पुरुषोत्तम नाम जव हे गगनीं । चंद्रसूर्य दोन्ही अधोक्षज ॥ ११ ॥
नरसिंह हें नाम राखडी केवडा । शोभे मूदजोडा अच्युत नाम ॥ १२ ॥
जनार्दन नाम माजपट्टाभरण । सांखळ्या तें जाण उपेंद्र पैं ॥ १३ ॥

हरि तुझें नाम दांडा मोतियांचा । श्रीकृष्ण नामाचा नाकीं मोतीं ॥ १४ ॥
सर्वेश्वर नाम दुल्लड शोभत । कुंकुम अनंत दास म्हणे ॥ १५ ॥

---

# दयाळनाथ.

'महाराष्ट्र कविचरित्राच्या' पहिल्या भागांत, वैदर्भस्थ संतकवि देवनाथ महाराज यांचें चरित्र दिलें आहे, त्यांचे, दयाळनाथ हे शिष्य होत. यांची बरीचशी कविता रा. रा. अच्युत सीताराम साठे एम्. ए. बी एल्. या विद्वान् गृहस्थांनीं व्यवस्थित रीतीनें छापून प्रसिद्ध केली आहे. तिच्या प्रस्तावनेंत दयाळनाथांचें जें चरित्र त्यांनीं दिलें आहे, त्यांतील माहितीच्या आधारानें प्रस्तुत संक्षिप्त चरित्र लेख मी लिहिला आहे.

देवनाथ महाराजांचे प्रमुख शिष्य दोन—एक दयाळनाथ व दुसरे रामराव* काळी. देवनाथांनीं खुद्द आपल्या आवडत्या सुरजी अंजनगांवाच्या जन्मभूमींतील मठाचें आधिपत्य दयाळनाथ यांजकडेच सोंपविलें होतें. दयाळनाथांचा जन्म शके १७१०

---

* हे आश्वलायन ब्राह्मण, एलिचपुरचे रहिवासी. यांचें घराणें फार जुनाट व नामांकित आहे. रामराव बाबांचे आजे त्रिंबकराय ऊर्फ तिमाराय काळी हे मोगलाईच्या काळीं सुप्रसिद्ध एलिचपूरकर नवाब इस्मायलखान पन्नी यांच्याकडे होते. श्रीक्षेत्र रामटेक जि. नागपूर येथें, रामराव काळी यांचे चिरंजीव पांडुरंग-नाथ काळी यांचे शिष्य रा. सदाशिवराव साने हे वृद्ध व विद्वान् गृहस्थ राहतात. (इ. स. १९१३) या काळी घराण्याची विशेष माहिती वाचकांस 'दयाळनाथांची कविता' या पुस्तकाच्या प्रस्तावनेंत सांपडेल.

कार्तिक शुद्ध १४ ( इ. स. १७८८ ) या दिवशीं झाला; व शके १७५८ ( इ. स. १८३६ ) सालीं दक्षिण हैदराबाद येथें ते समाधिस्थ झाले. वऱ्हाडांत दर्यापूरपासून सात कोसांवर मुर्तिझापूर हें तालुक्याचें ठिकाण आहे तेथें नाथांचे वडील राहात असत. हे मौतसगोत्री यजुर्वेदी ब्राह्मण. त्यांची सर्व संतति अल्पायुषी मरूं लागली, तेव्हां त्यांनीं आपलें शेवटलें अपत्य—हरि नांवाचा मुलगा—पांच वर्षांचें होतांच देवनाथ महाराजांच्या चरणीं वाहिलें. हरि रूपानें फार सुंदर होता व पुढें त्याच्या अंतःकरणाचा दयाळूपणा त्याचे आजेगुरु—देवनाथांचे गुरु—श्रीगोविंदनाथ यांच्या निदर्शनास आल्यावरून ते त्यास ' दयाळया' या नांवानें संबोधूं लागले. मुलांच्या अल्पायुषीपणानें गांजलेल्या बापानें, साधूच्या पायांवर लेंकरूं वाहिलें तर त्याला मार्कंडेयाचें आयुष्य मिळेल, या सद्भावनेनें प्रेरित होऊन श्रीहरीला देवनाथांच्या पायांवर घातलें, आणि त्यांनींही सुलक्षणी बाळ पाहून त्याचा स्वीकार केला व मोठा होईपर्यंत नाथाची ही भेट तूं जतन करून ठेव असें बापाला बजाविलें. पुत्रापेक्षां जास्त ऋणानुबंधानें सेवा व सदाचरण दाखविणारा अनंत जन्मींचा जोडीदार शिष्य नाथांना प्राप्त झाला. ”

पुढें श्रीहरीला आणखी एक भाऊ झाला तेव्हां देवनाथ हे श्रीहरीला बरोबर घेऊन गेले. त्या वेळीं श्रीहरीचें वय सहा वर्षांचें होतें. पुढें दोन वर्षांनीं सुरजी अंजनगांवच्या मठांत देवनाथांनीं त्याची थाटानें मुंज केली आणि लग्न करविलें. सुनेचें नांव राधाबाई ठेविलें. “ संस्कृत व प्राकृत कवींचा बराचसा अभ्यास, आणि कांहीं उर्दू व उत्कृष्ट गायन आणि ' गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्योस्तु-

च्छिन्नसंशयः असा गुरुगृहवासाचा आणि तपोनिष्ठ संतसमागमाचा लाभ, यांच्या योगानें श्रीहरीचा सर्वांगसुंदर विकास व्हावयास लागला. देवनाथ जितके तामसी व शीघ्रकोपी, तितकाच श्रीहरि शांत होता. श्रीगोविंदनाथांना या आपल्या नातशिष्याची अखंड प्रसन्नता पाहून फारच कौतुक वाटे. श्रीहरीच्या विवाहकालीं गोविंदनाथांचें वय ऐशींहून अधिक होतें. श्रीहरीचें दयालुत्व पाहून, गोविंदनाथांनी त्याचें नांव **दयाळया** ठेविलें. " गोविंदनाथांच्या या अहेतुक निस्सीम प्रेमाबद्दल दयाळनाथांना पुढें आयुष्यामध्यें वारंवार गहिंवरून आठवण येत असे. गोविंदनाथांनीं बऱ्हाणपूर येथें समाधि घेतल्यानंतर देवनाथ व दयाळनाथ यांची जोडी समाधि-दर्शनाला गेली असतां दयाळनाथांनीं गोविंदनाथांवर जें पद रचिलें तसें सुरस व प्रासादिक पद दयाळनाथांच्या कवितेंत अन्यत्र क्वचितच आढळतें. दयाळनाथ व त्यांच्या अगोदरचे 'राजरंक पहा समदृष्टि,' वागणारे उदारसाधु कसे बाणेदार व विरक्त असत याचें मूर्तिमंत गोविंदस्वरूप नजरेसमोरून नाहींसें झाल्यामुळें दयाळनाथांना फार खेद झाला, आणि त्या वेळीं साठीच्या घरांत आलेले देवनाथही आपल्याला असेच एखाद्या दिवशीं सोडून जातील या कल्पनेनें तर त्यांचा उद्वेग जास्तच दुणावला. ते एके ठिकाणीं ह्मणतातः—

' [illegible]मन मुद्रा हे उपाधि । नेणंचि निरवधी ॥
न[illegible] गोपाळीं गोविंदीं । भेद नसे त्रिशुद्धि ॥
[illegible]र्दीं आनंदली । माउली ॥
ते[illegible] कामदुधा दयाळू । देवनाथ कनवाळू ॥
[illegible] दासाचा प्रतिपाळू ॥ अगणित गुणकल्लोळू ॥
[illegible]मृत दुभली । माउली ॥ "

श्रीहरीची विद्या पूर्ण होत आली, आणि झाडाखालीं झाड वाढत नसल्यामुळें देवनाथांनीं गोविंदनाथांच्या आज्ञेप्रमाणें दयाळनाथांना पर्यटणास पाठविलें. पंडितमैत्री, शास्त्रग्रंथविलोकन, देशपर्यटन आणि सभासंचार या साधनचतुष्टयानें ज्ञानसंपन्न होऊन दयाळनाथ कीर्तन करूं लागले. लवकरच त्यांचा लौकिक सर्व महाराष्ट्रभर पसरला. शिष्याची कीर्ति ऐकून उभयतां वृद्धनाथांना संतोष वाटत असे. या गुरुवृद्धांप्रमाणेंच श्रीहरिबुवांचें मनापासून कौतुक करणारे आणि कोड पुरविणारे तिसरे खुशालराव बाबा देशपांडे सुरजीकर हे होते. " त्याचप्रमाणें दर्यापूर येथील श्रीमंत बहादुरजी देशमुख, वैदर्भ प्रांतांतील तत्कालीन सरस्वतीकंठमणी श्रीमान् विनायक शास्त्री पर्वते दर्यापुरकर, श्रीमान् गुंडो महाराज नांदगांवकर, श्रीमान् सदाराम बोवा कौंडण्यपुरकर, वगैरे शरशापसमर्थांचांही त्यांच्यावर फार लोभ असे. वर्धा जिल्ह्यांतील सुप्रसिद्ध अष्टीकर देशपांड्याचे तत्कालीन प्रमुख आत्मारामपंत व शामराव हे दयाळनाथांस फार चाहत व साधुसज्जनाचा मेळा आपल्या येथें आला म्हणजे त्यांत दयाळनाथांना विशेष मान देत."

दयाळनाथ उमरेडच्या बाजूस फिरत असतांना, एका मुसलमानानें आपलें मातृहीन अर्भक आणून त्यांच्या स्वाधीन केलें. नाथांनीं त्या मुलाचें मोठ्या प्रेमानें परिपालन केलें व मोठा झाल्यावर तो मुलगा नाथांचा कायमचा आश्रित होऊन राहिला. अनाथांचा परामर्श घेण्याचें हें व्रत नाथांनीं शेवटपर्यंत चालविलें. " जे कां रंजले गांजले । त्यांसि म्हणे जो आपुले ॥ तोचि साधु ओळखावा । देव तेथेंचि जाणावा " ही तुकारामबुवांची उक्ति नाथांच्या ठायीं कशी

यथार्थ झाली होती, हें यावरून वाचकांच्या लक्ष्यांत येईल. मनुष्य धर्माचाराचें केवढेंही अवडंबर माजवो किंवा पंढरपुरच्या वाऱ्या जन्मभर करीत राहो, पण त्याच्या अंतःकरणास, रंजलेगांजलेल्या प्राण्याची अत्यंत करुणास्पद स्थिति पाहून जर दयेचा पाझर फुटत नसेल तर त्या मनुष्यापासून साधुत्व फार दूर आहे, असें बेलाशक समजावें. "विष्णुमय जग वैष्णवांचा धर्म । भेदाभेद कर्म अंमगळ," हें महापुरुषांचें सुवर्णवचन प्रत्येक मुमुक्षूनें आपल्या हृत्पटलावर खोदून ठेवून, तदनुसार आचारण केलें तरच तो पुढें खरा साधु होईल, नाहींतर " साखरेचें ओझें बैलाचिये पाठीं । तयाला शेवटीं करबाडें " अशी स्थिति झाल्याशिवाय राहणार नाहीं.

दयाळनाथांच्या कालीं वऱ्हाडांत उर्दू भाषेस विशेष मान असल्यामुळें त्या वेळचे कांहीं हरिदास फारशी व उर्दू या भाषांचा अभ्यास करीत असत. देवनाथ महाराजांचें उर्दू भाषेवर चांगलेंच प्रभुत्व होतें. दयाळनाथांचा उर्दू भाषेशीं विशेष परिचय नव्हता, तथापि एलिचपुरच्या नबाबसाहेबांपासून थेट चंदुलाल दिवाण व खुद्द निजाम सरकारांसारखे श्रोते मिळण्याचें त्यांचें भाग्य होतें; व तितक्या पुरती त्यांनीं उर्दू कवितेला वश करून ठेविली होती. अष्टसिद्धींपैकीं वशित्वाचा गुण त्यांच्या अंगीं पूर्णपणें वसत असल्यामुळें त्यांना सभाविजय कधींच अंतरला नाहीं. शिवाय गोविंदनाथ आणि देवनाथ या उभय वृद्धांचें छत्र जोंपर्यंत त्यांच्या डोक्यावर होतें तोंपर्यंत या समर्थसेवकाकडे वक्रदृष्टीनें पाहण्याची कोणाची हिम्मत नव्हती. यांच्या वक्तृत्वाचा, कंठमाधुर्याचा आणि अव्याज-

मनोहर स्वभावाचा हेवा करून जे लोक यांच्यावर टीका करावयाला पहात त्यांचा मानभंग करावयास देवनाथमहाराज तयारच असत. बरेच दिवस देवनाथ महाराजांची भेट न झाल्यामुळें, गुरुदर्शनाची दयाळनाथांस किती उत्कंठा लागून राहिली होती हें त्यांच्या खालील पदावरून व्यक्त होतें:—

आधीं कां नाहीं माझा अधिकार विचारिला ।
पल्लवीं घेउनियां नुपेक्षीं जगपाळा ॥
हीनदीन मतिमंद , माझी कीर्ति कां केली ।
लाविसी नेत्र आतां तरी ब्रीदावळी गेली ॥
दोष हे आचरावे हेंचि आम्हा उचित ।
तव पदीं ब्रीद गर्जे तारावे पतित ॥
निशाण फडके तें काष्ठ त्याचें मोल काय ।
परि त्या अभिमानास्तव रायाचें शिर जाय ॥

" एकदां एका पार्सभाषाब्रुव हरिदासानें आपल्या परवाक्पुष्ट कीर्तनाला कमोद तांदुळाची उपमा दिली आणि दयाळनाथांचें प्राकृतभाषाकीर्तन पर्यायानें हीन ठरविलें. तेव्हां एका स्पष्टवक्त्या श्रोत्यानें केलेल्या यथान्याय कानउघाडणीनें सदरहू विद्वानाचें चित्त अधिकच भडकून त्यांनीं दयाळनाथांना मेजवानीच्या निमित्तानें शेंदूर चारला असें म्हणतात. याच्यानंतर दर्यापुरांत कीर्तनप्रसंगीं यांची श्रीविनायकशास्त्री पर्वते या रसिकवराशीं गांठ पडली असतां शास्त्रीबुवांनीं त्यांच्या समयसूचकतेचें अतिशय कौतुक केलें. " नंदाच्या नंदना, नवनीरदतनु कोमलगात्रा दानवकुलकंदना " हें पद दयाळनाथांनीं लावलें होतें. शास्त्रीबुवांनीं विचारिलें कीं " संस्कृत पदाचें संबोधन अकारान्त करावयाचें असतां

" दानवकुलकंदना " असें आकारान्त रूप आपण कां केलें ? " दयाळनाथांनीं सांगितलें कीं " देव वैकुंठांतून यावयाचा असल्यामुळें जोरानें हांक मारण्यासाठीं आकारान्त प्रयोग करावा लागला. " शास्त्रीबुवांनीं विचारिलें " भगवान् काय तुमच्यापासून दूर आहे ! " नाथांनीं उत्तर दिलें " भगवानाला निर्गुणाचा सगुण करून आणावयाचा होता म्हणून एवढी आक्रोशपूर्वक हांक मारली. " हें ऐकून शास्त्रीबुवांनीं प्रेमातिशयानें यांना भरसभेंत आलिंगन दिलें आणि यांचा फार गौरव केला.

पुढें एकदां बनसिंह नाइकांशीं दयाळनाथांची गांठ पडली. नाईक हे पेंढाऱ्यांचे मुख्य, आणि एक तर त्यांना आपलें सर्वस्व अर्पून जीव वांचवावयाचे किंवा आपला गोट आंवळून त्यांच्याशीं दोन हात करावयाचे याशिवाय दुसरी तोड निघेना. इतक्यांत नाईकांनीं आपण होऊनच नाथांची भेट घेऊन सांगितलें कीं, वाटेल तेवढें द्रव्य देतों, मला मंत्रोपदेश द्या. पापाचरणावर मिळविलेल्या त्याच्या द्रव्याचा, धर्मकारणार्थ त्याजकडून व्यय करवून नाथांनीं त्यास मंत्र दिला आणि देशाला समर्थ चक्रवर्ती कोणीच न राहिल्यामुळें मोठमोठ्या शूर शिपायांनीं देखील तत्समयविशिष्ट सार्वत्रिक बुद्धिभ्रंशानें अंगीकारलेल्या क्षात्रधर्माला अनुचित लुटारूपणापासून त्याला कायमचें परावृत्त केलें. नाईक दरोडे घालीत आणि पापक्षालनप्रायश्चित्तार्थ धर्म करावयाला पहात." परंतु नाथांच्या अनुग्रहानें त्यांचा दुर्वासनाक्षय झाला.

खऱ्या सत्पुरुषास, स्वतःच्या योगक्षेमार्थ द्रव्याची फारशी जरुरी कधीं भासत नाहीं. तरी लोकसंग्रही सत्पुरुषांचें पैशावांचून पदो-

पदीं नडतें. देवनाथ महाराज काशीस गेले असतांना तेथें त्यांनीं एका गृहस्थाला पांच हजारांचा रोखा लिहून दिला होता; आणि ते समाधिस्थ झाल्यावर कांहीं दिवसांनीं दयाळनाथ नागपूर येथें गेले असतां तो गृहस्थ त्यांजकडे रोखा घेऊन आला. "नाथांनीं गुरूच्या ऋणाचा स्वीकार केला. भोसले यांच्या वाड्यांतून श्री० बाकाबाई साहेबांनीं एका कीर्तनाला पांच हजार रुपये देण्याचें आमंत्रण पाठविलें परंतु तें शास्त्रनिषिद्ध जाणून नाथांनीं त्याचा स्वीकार केला नाहीं. ते शहरांत भिक्षेस निघाले आणि दानशूरांनीं मंडित केलेल्या त्या कालांत नाथांचें सर्व कर्ज एका फेरींतच फिटलें !

नाथ एकदां दमयंतीस्वयंवराचें वर्णन करीत असतांना दमयंतीच्या अंगावरील दागिन्याची नामावली सांगूं लागले; आणि त्या वक्तृत्वाच्या भरांत असतांना, आपली कन्या मुक्ताबाई हिला विवाहप्रसंगीं आपण फुटका मणीही आंदण देऊं शकलों नाहीं ही कल्पना मनांत येऊन त्यांचें मुख किंचित् म्लान झालें. हें कीर्तन चातुर्मास्यांत श्रीमंत सरदार खंडेराव माणकेश्वर यांच्या वाड्यांत चाललें होतें. त्यांनीं पर्यायानें व चतुरस्रतेनें खेदाचें कारण शोधून काढलें आणि लागलीच मुक्ताबाईला आपली धर्मकन्या मानून चंद्रहारासकट सर्व दागिने तिच्या अंगावर घातले. " मोडली तरी राजधानी आणि भंगलें तरी तीर्थ ही म्हण खोटी नव्हे. "

आपण शिष्याला जें शिकाविलें तें त्याच्या ठायीं कितपत उतरलें हें पाहाण्याची सद्गुरूंची पूर्वापर चाल आहे. श्रीसमर्थ रामदास स्वामींची शिष्यकसोटी पाहण्याची कडक पद्धत प्रसिद्धच

आहे. देवनाथानींही आपल्या प्रिय शिष्याची पुष्कळ परीक्षा पाहिली. त्यांना नेहमी मारहाण करावी, दहाजणांत एकदम अपमान करावा, मध्येंच जेवणाच्या वेळीं प्रवासाला निघण्याची आज्ञा करावी, त्यांनीं स्वपराक्रमानें मिळवून गुरुचरणीं अर्पण करण्याकरिता आणिलेलें द्रव्य एकदम अनाथांना वांटून टाकावें, असे अनेक प्रकार करावे. परंतु दयाळनाथांनीं आपल्या भक्तियोगांत तिळमात्र अंतर पडूं दिलें नाहीं. सर्व प्रकारचें दुःख गुरुचरणीं अर्पण करावयाचें, ही त्यांची वृत्ति होती. यासंबंधानें लिहितांना रा. रा. अच्युत सीताराम साठे यांनीं काढलेले उद्गार अगदीं यथार्थ आहेत. ते म्हणतात "तत्पूर्वकालीन धर्मशासनांत, राजकारणांत, ज्ञातिनिर्बंधांत, सेव्यसेवकसंबंधांत, संप्रदायपद्धतींत इतकेंच नव्हे तर संयुक्त कुटुंबपद्धतींतसुद्धां व्यवहारनिर्बंध सर्व पक्षीं असेच दृढपणें पाळले जात; आणि म्हणूनच अनेक विपरीत भावना प्रत्यहीं घडत असतां आमची समाजरचना स्थिरावली, दृढावली आणि पालवली." दयाळनाथांची निस्सीम गुरुभक्ति आणि आज्ञाधारकपणा पाहून इतर सर्व साधुजन थक्क होत आणि असा शिष्य मिळाल्याबद्दल देवनाथांच्या थोर भाग्याचा स्तव करीत.

दयाळनाथांनीं आपल्या वयाच्या ४८ व्या वर्षीं (इ. स. १८३६) हैदराबाद येथें देह ठेविला. चंदुलाल राजे, आपल्या कर्णौदार्याला अनुसरून त्यांना इनाम देणार होते, पण त्यांच्या आकस्मिक मृत्यूमुळें तें राहिलें. नाथांचें और्ध्वदेहिक निजामच्या राजधानीच्या वैभवाला व यांच्या लौकिकाला योग्य असेंच झालें. दयाळनाथांचा

औरस वंश नाहीं. मुलीचा वंश रामटेक उमरेडला आहे. यांच्या मागून यांच्या गादीवर जयकृष्णनाथ आष्टीकर, (मृत्यु इ. स. १८५१) श्रीरामकृष्णनाथ, ( मृत्यु इ. स. १८९१, ) श्रीभालचंद्रनाथ ( मृत्यु १९११) पंढरपूर येथें व श्रीमारुतीनाथ उमरेडकर इतके बसले आहेत. यांनीं दयाळनाथांची सर्व काव्यकृति जपून ठेवली होती ती रा. सा. अच्युत सीताराम साठे यांस त्यांनीं दिली व ती त्यांनीं छापून प्रसिद्ध केली. वरीलपैकीं श्रीभालचंद्रनाथ यांनींही चांगली कविता केली असून, गुरुपरंपरेवर एक ओवीबद्ध ग्रंथ केला आहे. "दयाळनाथांची कविता" या ग्रंथांत त्यांची ८५ पदें व रामजन्म हें आख्यान प्रसिद्ध झालें आहे. त्यांच्या कवितेविषयीं रा. साठे यांनीं सदर ग्रंथारंभीं दिलेल्या सुंदर चरित्रांत जें विवेचन केलें आहे तें सर्वांस मान्य होण्यासारखें असल्यामुळें त्याचा सारांश येथें देतों.

"देवनाथांच्या प्रमाणेंच दयाळनाथानीं गणपती, शंकरपार्वती वगैरे निरनिराळ्या देवतांवर कविता केली आहे. तथापि कृष्णवर्णनाच्या कविता त्यांनीं अधिक प्रेमानें रचिलेल्या आहेत आणि आख्यानकवितेवर त्यांचा देवनाथांपेक्षांही जास्त भर होता. देवनाथांचे धांवे व्यक्तिविषयक नाहींत, आर्त व दीनदुबळ्यांच्या दुःखप्रसंगाला शोभतील असे त्यांचे करुणारसपूर्ण धांवे आहेत. दयाळनाथांचे धांवे व्यक्तिविषयक जास्त. म्हणूनच देवनाथ हे श्रेष्ठ प्रतीचे भक्तिकवि आणि दयाळनाथ हे श्रेष्ठप्रतीचे आख्यानकवि होत. बाकी शब्दसौष्ठव पदलालित्य, अर्थगांभीर्य, इत्यादि गुणांत उभयनाथ समरस होतात. उभयतांचें प्राचीन ग्रंथांचें परिशीलन दांडगें होतें. देवनाथ भागव-

ताच्या बाहेर जात नसत; परंतु दयाळनाथांच्या कवितेमध्यें नवीन नवीन नवीन सुंदर कल्पना पुष्कळशा दृष्टीला पडतात."

देवनाथ हे सिद्ध पुरुष होते म्हणून त्यांच्या वाणींत स्वानुभवाचा अधिकार फार मोठा दिसतो, शिवाय निस्पृहता आणि औत्सुक्य हे गुण त्यांच्या कवितेंत ठिकठिकाणीं दृष्टोत्पत्तीस येतात. दयाळनाथ हे मुमुक्षु कोटींतले असल्यामुळें त्यांच्या कवितेंत त्यांची पारमार्थिक कळकळ जितकी दिसून येते, तितकी अधिकारक्षमता दिसून येत नाहीं. तथापि कवि या दृष्टीनें पाहिल्यास त्यांच्या कवितेंतील कित्येक स्थलें खरोखरच फार मनोरम आहेत. पुढील उतारे पहा:—

**पद** ( लावणी )

चाल सख्या मनमोहना युगस । तुजविण जाते घडी ।
सख्या तूं जिविंचा जिवलग गडी ॥ धृ० ॥
सचिंत मन मानसीं असें बहु दुःख साहते ।
वाट मी टक मक तुझि पाहतें ॥
दिनरजनीं विठ्ठल अति मम मति दुश्चित राहते ।
आण तव पायाची वाहतें ॥
बुडतें दुःखसागरीं । सागरीं ।
तारक तूं तुजला खरी । अहो खरी ।
उपजावि दया अंतरी । अहो अंतरीं ।
विरहाग्नी जाळितो तुझा करि कष्टि प्राण चरफडी ।
सख्या तूं जिविंचा जिवलग गडी ॥ १ ॥
नूतन तनु तारुण्य वय बा जात असे वायां ।
नाहीं शाश्वत कीं हे काया ॥
उभा काळ लक्षितो इला उचलुनी न्यावया ।
करुणा कशी नये हृदया ॥

साहिना विरह दुर्धर ।
येवोनी मला करिं धर । करिं धर ।
घाबरलें मम अंतर । अंतर ।
प्राण निघों पाहतो त्वरें धाउनि घालीं उडी ।
सख्या तूं जिविंचा जिवलग गडी ॥ २ ॥
भर नवतीची बहर कहर करी लहर मदनाची ।
उठती तीव्र मला जाची ॥
श्रमदायक सोसेना शांती कोण करिल याची ।
सांग तुजविना सत्य साची ॥
जहालासी निष्ठुर कसा । अहो कसा ।
मागुती दिवस नये असा । अहो असा ।
तनु क्षणिक नाहिं भरंवसा । भरवंसा ।
जें होइल तें अशांत चतुरा समजुनि करिं तांतडी ।
सख्या तूं जिविंचा जिवलग गडी ॥ ३ ॥
तूं दिनपति मी कांति तुझी अजि कोप कसा करिसी ।
जळाविण मीन तळमळी तशी ॥
साधन तरि कोणतें करूं मी तुझिया प्राप्तीसी ।
किती म्हणुनियां अंत पाहशी ॥
मी सरिता तूं सागर । अहो सागर ।
मी चातक तूं जलधर । अहो जलधर ।
मी तारा तूं शीतकर । अहो शीतकर ।
आगळीक नसतांनि नजर कां मजवरती वांकडी ।
सख्या तूं जिविंचा जिवलग गडी ॥ ४ ॥
मनोवृत्ति भाकिती अशी करुणा ते विरहिणी ।
दयाळा माना रे विनवणी ॥
तूं आत्मा मी प्रकृति तुझी हे अनादिची मोळणी ।
कदापी ना दिसे दुजेपणीं ॥
तूं दीप प्रभा मी बरी । अहो बरी ।

तूं सागर लहरी मी खरी । अहो खरी ।
अन्यथा नव्हे वैखरी । अहो वैखरी ।
देवनाथ प्रभु दयाळ भवनदी उतरी पैलथडी ।
सख्या तूं जिविंचा जिवलग गडी ॥ ५ ॥

दुर्वासाच्या आदरातिथ्याबद्दल घाबरलेल्या द्रौपदीची भावाकडे मागणीः-

मार्जन करुनि त्वरित येती । अन्न नसतांचि शाप देती ॥
तारक तूंचि या जगतीं । असा निश्चय माझे चित्तीं॥
म्हणुनि बाहतें दीनवाणी । करुणार्णवा मोक्षदानी ॥
पिता तूं माझा मी दुहिता । कंचुकी वसन चुडेदाता ॥
राजसूय यज्ञ धर्म करितां । कौरवांसि वाढीत असतां ॥
कुंचुकि चिरडें तैं फिटतां । चित्तिं तुज आठविलें ताता ॥
चतुर्भुज करुन गांठि देतां । आनंद न समावे चित्ता ॥
कंचुकी मम देणें फिटलें । घालिना संकट तुज वहिलें ॥
ऋषींचें भय पोटीं धरिलें । म्हणुनि तुजलागीं आठविलें ॥

* * *

अनंता जन्मीचें उसणें । भरुनि पावलें भाक घेणें ।
परि तुजवरी एक उरलें । चुडे त्वां कधि नाहीं भरले ॥
समय पहा कठिण समज वरिले । पांडुतनयांसि विघ्न आलें ।
दास वांचवीं चुडेदानी । करुणार्णवा मोक्षदानी ॥

## द्रौपदीवस्त्रहरण

ये धांवत कृष्णबाई अति कनवाळे ।
निजजनमनसरस मराळे ॥ ध्रु० ॥
हा मेला खळ दुर्योधन कुल बुडवाया ।
कुरुकुळिं आला उदया ॥
कौरवांसि गौरव रौरवगती कराया ॥
धरिली मति शीघ्र मराया ॥
दुर्बुद्धि दे मामा बुद्धि फिराया ।
कर्णादिक श्रवण भराया ॥

एकत्र होउनी यांनीं ।
प्रेरिला अनुज अघखाणी ।
यानें अघटित केली करणी ।
कच धरुनी ओढुनी सभेंत मजला आणिलें ।
अति कनवाळे । निजजनमन सरस मराळे
वेणिला धरुनि दुःशासन अंगडुनि पाडी ।
फर फर फर सभेंत ओढी ॥
वाग्धनुष्य ओढुनि वचनशरातें सोडी ।
अंतर्गत काळिज फोडी ॥
अर्धांगिं बसुनी मांडीवर ह्मणतो जोडीं ।
भर्त्यांची ममता सोडीं ॥
'दासि' 'ही दासि' वदताहे ।
धर्मज्ञ गुरू बसलाहे ।
भीष्मही उगा तळिं पाहे ।
विदुरादिमतीची गति हे किमपि न चाले ।
अति कनवाळे । निजजनमन सरस मराळे ॥ २ ॥
स्वस्त्री हरुनी आजि युधिष्ठिर झाला ।
अतिदीन कसा जी कृपाळा ॥
नागायुत बळिया भीम पराक्रमि असला ।
धर्माज्ञापाशीं फसला ॥
अर्जुनही न वदे कांहीं उगाचि बसला ।
मजवरि कां ईश्वर रुसला ॥
हा अंध वृद्ध मामाजी ।
तोही किमपि न बोले माजी ।
अवकळा ही दुष्टसमाजीं ।
अजुनियां अंत पाहसि किती परम कृपाळे ।
अति कनवाळे । निजजनमन सरस मराळे ॥ ३ ॥
चांडाळें आज्ञा दिधली वसन हराया ।

तडतड झोंबत शरिरा या ॥
होतांचि नग्न असुत्याग करिन यदुराया ।
मग यावें प्रेत पहाया ॥
हा यवन जसा कीं धरि गो वधा कराया ।
वृक व्याघ्र मृगी ते खाया ॥
कृष्णाई धांव गे आई ।
तव बहिण ह्मणति सखेबाई ।
ये त्वरा करुनि चतुराई ।
ये दीनबंधु ब्रिद जाउं पहातें सगळें ।
अति कनवाळे । निजजनमन सरस मराळे ॥ ४ ॥
मजवरि तव मानस होतें कसें कृपाळे ।
हें ममत्व कां जी लपालें ॥
मी व्यर्थचि कीं बा भगिनी ऐसें वदलें ।
तूं ब्रम्ह तुजसि मी न तुळें ॥
लाजोनि मनांतचि निजगुज ऐसें कळलें ।
मी स्वसा न तुझी जगपाळे ॥
वदलें तें नव्हेचि लटिक ।
दासांची लहानशी घटिक ।
जाणोनि रक्षावें, अटक ।
न पडावी पळभरि नष्टें वसना धरिलें ।
अति कनवाळे । निजजनमनसरस मराळे ॥ ५ ॥
अनंता अपारा अपरिमिता श्रीरंगा ।
ये चुकवीं यमभयदंगा ॥
श्रीधरा मुकुंदा मुनिमनपंकजभृंगा ।
प्रगटें मम अंतररंगा ॥
गोविंद कृष्ण केशवा भवब्धितरंगा ।
नाशीं दुर्मददुःसंगा ॥
हे मुरमर्दन कंसारी ।

मंदरधर मंगलकारी ।
गिरिधरा समय अति भारी ।
अशि करुणा ऐकुनि परब्रह्म गहिंवरलें धांउनि आलें ।
अतिकनवाळे । निजजनमनसरस मराळे ॥ ६ ॥

मनपवन टाकुनि राजा द्वारावतिचा ।
ये ऐकुनियां रव सतिचा ।
पृष्ठिभागिं राहुनि ध्वनि करि मेघगतीचा ।
प्रभु गंभीर सदय मतीचा ॥
नाभी नाभी वदतां ऐकुनी तदा सतीचा ।
प्रेमा उचंबळला गुणवतिचा ॥
परतोनि पाहतां मागें ।
आलिंगुनियां श्रीरंगें ।
पुसिले कीं नेत्र अभंगें ।
संबोखुनि सतिची हृद्गत आधी हरिली ।
निजरक्षणार्थ अवतरली ॥
हे माय बहिण कृष्णाई धांउनि आली ।
निजरक्षणार्थ अवतरली ॥ ७ ॥

तें प्रथम वसन सोडिलें खलें क्रोधानें ।
दुसरें पाहे अवधानें ॥
तें फर फर ओढित तेव्हां दोहिं करानें ।
निघताती बहुविध वसनें ॥
पाताळ मृत्यु स्वर्गीतिल बहु हस्तानें ।
प्रभु नेसवीत सन्मानें ॥
कृष्णातनु ही रत्नाकर ।
निघताति अनंत अंबर ।
उपसितसे टिटवी खळफर ।
विटका तो नेत्रीं गरगर भोंडी भरली ।
धांवुनी आली । निजरक्षणार्थ अवतरली ॥ ९ ॥

चावुनी अधर सरसावुनि आला जवळी ।
देखिली कशी पांचाळी ।
लखलखित वसन ते पीत चतुर्भुज बाळी ।
अवलोकिलि सर्व नृपाळीं ॥
गंगात्मज द्विज द्रोणहि विदुर दे टाळी ।
चांडाळमुखश्री काळी ॥
तों भिष्म म्हणे फिर नष्टा ।
विदुरही वदे पापिष्टा ।
जळसि रे उभाचि भ्रष्टा ।
हे देवनाथ माउली दयाळू खिजली ।
धांवुनि आली । निजरक्षणार्थ अवतरली ॥

एवढे उतारे वाचून दयाळनाथांच्या काव्यसौंदर्याची वाचकांस कल्पना होण्यासारखी असल्यामुळें आणखी वेंचे देऊन ग्रंथविस्तार करीत नाहीं.

## नाथभुजंग.

नाथभुजंग हे जातीनें डवरी असून, परांडे गांवीं रहात असत. त्यांचें निर्याण होऊन सुमारें ८५।९० वर्षें झालीं असावीं. सदर गांवीं त्यांचे वंशज अद्याप आहेत, असें सांगतात. भुजंगनाथांचीं सर्व देवांवर, स्थानदेवतांवर व वेदान्तपर अशीं पुष्कळ पदें व अभंग असून, तीं मराठी व हिंदुस्थानी भाषेत आहेत. परंतु त्यांपैकीं फक्त तीनचारच पदें काय तीं छापलेलीं असून बाकीची सर्व कविता अद्याप अप्रकाशित आहे. यांची वाणी फार रसाळ असून, यांच्या कित्येक पदांच्या रचनेवरून यांस संस्कृत भाषेंचेहा थोडेंसें ज्ञान असावें असें वाटतें. " वद वद वद रसने शिव सांब सांब सांब " व " तोम् तननन वाजवि वेणू " हीं त्यांचीं दोन पदें तर महाराष्ट्रांत सर्वतोमुखीं

झाली आहेत. प्रत्येक डबऱ्याला नाथभुजंगांचें एक तरी पद येत असतें. त्यांचा पुत्र काशीनाथ यानें मांडी दिली असतांना " तेंहि गेलें बा " हें शेवटचें पद त्यांनीं रचिलें; व त्या पदाचा " हर हर म्हणतां नाथ भुजंग तेहि गेले बा ! " हा शेवटचा चरण म्हणतांच त्या महात्म्याचें देहावसान झालें. त्यांनीं अगोदर सांगून ठेविल्याप्रमाणें तिसरे दिवशीं चितेवर दर्शन देऊन नाथभुजंग अदृश्य झाले. त्यांची पिकलेली भव्य दाढी व वैराग्यवृत्ति यांमुळें ते ऋषीसारखे दिसत, असें त्यांना पाहिलेल्या एका गृहस्थानें म्हटल्याचें कै. विष्णु आप्पाजी कुळकर्णी यांनीं ' प्रभात ' मासिकांतील आपल्या एतद्विषयक लेखांत लिहिलें आहे.

नाथभुजंगांचीं कांहीं पदें येथें देतों:—

वद वद वद रसने शिव सांब सांब सांब सांब ॥ ध्रु० ॥
विश्वेशा बद्रिनाथ महाकाल सोमनाथ ।
ॐ कारा घुश्मेश्वर त्र्यंबकेश मृडशूलि
जगदंब दंब दंब दंब ॥ वद० ॥ १ ॥
भीमाशंकर महेश वैजनाथ नागेशा ।
रामेश्वर मल्लेश द्वादश लिंगादिकरुनि अंब अंब
अंब अंब ॥ वद० ॥ २ ॥
अनुदिनिं सत्संग धरुनि रंगिं रंगला भुजंग नाथ
नमुनि हर हर हर हर हर हर ॥ वद ० ॥ ३ ॥

२

काय गुण वर्णूं सखये ऐशी सद्गुरु माउली ।
एकाएकीं वृत्ति कैसी स्वरूपिं सामावली ॥ ध्रु० ॥
जागृति स्वप्न सुषुप्ती । तुर्येनें नेउनि एकांतीं ।
त्रिवेणी तरोनी तैसी उन्मनि विसावली ॥ १ ॥

" नाथ भुजंगाचा सुत " या शब्दसमुच्चयावरून हें पद नाथभुजंग यांच्या मुलाचें असावें असें वाटतें.

जागत जागत जागी झालें । आपणा आपें विसरलें ।
मागिल कौतुक सकळ माव ऐसी कळली ॥ २ ॥
उपरति समरति......। साधू समरसलें ।
चिन्मय आपण येचि स्थिति कांहिं नाहिं उरलें ॥ ३ ॥
देऊनि सत्संगीं भाव । संतसंगतिचें नांव ।
दाखवी निजरद' ठेव करुनी कृपासाउली ॥ ४ ॥
**नाथ भुजगाचा** सुत[1] । सदाही चरणीं रत ।
पाजवित अर्धचंद्रामृतरस गाउली ॥ ५ ॥

३

विठ्ठल मम प्राणसखा जिविंचें जीवन भेटेल कैं ॥ ध्रु० ॥
पुंडलीक राई रखुमाई । श्रवण मनन ठायीं ठायीं ।
तुळसीमाळ प्रेमबुका दाटेल कैं ॥ १ ॥
नेत्रकमळदळविशाळ । भाळिं बुका तुळसिमाळ ।
कवळनी तनुसी तनु भेटेल कैं ॥ २ ॥
भीमातटिं निकट निपट । कटिं कर ठेवूनि उभा ।
इटेवरी समचरण नमुन भेटेल कैं ॥ ३ ॥
श्रीहरी **भुजगनाथ** । रंगिं भरुनि ***रंगनाथ** ।
जन्ममरण पुन्हा खत फाटेल कैं ॥ ४ ॥

" तोम् तननन वाजवि वेणु " हें नाथभुजंगांचें पद फारच बहारीचें आहे, परंतु पाठांतरामुळें त्याचें मूळ शुद्ध स्वरूप इतकें विकृत झालेलें आहे कीं, तसल्या स्थितींत त्याचें येथें अवतरण करणें मला योग्य वाटत नाहीं.

---

१ ( पृष्ठ १७६ वरील टीप पहा. )

*हेंही पद्य नाथ भुजंगांच्या 'रंगनाथ' नामक शिष्याचें असण्याचा संभव आहे.

# निरंजनबुवा.

बाळाघांटीं वंजरा नदीच्या तीरावर परळी वैजनाथाच्या पूर्वेस चार योजनें कळंब म्हणून एक गांव आहे. त्या गांवचे कुळकर्णी श्रीधरपंत श्रोत्री म्हणून कोणी गृहस्थ होते, त्यांचे चिरंजीव अवधूत हेच निरंजनबुवा ह्या नांवानें प्रसिद्धीस आले. ह्यांच्या मातुश्रीचें नांव लक्ष्मी. अवधूत यांस लहानपणींच घरच्या गरिबीमुळें गांव सोडून नौकरीकरितां पुण्यास राहावें लागलें. कळंब गांवीं नष्टे या आड-नांवाचा कोणी वाणी होता त्याच्या अडतीचें काम हे पुण्यास राहून करीत. यांची दत्तावर अतिशय भक्ति असे. पुण्यास एकदां एका कीर्त-नांत ठाकुरदासबुवांनीं श्रीमद्भागवतांतील यदुराजा आणि दत्त यांच्या संवादाचें फार प्रेमळ विवरण केलें. त्या वेळीं संसारव्यथेनें तापलेल्या निरंजनबुवांस अतिशय विरक्ति उत्पन्न होऊन त्यांनीं ठाकुरदासबुवांचे पाय घट्ट धरले व ' मजला श्रीदत्ताचें प्रत्यक्ष दर्शन करून द्या' अशी त्यांस विनंति केली. तेव्हां बुवा म्हणाले 'आम्ही फक्त कीर्तन करितों.' पण अवधूताची तळमळ कमी होईना. *श्रीरघुनाथ भटजी नामक कोणी श्रीरामदासस्वामीसारखे ब्रह्मचारी सत्पुरुष नासिक येथें अस-ल्याचें ऐकल्यामुळें ते नौकरी सोडून तिकडे गेले. वाटेंत चिंचवड जुन्नर, इत्यादि ठिकाणच्या साधूंचें दर्शन घेत घेत शके १७७२ प्रजापती संवत्सरीं कार्तिक वद्य चतुर्दशीस नासिक येथें जाऊन रघुनाथ भटजींचें त्यांनीं दर्शन घेतलें. तेथेंच मार्गशीर्ष शुद्ध एका-

*प्रस्तुत भागांतील "मौनीनाथ" स्वामींच्या चरित्रांत या रघुनाथ भटजींचा उल्लेख आला आहे.

दशीस भटजींकडून त्यांस गुरूपदेश मिळाला. निरंजनबुवा हें नांव उपदेश देतांना गुरूनीं ठेविलें. कवित्वस्फूर्तीही गुरुकृपेनें याच वेळीं झाली. गुरूकडून योगसाधन, आत्मज्ञान वगैरेची माहिती मिळाली परंतु श्रीदत्तदर्शनाची इच्छा तृप्त झाली नाहीं. तेव्हां गुरूची आज्ञा घेऊन बुवा गिरनार पर्वतावरील दत्तपादुकांचें दर्शन घ्यावयास निघाले. अवधूत वृत्तीनें सर्व मार्ग पायांनींच आक्रमण करून बहुत कष्ट सोसून दत्ताचें प्रत्यक्ष दर्शन घेऊन, परत नाशकास येऊन त्यांनीं गुरूची भेट घेतली.* पुढें निरंजनबुवा कुटुंबांतील मंडळीसह मिरज येथें गेले. तेथें श्रीमंत थोरले बाळासाहेब पटवर्धन यांनीं बुवांचा उपदेश घेतला व त्यांच्या वंशाकडे थोडेंसें उत्पन्नही तोडून दिलें. पुढें लवकरच बुवांनीं चतुर्थाश्रम घेऊन शके १७७७ सालीं भाद्रपद शुद्ध एकादशीस मिरज येथें देह ठेविला. यांस रामकृष्ण, योगिराज, विष्णु आणि वासुदेव असे चार पुत्र होते. पैकीं वडील रामकृष्ण यांचे चिरंजीव वामनराव हे सुमारें १६ वर्षांपूर्वी, ७० वर्षांचे होऊन वारले. त्यांचे चिरंजीव भास्करराव हे १९०३ सालीं मिरज संस्थानांतील मोडनिंब येथें मामलेदार कचेरींत कारकून होते. त्यानंतरची या घराण्याची माहिती मिळाली नाहीं.

निरंजनबुवांनीं "स्वात्मप्रचीति" (ओव्या ५६५) 'साक्षात्कार' (७१०) 'रघुनाथचरित्र' (३९६) 'केशवचैतन्यकथाकल्पतरु' (७६०) अशीं चार मोठीं प्रकरणें लिहिलीं. शिवाय

* ही सर्व माहिती व स्वतःचें प्रवासवर्णन, 'स्वात्मप्रचीति' व 'साक्षात्कार' या आपल्या दोन ग्रंथात बुवांनीं दिली आहे. परंतु ते ग्रंथ माझ्या अवलोकनांत आले नाहींत.

मराठी व हिंदुस्थानीं पदें आणि आरत्या भुपाळ्या वगैरे किरकोळ कविताही बरीच आहे. श्रीज्ञानदेवकृत ' अमृतानुभवा'वरही या कवीनें एक गद्य टीका लिहिली आहे. बुवांच्या कवितेपैकीं ' पतिव्रताख्यान ' ( ओव्या ४३ ), निरंजनपर ओव्या ( ५२ ), ' गोंधळी ' व ' केशवचैतन्यकथाकल्पतरु ' हीं चार प्रकरणें काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत. बुवांचे इतर ग्रंथ मिरजेस त्यांच्या वंशजांपाशीं असतील किंवा मुंबईंतील निर्णयसागर छापखान्यांत असतील. कोठेंही असले तरी ते मिळवून प्रस्तुत चरित्रलेखनाच्या कामीं त्यांचा उपयोग करणें हें कार्य माझ्या आटोक्याबाहेरचें आहे. "स्वात्मप्रचीति" व "साक्षात्कार" या ग्रंथांतले कांहीं उतारे येथें देतां आले असते तर बरें झालें असतें परंतु जी गोष्ट उघड उघड अशक्य तिच्या विषयीं कुरकुर करण्यांत काय हंशील ? अस्तु. ' रघुनाथचरित्र ' या ग्रंथांत, आपले गुरु श्रीरघुनाथभटजी यांचें चरित्र निरंजनबुवानीं दिलें असलें पाहिजे अशी माझी कल्पना आहे. बुवांच्या कवितेसंबंधानें काव्यसंग्रहकर्ते लिहितात, " बुवांची सर्वत्र कविता सोपी, रसाळ, प्रेमळ आणि भक्तिपूर्ण आहे. यांचीं पदें फारच गोड असून मिरज प्रांतीं पुष्कळांच्या पाठांत आहेत. निरंजनबुवांच्या कवितेमध्यें वर सांगितलेल्या कवित्वगुणाशिवाय एक विशेष लक्षांत ठेवण्यासारखी गोष्ट आहे, ती ही कीं ज्या ज्या ठिकाणीं ते गेले व ज्या ज्या पुरुषांचीं दर्शनें त्यानीं घेतलीं त्यांचें व इतर गोष्टींचें वर्णन त्यांनीं खुलासेवार रीतीनें केलें आहे. यामुळें शके १७७३ च्या सुमारास पुण्यापासून नासिकास जाण्याचा व नाशकाहून गिरनारास जाण्याचा त्या वेळचा पायरस्ता, वाटेंतील गांवें व तेथील साधु-

पुरुष आण इतर लोक यासंबंधाचें वर्णन वाचून इतिहासांत किंवा बखरींत वाचावयास न मिळणाऱ्या अशा एका विशिष्ट समाजस्थितीची माहिती आपणास मिळते."

निरंजनबुवांच्या कवितेविषयीं काव्यसंग्रहकर्त्यांनीं दिलेला अभिप्राय किती यथार्थ आहे, हें प्रस्तुत लेखाच्या शेवटीं या कवीच्या ग्रंथांतले जे थोडेसे निवडक वेंचे दिले आहेत, त्यांच्या अवलोकनावरून, वाचकांच्या लक्षांत येईल. केशवचैतन्यकथाकल्पतरु, या ग्रंथांत, तुकारामबुवांचे गुरु बाबाजी चैतन्य यांचे गुरुबंधु केशवचैतन्य यांचें चरित्र दिलें आहे. हा ग्रंथ ' कृष्णदास बैरागी ' कृत ग्रंथाच्या आधारानें आपण लिहिला असें निरंजनबुवांनीं खालील ओव्यांत म्हटलें आहे:—

**कृष्णदास** बैरागी परमभक्त । तेणें वर्णिला हा वृत्तांत ।
शके पंधराशें शहाण्णवांत । ग्रंथ पूर्ण पैं जाला ॥
त्या ग्रंथाचेनि आधारें । बोलीलों वेडीं वांकुडीं उत्तरें ।
परिसोत भावीक भोळे। कृपा करूनि मजलागीं ॥

हा कृष्णदास बैरागी कोणत्या काळीं व स्थळीं होऊन गेला व उपरिनिर्दिष्ट ग्रंथाशिवाय त्यानें आणखी कांहीं ग्रंथ लिहिले होते कीं काय हें समजण्यास कांहीं मार्ग नाहीं. आतां निरंजनकृत ग्रंथांतील कांहीं उतारे येथें देतों.

## पतिव्रताख्यान ( ओव्या )

वेद सर्वांसी आधार । वेद सर्वांचें माहेर ।
वेदाचेनि पैलपार । पावले सर्व ॥ १ ॥
तेथें बुद्धि पतिव्रता । दुबळी होवोनि दुश्चिता ।
गेली सांगावया हिता । आपुलें गुज ॥ २ ॥

वंदोनि श्रुतिमायेसी । सांगे दुःखाचिया राशी ।
ऐक माते, स्त्रीदेहासी । निर्मिलें कोणें ॥३॥
स्त्रियेचा देह अमंगळ । स्त्रीदेह पापासी मूळ ।
स्त्रीदेहाचा विटाळ । मानिती ज्ञानी ॥४॥
स्त्रीदेह हें कोडे घन । स्त्रीचा देह पराधीन ।
स्त्रीदेह उघडें वान । झांकितां नये ॥५॥
मग म्हणे श्रुति आई । ' ऐकलें कीं बुद्धीबाई ।
स्त्रीदेहाची नवाई । सांगतें तुज ॥६॥
**स्त्रीदेह रामाची सीता । रुक्मिणा श्रीकृष्णकांता ।**
**स्त्री द्रुपदाची दुहिता । अहिल्या तारा ॥ ७ ॥**
**वसिष्ठाची अरुंधती । अत्रीची अनसूया सती ।**
ऐशा स्त्रिया धन्य किती । जाल्या त्या सांगूं '॥ ८ ॥
बुद्धि म्हणे ' ऐक माते । धन्य होते त्यांचे भर्ते ।
जोडा माझिया दैवातें । मिळाला कैसा ? ॥ ९ ॥
हातें पायें लंगडा लुळा । नाहीं नाक कान डोळा ।
रूपाचा सोहळा । काय वो सांगूं ? ॥ १० ॥
असो जैसा तैसा तरी । ऐक स्वभावाची परी ।
अविद्या दुराचारी । ठेविली तेणें ॥ ११ ॥
करितां तयेसी संसार । शतावधि जालीं पोरें ।
मन आणि अहंकार । थोरले पुत्र ॥१२॥
त्यांनीं पापाचे पर्वत । उभारिले असंख्यात ।
विषयभोगें उन्मत्त । होवुनी ठेले ॥१३॥
आशा तृष्णा कल्पना । लेकी झाल्या या तुफाना ।
न म्हणती थोर साना । भोगिती सर्व ॥ १४ ॥
काम क्रोधादि लेकुरें । खोडकर अनिवार ।
त्यांनीं हागोनियां घर । नासिलें सर्व ॥ १५ ॥
हृदयाच्या माजघरीं । पति निजतो बिळभरी ।
बरळतो नानापरीं । अविद्यायोगें ॥ १६ ॥
म्हणे जन्मतों मरतों । पाप पुण्यादि भोगितों ।

स्वर्ग नरकासि जातों । वारंवार ॥ १७ ॥
माझें घर, माझें दार, । माझी संपत्ति हे पोर ।
माझा अवघा हा संसार । असावा सदा ॥ १८ ॥
असो आतां मायबाई ! । करूं उपायासी काई ? ।
व्रत आचरोनि पाही । जाळीन देह ॥
श्रुति म्हणे पतिव्रते ! । ऐक लेकी गुणवंत ।
माझें वचन निरुतें । सांगतें तुज ॥ २८ ॥
पतिवांचोनियां व्रता । स्त्रियेनें करूं नये सर्वथा ।
पतियोगें पतिव्रता । धन्य पैं जाल्या ॥ २१ ॥
स्त्रियांचा तो पति देव । व्रतदान पुण्यें सर्व ।
पति स्त्रियेचा तीर्थराव । वंदावा सदा ॥ २२ ॥
पति जाणावा निर्दोष । पाहूं नये त्याचा दोष ।
सदा सर्वदा संतोषें । सेवावा पति ॥ २३ ॥
पति मानावा गणगोत । पति स्त्रीचा परम आप्त ।
पति स्त्रियेचा परमार्थ । जाणावा सर्व ॥ २४ ॥
करितां नित्य पतिसेवा । संतोष वाटतो देवा ।
लक्ष्मी पार्वती देवा । करिती तिचा ॥ २५ ॥
बुद्धि लेकी ! धरीं धीर । माघारी घरासी फीर ।
भर्ताराची निरंतर । करावी सेवा ॥ २६ ॥
वडिल बंधु तुझा सखा । विवेक नेई पाठीराखा ।
करिल अविद्येचा वाखा । देईल घालवुनि ॥ २७ ॥
मन आणि अहंकार । अविद्येचा जो विस्तार ।
करिल तयाचा संहार । विवेक हा ॥ २८ ॥
घेऊनि विवेकाचा फाटा । झाडुनि काढीं चारी वाटा ।
शमदमादि चोखटा । घालीं गे सडा ॥ २९ ॥
मुमुक्षता घेउनि फणी । घालीं त्रिगुणाची वेणी ।
शुद्ध सत्व जीवनीं । सुस्नात होईं ॥ ३० ॥
गुरुभक्ति पातळ चोळी । नेसुनि होईं सोवळी ।
निश्चयाचें कुंकू भाळीं । अक्षयीं लावीं ॥ ३१ ॥

अमानित्वादि भांडार । उघडुनि घाली अलंकार ।
रत्नजडित परिसर । प्रकाशमय ॥ ३२ ॥
सर्व शृंगारा करोनि । जाई पतिसन्निधानीं ।
स्तुतिस्तवना करूनी । उठवीं पति ॥ ३३ ॥
श्रुतिमायेनें कथिलें । सद्बुद्धिनें तैसें केलें ।
स्तवनासि आरंभिलें । वेदांतें करूनी ॥ ३४ ॥
' उठा उठा पतिराया । कैसे भ्रमलांति वांयां ।
जाणा **ईश्वराची** माया । मिथ्या ही सारी ॥ ३५ ॥
तुम्हां नाहीं देह गेह । कैंचा पापपुण्या ठाय ? ।
स्वर्गनरकाची त्राय । फिटली सहजीं ॥ ३६ ॥
तुम्ही निर्गुण निराकार । निर्मळ निश्चळ निराधार ।
अनंत पारावार-। रहित तुम्ही ॥ ३७ ॥
तुम्ही ज्ञानघनानंद । परिपूर्ण असिपद ।
कैंचा वायां करितां खेद । जागे व्हा स्वामी ! ॥ ३८ ॥
ऐसें करितां स्तवन । सांडोनियां जीवपण ।
प्रत्यगात्मा सावधान । होता पैं झाला ॥ ३९ ॥
सद्बुद्धिसी आलिंगुन । पावला तो समाधान ।
जालें पूर्वील स्मरण । त्यालागीं सर्व ॥ ४० ॥
बुद्धिसहवर्तमान । गेला सद्गुरूसि शरण ।
त्याच्यायोगें पूर्णपण । पावता झाला ॥ ४१ ॥
तेथें बुद्धि पतिव्रता । विरूनी गेली सर्वथा ।
करूनी अपुल्या स्वहिता । पावली कीर्ती ॥ ४२ ॥
**पतिव्रता आख्यान** । जें कां करिती स्मरण ।
तेहि होती **निरंजन** । **रघुवीरकृपें** ॥ ४३ ॥

येवढ्या ओंव्यांवरून निरंजनबुवांच्या रचनाशैलीची ओळख वाचकांस होईल असें वाटतें.

---

# श्रीनारायणबोवा जालवणकर.

हे प्रसिद्ध संतकवि सुमारें ४०।५० वर्षांपूर्वी होउन गेले. त्यांचा जन्म शके १७१५ त झाला व शके १७९० आषाढ वद्य ५ मी रोजीं ते समाधिस्थ झाले. हे बाळपणापासूनच कडकडीत वैराग्यसंपन्न होते. त्यांनीं गिरनार पर्वतावर बारा वर्षे राहून तीव्र तपश्चर्या केली व नंतर श्रीदत्तमहाराजानीं त्यांना साक्षात् दर्शन देऊन कृतार्थ केलें. " शाळांत जशा शिक्षणाच्या सोईकरितां सात इयत्ता अथवा कक्षा ठरविल्या आहेत, त्याचप्रमाणें नारायणबुवानीं मुमुक्षूचे निरनिराळे अधिकार लक्षांत आणून सप्तसागर रचिले आहेत; अथवा त्यांनीं हा सात पायऱ्यांचा सोपानच साधकांकरितां तयार केला आहे असें म्हटलें तरी चालेल. हे सप्तसागर व त्यांतील विषय येणेंप्रमाणें:—

१ **ज्ञानसागर** यांत मनुष्याचे चार वर्ग अधिकारपरत्वें सांगून त्याचे कर्तव्याचा विचार केला आहे.

२ **विज्ञानसागर** यांत कर्म व ज्ञान हीं साधनें भगवत्प्राप्तीस अवघड आहेत व भक्ति हेंच साधन सुलभ आहे हें विवरण केलें आहे.

**बोधसागर** यांत सद्गुरूनें मुमुक्षूस केलेला उपदेश दिला आहे.

४ **कैवल्यसागर**—यांत तोच उपदेश अधिक विस्तारानें व आधार दाखवून केला आहे. या ग्रंथासारखे—आत्मस्वरूपबोध करून देणारे ग्रंथ मराठी भाषेंत फार थोडे आहेत.

५ **आनंदसागर**—यांत स्वरूपानंदाचें वर्णन आहे.

६ **शांतिसागर**—यांत अपरोक्षनिष्ठ व शांत पुरुषांचीं लक्षणें सांगितलीं आहेत.

७ **करुणासागर**—यांत शेवटीं भगवद्भक्तानें भगवंताची करुणा भाकली आहे.

नारायणमहाराजांचे हे सर्व ग्रंथ ओवीबद्ध आहेत. यांतील बहुतेक ग्रंथ छापून प्रसिद्ध झालेले आहेत. या सप्तसागरांपैकीं करुणासागर हा ग्रंथ फार मोठा व चित्तवेधक आहे. त्याचे दोन खंड **असून** पूर्वार्धांत १८९३ ओव्या आहेत. उत्तरार्धांत १५७७९ ओव्या असून तो अपूर्णच राहिला आहे ! पूर्वार्धाचे शेवटीं बुवा म्हणतात:—

निरंजनाच चरण । भावें वंदी नारायण ।
पूर्वार्ध झाला संपूर्ण । भाविकांचा हितकर्ता ॥ १८९२ ॥
जे का भावें वाचिती । त्यांचे मनोरथ ऐसेचि पुरती ।
जैसे माझे श्रीपती । पुरविता झाला निजांगें ॥ १८९३ ॥

या ग्रंथाची एकच प्रत बडोदें येथें श्रीमंत कृष्णराव रघुनाथ धारकर यांचे घरीं असल्याचें 'मुमक्षु' पत्रांतील लेखावरून समजतें. श्री. कृष्णराव यांचे तीर्थरूप रघुनाथ बापूजी ऊर्फ भाऊसाहेब हे श्रीगुरु नारायणमहाराज यांचे परम अधिकारी शिष्य होते. त्यांनीं मोठया आस्थेनें उत्तम लेखकाकडून जाड व टिकाऊ कागदावर करुणासागर ग्रंथाची प्रत करवून आपले संग्रहीं ठेवली आहे. समग्र ग्रंथांत एकंदर ओवीसंख्या १७६७२ आहे,* ह्मणजे हा ग्रंथ जवळ जवळ श्रीमद्भागवताएवढा आहे. तो अद्याप अप्रकाशित आहे, हें सांगावयास नकोच. श्रीनारायणबोवा यांचे शिष्यप्रशिष्य काशी,

---

* ता. २ जून १९१० च्या 'मुमुक्षु' च्या अंकांत रा. रा. काशीनाथ बापू लेले यांनीं "नारायणमहाराजांचे ग्रंथ" हा लेख प्रसिद्ध केला आहे, त्यांतून ही माहिती घेतली आहे.

लष्कर, भेलसा, धार, देवास, पुणें इत्यादि ठिकाणीं आहेत, त्यांपैकीं एखाद्यानें महाराजांची समग्र कविता मिळवून ती पुण्या मुंबईंतील एखाद्या प्रकाशकाकडून प्रकाशित करविल्यास आपल्या सद्गुरूच्या ऋणांतून अंशतः तरी उतराई झाल्याचें श्रेय त्यास मिळेल.

वरील ग्रंथांशिवाय गुरुपादुकाष्टक, चिद्रत्नमाला, बोधाष्टक, विचारमाला, निर्वाणपंचक वगैरे अनेक स्फुटप्रकरणें महाराजानीं लिहिलीं आहेत व तीं मुमुक्षु पत्रांत व काव्यसंग्रहांत प्रसिद्ध झालीं आहेत. शिवाय अभंग पदें वगैरे बरींच आहेत. नारायणमहाराजांचे शिष्य **श्रीलक्ष्मणमहाराज** हे इंदूर येथें होते. त्यांचा तेथें एक मठ आहे. तेथें त्यांचें शिष्यमंडळ आहे, त्यांजपाशीं महाराजांचे कवितेचा बराच मोठा संग्रह आहे. लक्ष्मणमहाराजांचे शिष्य **बलभीम महाराज साडेकर** हे पुण्यपुरुष थोड्या वर्षांपूर्वी समाधिस्थ झाले.

नारायण महाराजाचें कुलशील, वास्तव्यस्थान वगैरे बाबतींत विशेष माहिती मिळाली नाहीं. त्यांनीं आपल्या गुरूचा ' निरंजन ' या नांवानें उल्लेख केला आहे. प्रस्तुत ग्रंथांत ज्या निरंचनबुवांचें चरित्र दिलें आहे, तेच हे ' निरंजन ' असावेत, असें वाटतें; कारण दोघांनींही गिरनार पर्वतावर तपश्चर्या केली होती व तेथें दोघांसही श्रीदत्तदर्शन झाल्याचा उल्लेख आढळतो.

नारायण महाराजांची कविता फार साधी, सुलभ आणि अध्यात्मज्ञानपरिपूर्ण आहे. पुढील उतारे पहा:—

**निर्वाणपंचक** ( श्लोक )

निर्वाणबोधरवि हृत्कमळीं उदेला ।
मायांधकार सविकार विकल्प गेला ॥
तो द्वैतदुःखशिण अंतरिंचा निवाला ।

आरण्य घोर गृह थोर समान त्याला ॥ १ ॥
निर्वाणशुद्ध निजबुद्ध पदावलंबी ।
लोकीं असोनि परिवार नस कुटुंबी ॥
विद्याविरोध जड सत्स्वरुपीं निवाला ।
आरण्य घोर गृह थोर समान त्याला ॥ २ ॥
निर्वाण निर्मल निरंजन वीतरागी ।
आनंदकंद सर्मचिद्घन राजयोगी ॥
भोगीं न भोग न वियोग असे जयाला ।
आरण्य घोर गृह थोर समान त्याला ॥ ३ ॥
निर्वाण धर्म निजधर्म–विवेक जाणे ।
श्रौतादि कर्म, न लगेचि विधिप्रमाणें ॥
भावी न भूत हृदयीं करणें जयाला ।
आरण्य घोर गृह थोर समान त्याला ॥ ४ ॥
निर्वाण शांतिसुख शीतळ मौन बोले ।
योगाधिराज परिपूर्ण सुखांत डोले ॥
राहे सदा सहज भाव अभाव गेला ।
आरण्य घोर गृह थोर समान त्याला ॥ ५ ॥
निर्वाणपंचक भवभ्रमनाशकारी ।
भक्त्या गुरोर्मुख विनिर्गत जो विचारी ॥
**नारायणा**धिपति दत्त मनीं विराजे ।
त्या योग भोग वन पत्तन एक भासे ॥ ६ ॥

## करुणापर अभंग.

———:०:———

(१)

तुझे हातीं दिले हात । नको करूं माझा घात ॥ १ ॥
तुझे पायीं माथा । ठेवियेला सद्गुरुनाथा ॥ २ ॥
कैसा तरी तुझा । अंगिकार करीं माझा ॥ ३ ॥
भेट देई **नारायणा** । दत्त देवा निरंजना ॥ ४ ॥

( २ )

माझे अपराध कोटी । सर्व देवा घालीं पोटी ॥ १ ॥
मी तों पातकाची खाण । नाम पतितपावन ॥ २ ॥
देवा कृपेच्या सागरा । नको होऊं पाठमोरा ॥ ३ ॥
**नारायण** मारी हांका । दत्त देवा दावीं मुखा ॥ ४ ॥

( ३ )

कांहीं घडेना साधन । कैसे दाविसी चरण ॥ १ ॥
काय करूं कोठें जाऊं । कैसे तुझे पाय पाहूं ॥ २ ॥
कधीं येसी वाट पाहें । धांव आतां सद्गुरुमाये ॥ ३ ॥
तुजवीण राहवेना । दत्त देवा **नारायणा** ॥ ४ ॥

## सद्गुरुपर अभंग.

———:०:———

( १ )

धरी सद्गुरूचे पाय । पुन्हां जन्म तया नोहे ॥ १ ॥
जो कां सद्गुरूचा दास । तया परब्रह्मीं वास ॥ २ ॥
ज्याचा सद्गुरू सोयरा । त्याचे मोक्ष रावे घरा ॥ ३ ॥
गुज सांगे **नारायण** । गुरू तोची निरंजन ॥ ४ ॥

( २ )

गुरु नाहीं ओळखिला । त्याचा जन्म व्यर्थ गेला ॥ १ ॥
जो कां सद्गुरुविन्मुख । तया जन्मांजन्मीं दुःख ॥ २ ॥
नाहीं सद्गुरूचा थार । त्याचा भूमीलागीं भार ॥ ३ ॥
**नारायण** त्रिभुवनीं । गुरु निरजन धनी ॥ ४ ॥

( ३ )

नको साधनाचें श्रम । मुखीं सद्गुरूचें नाम ॥ १ ॥
तीर्थी धाऊनियां काय । धरीं सद्गुरूचे पाय ॥ २ ॥
सोडीं कर्म आटाआटी । घेईं सद्गुरूची भेटी ॥ ३ ॥
**नारायण** चित्त वित्त । सर्व कांहीं गुरुदत्त ॥ ४ ॥

( ४ )

एक सद्गुरू तो सखा । जन संबंधी पारखा ॥ १ ॥
करी सद्गुरूचा संग । तेणें होय भवभंग ॥ २ ॥
होतां सद्गुरुची कृपा । घरीं मोक्ष राबे फुका ॥ ३ ॥
दत्ताचिया संगें । **नारायण** धाला अंगें ॥ ४ ॥

---

## पदें

( १ )

धरिं रामचरणा जग बडबडुं दे ॥ धरिं० ॥ ध्रु० ॥
रामभजन अति प्रेमळ पाहुनि,
मनिं तडफडि त्यासि तडफडुं दे ॥ धरिं० ॥ १ ॥
पाहुनि कुजन छळण खळनिंदा,
मनिं गडबडि त्यासि गडबडुं दे ॥ धरिं० ॥ २ ॥
संसृतिसुखदुःख सोसुनि अंगें,
नभ कडकडि तरि कडकडुं दे ॥ धरिं ॥ ३ ॥
**नारायण**गुरुसेवा करितां,
तनु धडधडि तरि धडधडुं दे ॥ धरिं० ॥ ४ ॥

( २ )

हरिहर गुरुराज भजा यमपुरिभय वारा ॥ ध्रु० ॥
प्रेमें हरिध्यान धरुनि नारायण बोला ।
संग त्यजुनि सगुण भजुनि रंग डंग डोला ॥ १ ॥
विषय दुःखरूप सकळ तुच्छ भोग त्यागा ।
सद्गुरुपदकमल नमुनि अचळदान मागा ॥ ॥ २ ॥
दारुण भय घोर पंथिं थोर दुःख झालें ।
कष्टुनि जड कर्म करुनि जन्मुनि बहु गेले ॥ ३ ॥
कर्म सांग घडे ऐसें पुण्य गांठिं जोडा ।
**नारायण** परंधाम सद्गुरुपद जोडा ॥ ४ ॥

( ३ )

चाल चाल रे मना वना जाऊं । रम्य काननिं एकटे सुखी राहूं ॥ ध्रु० ॥
पुण्यारण्याची महाशोभा पाहूं । शोभा पहातां श्रीहरिगुण गाऊं ।
वन्य तरुंचीं सुपर्ण फळें खाऊं । इच्छाविहारी त्या मृगांसंगें धावूं ॥ १ ॥
दिव्यसरितांचें जळ तृष्णाहारी । मलय मारुत हा स्वयें वारा वारी ।
पर्णशय्येतें मृदु निद्रा करीं । स्थिर राहें अंतरीं धीर धरीं ॥ २ ॥
रात्रि लावूं सोज्वळ चंद्रदीप । विरक्ति कांतेचें पाहुं गौररूप ।
रूप पहातां आलिंगि आपोआप । दूर करीते स्वयें सर्व ताप ॥ ३ ॥
ऐशा सुखाची त्या वनीं आहे खाण । तेथें राहतां सांपडे त्याचि खूण ।
नेटें बोटें दाखवी **नारायण** । अंगें भेटवि तो सखा निरंजन ॥ ४ ॥

## बोधाष्टक (श्लोक)

नानाशास्त्र पुराण वेद पाहतां नानागुणीं गुंतले,
नानायोग तपें व्रतें मख सदाचारी उभे ठाकले ।
नानानां स्वहिता हरीसि मुकले ते सर्वथा त्यागणें,
ब्रह्मानंद अगाध चिन्मय सुधासाम्राज्य तें भोगणें ॥ १ ॥
नाना वेष धरूनियां विचरती जे संत साधू भले
नाना मत्त मतांतरें बहुपरी सन्मार्ग सांगीतले ।
ते नाना भ्रमरूप त्यागुनि महावाक्यार्थ तो शोधणें,
ब्रह्मानंद अगाध... ... ... ... ॥ २ ॥
नाना तर्क वितर्क वाद श्रवणीं ऐकूनियां अंतरीं,
त्याचा क्षोभ न लोभही न उठतां तूं स्वस्थ राहीं घरीं ।
सर्वात्मा परिपूर्ण तूंच असशी तूतें न कांहीं उणें,
ब्रह्मानंद अगाध... ... ... ... ... ॥ ३ ॥
जें जें रूप दिसे तुला नयनिं ज्या नामासिहि ऐकसी,
जें जें तूं स्मरसी मनें करुनियां चित्तांतही चिंतिसी ।
तें तें सर्व नसे असें समजुनी स्वच्छंदते राहणें,
ब्रह्मानंद अगाध... ... ... ... ॥ ४ ॥
तूतें देह नसे शुभाशुभ कदा तत्कर्म तेंही नसे,

ऐसें हें निजमानसीं समजतां प्रारब्धरेषा पुसे ।
शुद्धात्मा विलसे सदा त्रिभुवनीं अद्वैत तें पाहणें,
ब्रह्मानंद अगाध... ... ... ... ॥ ५ ॥
तूं गंभीर सुधासमुद्र अससी जाणें न येणें तुला,
सत्ताही अवघी तुझीच परि तूं सर्वांहुनी वेगळा ।
नाना दुःखविकार काम नसतां कां दैन्यवाणें जिणें,
ब्रह्मानंद अगाध... ... ... ॥ ६ ॥
जेथें भाव अभावही न विलसे जाणीव नाहीं कदां,
ते सत्चित्घनब्रह्मव्यापक असा तूं शांत राहीं सदा ।
तेथें हा जडभास वाव अवघा ना पाहतां पाहणें,
ब्रह्मानंद अगाध... ... ... ॥ ७ ॥
नित्यानंद अनादि पार न दिसे आलंब नाहीं जया ।
आपेंआप नभासि गाळुनि सुखें अंगेंच पाही तया ।
जेथें भीषण द्वारपें तदुपरी जे राहिलें त्या खुणें,
ब्रह्मानंद अगाध ... ... ... ॥ ८ ॥
ध्याता ध्यान समाधि योगहि कदा ती धारणाही नसे,
तो **नारायण** त्या निरंजनपदीं साम्राज्य भोगीतसे ।
हें बोधाष्टक ऐकतीं निजमुखें गाती स्वयें जे सदां,
त्यांतें हे भवदुःखरूप रचना कांहीं न बाधी कदा ॥ ९ ॥

## संतपर अभंग.



१

देव तोचि संत, संत तेच देव । येथें दुजाभाव नाहीं कांहीं ॥ १ ॥
देव नाम त्याचें संतनाम त्यांचें । परब्रह्म साचें एकचि तें ॥ २ ॥
कोणी म्हणती देव, कोणी म्हणती संत । परि ते भावातीत परब्रह्म ॥ ३ ॥
संताचे चरण सेवी **नारायण** । देव निरंजन संतचि तो ॥ ४ ॥

२

संताच्या दारींचा होईन उंबरा । ऐसें रघुवीरा करीं मज ॥ १ ॥
येतां जातां त्याचे लागतील पाय । ऐसें रघुराय करीं मज ॥ २ ॥

संतचरणाची होईन वहाण । ऐसें दयाघन करीं मज ॥ ३ ॥
मागे हेंचि दान भावें **नारायण** । अंगें निरंजन देई आतां ॥ ४ ॥

( ३ )

संतचरणतीर्थी करीन आंघोळी । ऐसें वनमाळी करीं मज ॥ १ ॥
संतचरणरजामाजी मी लोळेन ॥ ऐसें नारायणा करीं मज ॥ २ ॥
संतचरणसेवा घडो मज देवा । ऐसें तूं केशवा करीं वेगीं ॥ ३ ॥
ह्मणे **नारायण** गुरू निरंजन । दास ह्मणवीन संतांचा मी ॥ ४ ॥

( ४ )

संताचियापुढें होईन खेळता । वचन बोलतां ऐसें करीं ॥ १ ॥
संत मज देवा धरिती पोटेसी । ऐसें हृषीकेशी करीं मज ॥ २ ॥
संत मज देवा ह्मणतील अपुला । ऐसें घननीळा करीं मज ॥ ३ ॥
संत मजलागीं करिती ब्रह्मबोध । ऐसा ब्रह्मानंद करीं देवा ॥ ४ ॥
संतालागीं माझा असो अभिमान । ह्मणे **नारायण** निरंजना ॥ ५ ॥

( ५ )

संत मायबाप हरती पापताप । ब्रह्म आपेआप स्वयंभ ते ॥ १ ॥
संतांचें वंदन दुःखाचें खंडण । काळाचें दंडण जयांचेनी ॥ २ ॥
संतीं उपकार केला विश्वावर । जगाचा उद्धार केला अंगें ॥ ३ ॥
ह्मणे **नारायण** सांगे निरंजन । संतसेवा जाण नेमधर्म ॥ ४ ॥

( ६ )

शास्त्रांचा आधार देवांचा बाजार । कर्मांचा जोजार वाहे माथां ॥ १ ॥
खर्चिला धर्माचा रोकडा पयका । उधारचि देखा जिन्नस तो ॥ २ ॥
सद्‌गुरुविन्मुख राहोनियां काय । श्रमविली माय व्यर्थचि ते ॥ ३ ॥
सखा निरंजन बोले **नारायण** । अंतरींची खूण सांगतसे॥ ४ ॥

## श्लोक.

प्रापंचीं ममता कधीं धरुं नको, लोभांत गुंतूं नको ।
लोकीं तूं खळ दुष्ट नष्ट, भलत्या संगांत बैसूं नको ॥

काहीं कम करूं नको, गुरुमहापंथासि मोडूं नको ।
जो कोणी भवदुःख सर्व निरसी तो देव सोडूं नको ॥ १ ॥
संसारीं असतां प्रवाहपतितद्वंद्वांसि त्रासूं नको ।
खेदाखेद मनांत आणुनि वनीं जाणें विचारूं नको ॥
कर्णीं दुष्ट कठोर शब्द पडती तें दुःख मानूं न को ।
भोगें दुःखसुखादि सारुनि निजानंदास भंगूं नको ॥ २ ॥
लाभीं हर्ष नको, विषादहि नको, निंदा प्रशंसा नको ।
हानीचा मनिं शोक तूं धरुं नको, देहीं अहंता नको ॥
कोणाचें इतिकृत्य तें स्मरुं नको, माझें तुझें हें नको ।
आप्तासी ममता नको गुरुपरब्रम्हासि सोडूं नको ॥ ३ ॥
प्रारब्धीं सुखभोगयोग नसतां तें दैन्य मानूं नको ।
इंद्रासी बहु संपदा गणुं नको, क्षुद्रार्थ वांछूं नको ॥
देहाचें कृतकर्म दुःख अपुलें कोणास सांगूं नको ।
भूलोकांत महाप्रसंग पडतां तूं सत्व सोडूं नको ॥ ४ ॥
मायामोह नको, सुसंग असतां सोडूनि जाऊं नको ।
चिंताशोक नको, परार्थ करितां लोकांस लाजूं नको ॥
वर्मोच्चार नको, जनांत बसतां गोष्टी भवाच्या नको ।
चित्तीं राग नको अनावर, खरें वैराग्य सोडूं नको ॥ ५ ॥

इतक्या उताऱ्यांवरून नारायण महाराजांच्या कवितेचें स्वरूप वाचकांच्या लक्ष्यांत येईल. एकांतवासाची व सृष्टिसौंदर्याची महाराजांस किती आवड होती हें ‘ चाल चाल रे मना वना जाऊं ’ ह्या पदावरून उघड दिसतें.

———

# मौनीस्वामी.

मौनीस्वामी या नांवाचे अनेक सत्पुरुष हिंदुस्थानांत आजवर होऊन गेले. नरसोबाची वाडी, काशी, कोल्हापूर, हरिद्वार, कल्याण व मुंबई या ठिकाणीं एक मौनीस्वामी निरनिराळ्या कालीं विद्यमान होते. प्रस्तुत चरित्रनायक मौनीस्वामी हे कवि असून, ते थोड्या वर्षांपूर्वी मुंबई शहरीं होऊन गेले. " न मौनी मुकतां याति न मौनी दुग्धलालसः न मौनी व्रतनिष्ठोपि मौनी तल्लीनमानसः" अशा प्रकारचे हे मौनीस्वामी होते. नासिक जिल्ह्यांत सिन्नर ) ब्रम्हपुरी ) हें गांव प्रसिद्ध आहे. तेथें सरस्वती नामक मुख्य नदी असून, शिवनदी व देवनदी नामक दोन लहान नद्या आहेत. सिन्नर येथें ब्रह्मदेवाची एक खंडित मूर्ती असल्यामुळें त्या गांवचें मूळ नांव ब्रह्मपुरी असें होतें. या गांवीं भिकाराम उद्धव नामक एक देशस्थ शुक्ल यजुर्वेदी, भारद्वाज गोत्री ब्राम्हण गृहस्थ रहात असत. ते गांवचे वतनदार देशपांडे व कुलकर्णी असून त्यांचें आडनांव पारखी होतें.

---

१ हें स्थल पुरातन सिद्धस्थान आहे. देवालयास लागूनच धर्मशाळा आहे. सिन्नर गांव नासिक–पुणें सडकेवर असल्यानें उत्तरेकडून रामेश्वराकडे गोसावी बैरागी याच गांवावरून जातात. या लोकांसाठीं तेथें धर्मशाळेची व सदावर्ताची सोय आहे. भैरवपीठामुळें या गांवी सर्पदंशानें कोणी मृत होत नाहीं असें सांगतात. " जात्वत्कालपर्यंत श्वासोच्छ्वास चालू आहे, तात्वत्कालपर्यंत कोणताही सर्पदंशित प्राणी, भैरवाच्या देवालयांत नेऊन ठेवला असतां दोन तीन प्रहरांत साफ बरा होतो. शूद्र पुजारी देवाचा अंगारा त्यास लावतो; व अंगावरून मोरपिसांचा कुंचा फिरवितो. मग पांच दहा शेर वजनाचा एखादा दगड त्याजवरून उतरून टाकतात व त्याचे भारंभार गळ बांधीत त्याला वाजत गाजत घरीं नेतात ! "

त्यांची पत्नी सौ. सत्यभामाबाई हिचे उदरीं शके १७०४-०५ सालीं मौनिस्वामींचें जन्म झालें. बाल्य संपल्यावर, विद्यार्थिदशेंत त्यांनीं, त्या कालच्या सामान्य शिक्षणपद्धतीप्रमाणें, मोडी बालबोध लिहिणें, गणित, हिशेब, इत्यादि विषयांचें शिक्षण संपादन केलें. त्यांचें मोडी व बाळबोध अक्षर चांगलें वळणदार होतें. स्वामींचे तर्थिरूप, पूर्वी पेशवाईत मेंढयांवर कर असे, त्यावर मामलेदार होते. पुढें त्यांनीं संन्यास घेऊन समाधि घेतली. त्यांची समाधि सिन्नर येथें सरस्वती नदीतीरीं श्रीभैरवनाथमंदिराजवळ आहे.

यांचें पूर्वाश्रमींचें नांव नारायण. त्यांस नारो भिकाजी असें ह्मणत असत. शेवटच्या बाजीरावाच्या कारकीर्दीत हे नारो भिकाजी पुणें येथें दफ्तरदार होते. त्यांना पेशव्यांकडून पालखी व अबदागीर मिळाली होती. अबदागीर त्यांच्या वंशजांपाशीं अद्याप आहे. पुढें इंग्रजी अंमल सुरू झाल्यावर शेवटचे बाजीराव पुण्याहून ब्रह्मावर्तास गेले तेव्हां नारो भिकाजी यांस रजा मिळाली. ते पेशवाईत अंमलदार होते ही गोष्ट लक्षांत घेऊन इंग्रजांनीं त्यांस जामनेर येथें एका हुद्द्यावर नेमिलें. तेथें असतांना, एके दिवशीं त्यांस स्वप्नांत दृष्टांत होऊन, सद्गुरूंनीं यतिवेषानें दर्शन दिलें.

> " **रघुनाथ** माउली गुरू रघुनाथ हे माउली ।
> यतीश्वराचे वेषानें जामनेरीं भेटली. "

अशा शब्दांनीं, या प्रसंगाचें वर्णन त्यांनीं एका पद्यांत केलें आहे. गुरुदर्शन होतांच फडणविशीच्या जागेचा त्यांनीं तात्काळ राजीनामा दिला व नासिक येथें जाऊन, तेथील प्रसिद्ध सत्पुरुष श्रीरघुनाथ भटजी महाराज यांस ते शरण गेले. या रघुनाथ भटजींचें चरित्र

छापून प्रसिद्ध झालें आहे. त्यांचा मठ व समाधि नासिक येथें गोदातीरीं असून शेजारीं भव्य सभामंडप आहे. मंडपांत एक संस्कृत पाठशाळा आहे. श्रीमंत विंचूरकर यांजकडून पूजा, नैवेद्य, नंदादीप वगैरे व्यवस्था चालू आहे. हे रघुनाथ भटजी पूर्वाश्रमीं, बेळगांव जिल्ह्यांत मलयप्रभा नदीतरीं कुलकुंभी गांवीं रहात असत. ते जातीनें कऱ्हाडे ब्राह्मण असून त्यांचें आडनांव पित्रे होतें. त्यांनीं त्र्यंबक येथें बारा वर्षें अनुष्ठान केलें; व नंतर त्यांस साक्षात् श्रीदत्तात्रयदर्शन होऊन, त्यांचा अनुग्रहही झाला. हे सिद्ध योगी होते. प्रसिद्ध संस्कृत पंडित अच्युतराय मोडक व प्रस्तुत चरित्रनायक मौनीस्वामी हे त्यांचे शिष्य होत. अनगांव कवाडकर चिद्घनस्वामी ( सखारामबुवा ) हेही त्यांचेच शिष्य; परंतु त्यांस त्यांचा प्रत्येक्ष उपदेश झाला नसून तो स्वप्नांत झाला होता, असें सांगतात. रघुनाथ भटजींच्या उपरिनिर्दिष्ट चरित्रांत मौनी स्वामीचा उल्लेख आहे.

गुरु-परंपरा:—श्रीदत्तात्रेयांचे शिष्य रघुनाथ भटजी व त्यांचे शिष्य मौनीस्वामी यामुळें यांच्या नांवाचा उल्लेख भजनांत " दत्त दिगंबर जय रघुनाथ । गुरुवर स्वामी मौनीनाथ " अशा रीतीनें केला जातो. रघुनाथ भटजी समाधिस्थ झाल्यावर मौनीनाथ स्वामी नासिकहून आपल्या सिन्नर गांवीं गेले. तेथें सांसारिक उपाधी टाळण्यासाठीं त्यांनीं तीन चार वर्षें मौन धारण केलें व त्यामुळें त्यांस मौनी हें नांव प्राप्त झालें. नंतर स्वामी मुंबईस गेले व तेथें त्यांनीं भक्तिमार्गाचा प्रसार केला. शिष्यसंप्रदाय वाढला व नित्य भजनपूजन, पुराणश्रवण होऊं लागलें. परंतु मध्येंच

त्यांचें कुटुंब निवर्तल्यामुळें गृहभंग होऊन स्वामींनीं संन्यास घेतला. माघशुद्ध ११ बुधवार शके १७६८ पराभव नाम संवत्सरे (ता. २७ जानेवारी सन १८४७ ) रोजीं, मुंबईत समुद्रतीरीं, श्रीवालुकेश्वरासमीप, बाणगंगा तीर्थी त्यांनीं विद्वत् संन्यासदीक्षा घेतली.

मौनीस्वामी हे साक्षात्कारी, राजयोगी, ब्रह्मज्ञानी असून कवीही होते. मौनीस्वामीस एक वडील बंधु मात्र होते, त्यांचें नांव आतेजी भिकाजी. त्यांस शंकर नांवाचा पुत्र होता, त्याच्या पश्चात् वंश खुंटला. श्रीमौनीनाथांस दोन पुत्र होते; थोरल्या मुलाचें नांव शिवराम तात्या व धाकट्याचें वामनराव आप्पा. याशिवाय त्यांस, भागीरथी, कृष्णा, व गंगा अशा तीन मुली होत्या. शिवराम तात्या व वामनराव आप्पा हे विद्वान् असून पुराण सांगत असत; व त्यांनीं कांहीं शिष्यही केले होते. वामनराव आप्पा यांनीं बरीच कविताही केली असून, ती त्यांच्या विद्वान् चिरंजीवांनीं 'काव्यकोष' या नांवानें नुकतीच प्रसिद्ध केली आहे. ह्या वामनरावांचें चरित्र याच भागांत दुसरीकडे दिलें आहे. असो.

मौनीस्वामींनीं संन्यास घेतल्यावर ते नासिक क्षेत्रीं गेले व तेथें श्रीब्रम्हानंद सरस्वती स्वामीपासून संन्यास दीक्षा दंडग्रहणपूर्वक यथाविधि धारण केली. त्या वेळीं त्यांचें नामाभिधान "श्रीनारायणेंद्र सरस्वतीस्वामी" असें ठेवण्यांत आलें. त्या वेळीं त्यांचें वय सुमारें ६३ वर्षांचें होतें. या वयांत त्यांनीं प्रस्थानत्रयी अवलोकन केली. त्यांच्या शिष्यवृंदानें त्यांस पुनः मुंबईस नेलें व तेथें सकाळ संध्याकाळ पुराणसत्र पुनः सुरू झालें. पंचदशी, शंकरानंदी गीताटीका, अपरो-

क्षानुभूति, शतश्लोकी भागवत, वाक्यवृत्ति ह्या संस्कृत; एकनाथी भागवत, दासबोध, ज्ञानेश्वरी, विवेकसिंधु, परमामृत, ह्या प्राकृत; व विचारसागर, मोक्षपंथ, सुंदरविलास, वृत्तिप्रभाकर या हिंदी ग्रंथांचें व्याख्यान स्वामी करीत असत. काशीपासून रामेश्वरापर्यंत स्वामींचे अनेक शिष्य होते; व त्यांत कांहीं मोठमोठे विद्वान् शास्त्री, पुराणिक, हरिदास वगैरेही होते.

राजयोग समाधिः—स्वामी राजयोगी होते हें पूर्वीं सांगितलेंच आहे. तीनपासून सात दिवसपर्यंत ते सारखी समाधि लावून बसत. नासिक वगैरे ठिकाणच्या कांहीं लोकांनीं छलबुद्धीनें मुद्दाम पहारे वगैरे ठेवून त्यांच्या समाधीच्या खरेपणाची परीक्षा पाहिली होती. महाराजांच्या समाधीविषयीं, रा. मनसुखराम सूरजराम त्रिपाठीकृत गोकुळदासजी झाला यांच्या चरित्रांत उल्लेख आला आहे. मुंबईंतील पुष्कळ मोठमोठे गृहस्थ स्वामींचे शिष्य होते. श्री. धुंडीराज विनायक बिवलकर, श्री. उमाबाई साहेब बिवलकर, श्रीधर विठ्ठल दाते, बाळाजी पांडुरंग, शांताराम नारायण वकील, नारायण दाभोळकर, महादेव चिमणाजी आपटे, डॉ. कुंटे, डॉ. भाऊ दाजी, डॉ. आत्माराम, मैराळ शास्त्री, आप्पा शास्त्री खाडीलकर, डॉ. शांताराम विठ्ठल संझगिरी, महादेव शास्त्री अमरापूरकर, कृष्णशास्त्री महाबळ, विश्वनाथ नारायण मंडलीक, नाना शंकर शेट, वगैरे थोर थोर शेंकडो गृहस्थांस स्वामीच्या योगविद्यानैपुण्याचा अनुभव आला होता. आपल्या समाधीचा भंग होणें स्वामीस आवडत नसे. त्यांस एकदां एक गृहस्थ म्हणाले “ महाराज, आपण समाधि लावून

असतां, पण त्यामुळें, पुस्तकांचें फेरिस्त करण्याचें काम हल्लीं सुरू केलें आहे, तें तसेंच राहतें; व दुसऱ्या कामासही हरकत होते." दुसऱ्या एका प्रसंगीं, ते समाधिस्थ असतां त्यांस कोणी बळेंच हाक मारून जागृत केलें तेव्हां दिंडी वृत्तांत " मौनी म्हणे हो नका झोंप मोडूं । ब्रम्हानंदाची तार नका तोडूं " असे उद्गार त्यांनीं काढिले. शेट कानजी खेतजी यांनीं स्वामीस एक लक्ष रुपयांची रकम अर्पण केली होती व त्यांनींच स्वामीच्या आज्ञेप्रमाणें तिचा व्यय केला. सदर रकमेंतून नासिक येथें श्रीमद्भागवताचा अष्टोत्तरशत सप्ताह केला. नासिक, प्रयाग, द्वारका वगैरे ठिकाणीं धर्मशाळा बांधल्या व पुढें, शेटजींस संतति नसल्यानें, त्यांच्या मिळकतीचें उत्पन्न धर्मार्थ अन्नसत्रें व सदावर्तें स्थापून, त्यांच्या खर्चाकडे लावून दिलें. ही व्यवस्था हा कालपावेतों सुरळीतपणें चालू आहे. शेट कानजी यांनीं आपल्या मृत्युपत्रांत, स्वामीच्या उत्तरकार्यांप्रीत्यर्थ १००० रुपयांची रकम लिहून ठेवली होती परंतु पुढें त्यांच्या पत्नीनें ती रकम देऊन वर आणखी बरीच मोठी रकम दिली. आरंभीं पुनर्विवाहास प्रतिकूल असलेले व नंतर त्या सुधारणेचे कट्टे पुरस्कर्ते झालेले गणेश शास्त्री मालवणकर हे स्वामीचे शिष्य होते व आरंभीं स्वामीच्या कविता त्यांनींच छापून प्रसिद्ध केल्या. केशव मोरेश्वर बर्वे ( अलिबाग ) हे स्वामीचे शिष्य अद्याप विद्यमान असून, दरसाल पुण्यतिथीस येऊन द्रव्यद्वारें मदत करितात.

रामबुवा, ज्ञानमठ, बडोदें:-हे रामबुवा मौनीनाथांचें एकनिष्ठ शिष्य असून त्यांस रामगुरु बैरागी असें ह्मणत असत. त्यांनीं पूर्वाश्रमांतच

सिन्नर येथें जाऊन स्वामीचा अनुग्रह घेतला व गुरु आणि गुरुपत्नी यांची सेवा केली. हे ब्रह्मचारी असून निस्सीम रामोपासक होते. ते जातीनें पंचगौडांपैकीं असून स्वामी त्यांस फार मानीत असत. त्यांजविषयीं बोलतांना स्वामी आपल्या पत्नीस ह्मणत असत " ह्यांस गृहकृत्य, कामकाज वगैरे कांहीं करूं देऊं नको. हे पूज्य आहेत; यांस वंदन करीत जा. " पुढें हे रामबुवा स्वामींबरोबर मुंबईस येऊन श्रीवालुकेश्वरीं राहिले. जनसंमर्दाची उपाधि त्यांस खपत नसे. फक्त प्रातःकालीं गुरुदर्शनास व उपदेशश्रवणास ते येत असत. येतांना चौपाटीवर लांकडें उचलणारे हमाल " हैले माली, हैली माली " म्हणत, त्यांस, त्या शब्दांऐवजीं " राम राम " म्हणा असें रामबुवांनीं सांगावें. पहिल्या पहिल्यानें हमालांनीं त्यांचें सांगणें ऐकलें नाहीं; परंतु पुढें जेव्हां रामबुवांनीं त्यांस साष्टांग नमस्कार घालून प्रार्थना केली तेव्हां ते राम राम म्हणूं लागले. पुढें असें झालें कीं, रामबुवांस येतांना पाहतांच ते हमाल रामनामाचा घोष करूं लागले. असो. पुढें कांहीं दिवसांनीं मौनीनाथांनीं दक्षिण यात्रा करण्याचा आपला मनोदय रामबुवांस कळविला तेव्हां बुवा परत बडोद्यास गेले. त्यांची भक्तिज्ञानवैराग्यसंपन्नता पाहून बडोदें येथील पुष्कळ लोक त्यांचे शिष्य झाले. बापूबुवा ब्रम्हचारी हे त्यांचे पट्टशिष्य होत; व रामबुवांनीं रावपुऱ्यांत स्थापलेल्या ज्ञानमठावर, गुरूंच्या पश्चात् बापुबुवाच अधिष्ठित झाले. ह्या संस्थानास गायकवाड सरकारांतून नेमणूक चालू आहे. तेथें रामबुवांची समाधि असून, दरसाल भाद्रपद शुद्ध १ रोजीं पुण्यतिथीचा उत्सव होतो. रामबुवांचे दुसरे शिष्य मुंबईंतील प्रसिद्ध सद्बोधप्रवर्तक ब्रह्मनिष्ठ जयकृष्ण

महाराज हे होत. हे स्वतःचे घरीं सकाळ संध्याकाळ वेदांतनिरूपण करीत असत. नंतर चतुर्थाश्रम स्वीकारून ते मुंबईतच समाधिस्थ झाले. त्यांचे चिरंजीव वे. शा. सं. जटाशंकर व्यास हे मोठे विद्वान् व सत्वस्थ आहेत.

मौनीस्वामींचें प्रवचन ऐकण्यास जयकृष्ण महाराज नेहमी येत असत व राममहाराजांच्या निर्याणानंतर, प्रतिवर्षीं भाद्रपद शुद्ध ३ दिवशीं आपल्या गुरूच्या पुण्यतिथीस मौनी महाराजांस घरीं आणून त्यांची महापाद्यपूजा करीत असत. रामबुवांचे आणखी पुष्कळ शिष्य गुजरात प्रांतीं होते व त्यांनीं भक्ति आणि वेदांत मार्गाचा पुष्कळ प्रसार केला.

मौनीस्वामींची कविता:–स्वामीनीं लघुबोध' 'नामक एक लहानसें अध्यात्म प्रकरण ओवी वृत्तांत रचिलें, तें आजपर्यंत दोन तीन ठिकाणीं छापून प्रसिद्ध झालें आहे. दुसरा ' स्वात्मबोध ' हा ग्रंथ बराच मोठा असून त्यांत अद्वैत वेदांत विषय चांगल्या रीतीनें प्रतिपादन केला आहे. यांशिवाय पंचीकरण व समाधी प्रकरण असे दोन लहान ग्रंथ आहेत. हे सर्व ग्रंथ ओवीबद्ध असून ते प्रकाशित झालेले आहेत. स्वामींनीं रचिलेल्या 'परमार्थपर आरत्या'ही छापलेल्या आहेत. ' परमार्थपर नित्यक्रम ' या पुस्तकांत अभंग वगैरे फुटकळ कविता आह याशिवाय त्यांनीं भक्तिज्ञानवैराग्यपर अनेक सुरस पदें केलीं आहेत, परंतु तीं मात्र अद्याप अप्रकाशित आहेत.

तीर्थयात्रा:–मौनीस्वामींनीं प्रथम दक्षिण यात्रेस जाऊन राशीन, जेजुरी, पंढरपूर, शंभुमहादेव, नृसिंहपूर, कोल्हापुर, भीमाशंकर,

नृसिंहवाडी, सासवड, देहू, अळंदी, चिंचवड वगैरे तीर्थें केलीं. नंतर मुंबईंस येऊन कांहीं वर्षांनीं ते उत्तर यात्रेस गेले. तिकडे त्रिस्थळी यात्रा झाल्यावर, पुढें शेवटपर्यंत काशीवास करावा अशी इच्छा मनांत उद्भवली व त्याप्रमाणें त्यांच्या शिष्यमंडळीनें व्यवस्था करून दिली. कांहीं शिष्य नासिकपर्यंत स्वामीस पोंचविण्यास आले. सप्त-शृंगीची यात्रा झाल्यावर, धुळें, तापी, नर्मदा, बऱ्हाणपूर, इंदूर वगैरे स्थलें पहात पहात सातपुडा ओलांडून ओंकार, उज्जनी, वगैरे यात्रा करीत करीत प्रयागावरून गयेस जाऊन काशीस आले.वाटेंत इंद्रप्रस्थ ( दिल्ली ) कानपूर, लखनौ, ब्रह्मावर्त, विंध्यवासिनी इत्यादि यात्रा उरकण्यांत आल्या. स्थळोंस्थळीं मानमान्यता व विद्वत्समागम होत असे. शेवटपर्यंत काशीवास करण्याचा महाराजांचा मनोदय असल्यामुळें ब्रम्हघांटावर एक घर खरेदी करण्यांत आलें. सर्व खर्च शिष्यमंडळीनें केला. पुढें, महाराजांचे कनिष्ठ चिरंजीव व शिष्य वामनराव यांच्या कुटुंबास त्याच घरांत देवाज्ञा झाली. शिवाय मौनी-स्वामीस काशीची हवा मानवेना; रक्त पडूं लागलें. तेव्हां सर्व मंडळी पुनः मुंबईस आली. तेथें स्वामीच्या प्रकृतीस आराम पडला.

श्रीमौनीस्वामीकरितां, सुरतचे गुजराथी काशिराम कंसारा यांनीं १८००० रु. किंमतीचें घर मुगभाट गल्लींत विकत घेऊन त्यांत स्वामीस ठेविलें. पूर्वीं स्वामी आंग्रयाचे वाडींत मध्यभागीं असलेल्या बंगल्यांत राहात असत. श्री. बाबासाहेब आंग्रे व त्यांचे चिरंजीव भाऊसाहेब आंग्रे हे स्वामीचे शिष्य असल्यानें त्यांनीं तें स्थळ स्वामीच्या वास्तव्यार्थ दिलें होतें. त्यानंतर कांहीं वर्षें, कांदेवाडींत, शेट कानजी खेतसी यांच्या जागेंत स्वामी राहात असत. स्वामीचे

वडील चिरंजीव शिवराम तात्या यांचा मुक्काम काशीक्षेत्रींच होता. कालांतरानें स्वामीची वृद्धावस्था होऊन वयाचीं ९० वर्षें उलटून गेलीं. शरीर जराजर्जर झालें. तेव्हां, स्वामींनीं देह ठेवल्यास त्यांच्या समाधीची व्यवस्था कोठें करावयाची, यासंबंधानें त्यांच्या शिष्यवर्गास विचार पडला. पुढें स्वामीचे ज्येष्ठ चिरंजीव काशीहून मुंबईस आले व स्वामीस काशीस घेऊन जातों, असें म्हणाले. परंतु धाकटे पुत्र वामनराव हे सिन्नरहून मुंबईस येतांच, मुंबईतच स्वामीचें समाधिस्थल करावें असें ठरविण्यांत येऊन, ठाकुरद्वार गल्लींत, कोळ्याचे वाडींतील स्थल ( हल्लीं त्र्यंबक वैद्याची वाडी ) पसंत करण्यांत आलें व ती जागा विकत घेऊन तेथें श्रीराममंदिर उभारण्यांत आलें. पुढें, त्या स्थलीं स्वामीची समाधि बांधण्यास मंजुरी मिळावी, अशा अर्थाचा एक हजार सह्यांचा अर्ज सरकारांत पाठविण्यांत आला. मुंबईत मृत शरीर, ठरावीक जागेशिवाय इतरत्र कोठेंही पुरूं देत नाहींत. त्या वेळीं मि. क्राफर्ड हे प्रसिद्ध साहेब मुंबईतील म्युनिसिपालिटीचे कमीशनर होते. सर्वांच्या खटपटीनें, वरील ठिकाणीं समाधि बांधण्याची परवानगी शिष्यवर्गास मिळाली. स्वामीच्या देहपातापूर्वीच, अशा रीतीनें, स्थलयोजना करून ठेवली असल्यामुळें, देहावसानसमयीं विशेष त्रास पडला नाहीं.

सरासरी दोन चार महिने स्वामीची प्रकृति अस्वस्थ होऊन, शेवटीं सात दिवस त्यांनीं केवळ गंगोदकावर काढले. ह्या सात दिवसांत स्वामीस श्रीरामापुढें सोंवळ्यांत ठेवून, गीता भागवतादि ग्रंथांचीं पारायणें मंडळीनें चालू ठेवलीं होतीं. रात्रौ भजनही होत असे. शेवटीं, वयाचे सुमारें ९२ वे वर्षी, मिति भाद्रपद शुद्ध १३

सोमवार, शके १७९८ रोजीं प्रातःकालीं श्रीमौनीनाथस्वामी ब्रह्मीभूत झाले. तेव्हां सर्व मंडळीस मोठा खेद वाटला. मनोवेधक व सरळस्वभाव, मधुर भाषण, सर्वांवर सारखें प्रेम, परिणामकारक प्रवचनपद्धति, शांत वृत्ति इत्यादि साधुलक्षणांनीं युक्त असलेले मौनी-स्वामी सर्व मंडळीस फार प्रिय झाले होते; अर्थात् त्यांच्या निर्याणानें त्यांच्या शिष्यवर्गास अत्यंत दुःख व्हावें हें साहाजकच होय. असो. स्वामींच्या देहविसर्जनानंतर तेथें हजारों लोक जमा होऊन मोठा कोलाहल झाला. वाद्यांचें गजर झाले, पुष्पवृष्टि झाली, वेदमंत्र झाले व शेवटीं संध्याकाळीं स्वामींचें शव समाधिस्थ करण्यांत आलें. मुंब-ईच्या आसपासचे पुष्कळ लोक या समारंभास आले होते व पोलि-सांचा बंदोबस्तही चांगला होता. स्वामींचे पुत्रेच्छु शिष्य कै. बाळा पंडित पुराणिक पुणेकर यांनीं, समाधीपूर्वी, शंखप्रहार करून स्वामींचा ब्रह्मरंध्रभेद केला व त्यायोगें त्यांस पुढें पुत्रलाभही झाला. मौनी-स्वामींच्या समाधिस्थलाचा व कालाचा उल्लेख त्यांचे पुत्र व शिष्य वामनराव यांनीं आपल्या मौनीचरित्रांत येणेंप्रमाणें केला आहे:—

"श्रीमौनी गुरुचा सुकल्पतरु हा साकार आगार गा ।
ब्रह्मीं शांतचि होय सागरतटीं मुंबापुरा मध्य गा ॥
सत्राशें नव अष्ट भाद्र पहिली तेरावि तीथी यदा ।
रामाचे निकटीं समाधिरचना ठेवूनि देहा तदा ॥"

श्रीमौनीनाथांचे निधनलेख इंदुप्रकाश, मुंबईसमाचार आणि 'टाइम्स ऑफ इंडिया' ह्या पत्रांत प्रसिद्ध झाले. त्यांच्या पुण्य तिथीचा उत्सव एक महिनाभर चालू होता. शिष्यमंडळीनें हजारों रुपये खर्च करून आनंद केला.

संस्थानः—स्वामीच्या शिष्यवर्गानें ठाकुरद्वारीं बांधलेल्या राम-मंदिराची व्यवस्था, स्वामीनीं व मंडळीनें 'अर्पणपात्रिका' व 'व्यव-स्थापत्र' द्वारें, स्वामींचे पूर्वाश्रमस्थ पुत्र व शिष्य शिवराम तात्या आणि वामनराव आप्पा यांजकडे वंशपरंपरा सोंपविली; परंतु कनिष्ठ पुत्र वामनराव अगोदर मृत झाल्यानें,शिवरामतात्यांनीं, वामनरावांच्या वंशजांस सिन्नर व काशी येथील मिळकतीचा बराच मोठा भाग देऊन त्या ऐवजीं मुंबईतील राममंदिराचा हक्क आपणाकडे घेतला. त्याप्रमाणें मंदिराची व्यवस्था हल्लीं त्यांच्या वंशजांकडे असून, तेथें प्रतिवर्षीं रामनवमीचा व श्रीमौनीस्वामीच्या पुण्यतिथीचा उत्सव मोठया थाटानें होतो. देवास व सामाधीस, नित्यनैमित्तिक पूजा, नंदादीप, नैवेद्य, उत्सव, चौघडा, दीपोत्सव व वगैरेच्या खर्चा-कडे, शिष्यमंडळीनें एक चाळ बांधून, तिचें उत्पन्न तोडून दिलें आहे.

श्रीमौनीस्वामीचें एक पद्यात्मक चरित्र, त्यांचे कनिष्ठ पुत्र व शिष्य वामनराव अप्पा यानीं रचिलें असून, तें त्यांच्या "काव्यकोष" ग्रंथांत प्रसिद्ध झालें आहे. याशिवाय स्वामींच्या इतर कांहीं शिष्यांनीं स्वामीवर पदें, आरत्या, वगैरे बरीच कविता केली असून, त्यांतील कांहीं पद्यें छापून प्रसिद्धही झालीं आहेत. मौनीस्वामीच्या पादुका सिन्नर येथें श्रीदत्तमंदिरीं दत्तमूर्तीपुढें स्थापन केल्या आहेत. शिवाय त्यांची मूर्ति, केळवें माहीम स्टेशनवर त्यांचे शिष्य ब्रह्मीभूत केशवराव महाराज यांनीं देवालयांत स्थापन केली आहे. असो.

आतां मौनीनाथांच्या कवितेंतले कांहीं निवडक उतारे देऊन हा चरित्रलेख पूर्ण करूं.

## अभंग

माझी विनवणी श्रवण करावी । मनास आणावी रामराया ॥ १ ॥
रामराया मी तों अनाथ किंकर । कृपा मजवर करीं आतां ॥ २ ॥
करीं आतां तुझ्या चरणीं सरता । न ते विचारितां गुणदोष ॥ ३ ॥
गुणदोष माझे राघवा अपार । तयाचा निर्धार काय बोलूं ॥ ४ ॥
प्रार्थितसें तुज पतितपावना । जानकीजीवना रघुपति ॥ ५ ॥
काय बोलूं आतां पतित मी खरा । तुज रघुवीरा प्रार्थितसें ॥ ६ ॥
रघुपति तुझें रूप हें सगुण । **मौनी**तें चरण दाखवावे ॥ ७ ॥

## पद.

तो नर सुस्ती । श्रीहरिशीं करितो मस्ती ॥ ध्रु० ॥
हृदयीं विसरुनि आत्माराम । करितो बाह्य प्रपंची काम ।
केवळ विषयसुखीं विश्राम । तो मदहस्ती
अंगीं तारुण्याचा ताठा । बोलण्याचा ठसका मोठा ।
बहुत सोंगटीचा चटका । सांपडे गस्ती ॥ २ ॥
आईबापासी घेतो खडका । साधुनिंदा करितो धडका ।
परद्वारें जो झाला सडका । राहिल्या अस्थी ॥ ३ ॥
ख्याल तमाशा जातो धडका । हरिहरभजनाविषयीं रडका ।
कामक्रोध आदळती थडका । केवळ दुस्ती ॥ ४ ॥
रामनाम म्हणतां कुच्चर । वनितावर्णनविषयीं तत्पर ।
जें मागेल तें देतो सत्वर । त्या यम जास्ती ॥ ५ ॥
काढुनि पागोटयाची बिनी । धोतर चाप चोपी चुनी ।
अंगडें तंगबार घालुनी । लावितो दस्ती ॥ ६ ॥
वनिता देखुनि थरकी घोडा । वरती पाहुनि चावी विडा ।
पगडीबाहेर केंस बुचडा । दोघें हंसती ॥ ७ ॥
ऐसा दुर्बुद्धीचा जोर । भगवद्भजनाविषयीं चोर ।
**मौनी** म्हणे पुढें घोर । काळ कुस्ती ॥ ८ ॥

मौनीनाथांची काव्यवाणी किती परिणामकारक आहे हें या एकाच पद्यावरून लक्षांत येतें. स्वामीच्या वर्णनशैलीचें व शब्दयोजनेचें अमृतरायांच्या वर्णनशैलीशीं व शब्दयोजनेशीं बरेंच साम्य दिसतें.

२ स्वात्मबोध—अध्याय ११ वा. ओव्या. ( शेवटच्या )

असो ग्रंथार्थ लिहिला जो कांहीं ॥ ते शेवटां सूचना लिहावी ॥ म्हणवोनि संक्षेपें निश्चयीं ॥ ग्रंथान्वयी ऐक सांगों ॥ ६६ ॥ प्रथम अध्यायीं निरूपण ॥ श्रीगणेशादि सद्गुरु संतस्तवन ॥ श्रोत्यांचा प्रश्न उत्थापून ॥ दिधलें प्रतिवचन तयांसी ॥ ६७ ॥ शुद्ध अंतःकरणें निश्चिति ॥ यथार्थ व्हावया भगवत्प्राप्ती ॥ सत्कर्म भजनादि दृढभक्ति ॥ हें कथिलें अल्पोक्ति प्रथमांत ॥ ६८ ॥ पुनः श्रोतियांचा प्रश्न ॥ आत्मानात्मविपयीं जाण ॥ त्याचें देउनि प्रतिवचन ॥ प्रथमाध्याय संपविला ॥ ६९ ॥ आत्मा एक सच्चिदानंद ॥ त्रिशब्दार्थीं नसे भेद ॥ तोच तूं हें प्रसिद्ध ॥ कथिलें विशद द्वितीयाध्यायीं ॥ ७० ॥ मग साधनचतुष्टययुक्त जो शिष्य ॥ त्याच्या प्रश्नांचें करोनि मिष ॥ शठ लक्षणांचा किंचित् अंश ॥ दर्शित केला कळावया ॥ ७१ ॥ म्हणून सच्छिष्यें कर जोडून ॥ प्रश्न केला अतिनम्र होऊन ॥ हे गुरो आत्मा सच्चित्सुखघन ॥ कैशी ओळखण सांगा स्वामी ॥ ७२ ॥ तंव गुरु म्हणती शिष्यासी ॥ अरे आत्मा तंव ज्ञानराशी ॥ सदा प्रकाशूनि अवस्थात्रयांसी ॥ निर्विकारेंसी स्वतःसिद्ध ॥ ७३ ॥ त्या अवस्थात्रयाची करून बाध ॥ निवडावी संवित शुद्ध ॥ तें ज्ञान अवस्थात्रयीं अभेद ॥ वर्णिलें विशद तृतीयाध्यायीं ॥ ७४ ॥ मग जीवेश्वरांचें एकपण ॥ उपाधित्यागें केलें वर्णन ॥ एषास्वयंप्रभा इत्यादि वचन ॥ अनेक प्रमाण दर्शविलें ॥ ७५ ॥ अर्थ इतुका साधिला ॥ ज्ञानघन आत्मा तूं दर्शविला ॥ तो तूं साक्षी अससी एकला ॥ हा अनुभव कथिला चतुर्थीं ॥ ७६ ॥ सर्वही भुवनीं आत्मयाची ॥ व्याप्ति कथियेली चित्सत्तेची ॥ ओतप्रोत प्रतिपादक श्रुतिची ॥ आणि दर्शविली स्मृतींची प्रमाणता॥७७॥पुनः शिष्यें आशंका केली ॥सर्वत्र चित्सत्ता व्यापिली॥ कोणीं जडत्व कां पावली ॥ आणि चेतन कां झाली सांगा स्वामी ॥ ७८ ॥ अरे शिष्या चैतन्य व्यापक सर्वत्र । परी शुद्धोपाधींत प्रतिबिंब होत ॥ तेणें तें सचेत असें भासत ॥ अशुद्धीं जडत्व प्रतिबिंबाभावें ॥ ७९ ॥ पुनः शिष्यें केला प्रश्न ॥

पूर्वीं पंचदशीच्या वचनेंकरून ॥ सांगितलें ज्ञान अभिन्न ॥ आतां आपण म्हणतां तेंच तूं ॥ ८० ॥ ऐसा उभयवचनीं दिसतां भेद ॥ मग त्या आशंकेचा करून छेद ॥ अद्वयसच्चिदानंदशुद्ध ॥ पूर्ण बोध तूं अससी ॥ ८१ ॥ तुझ्या स्वरूपाचे ठायीं ॥ त्रिविध परिछेद नाहीं ॥ आणि सजातीय विजातीय पाहीं ॥ नसेच कांहीं स्वगत भेद ॥८२॥ एवं आत्मा चैतन्यघन ॥ तो तूंच गा निश्चय पूर्ण ॥ हें गुह्य पुनःपुनः शिष्यालागुन ॥ उपदेशिलें जाण पंचमाध्यायीं ॥ ८३ ॥ पुनः सत्-चित् आनंद पदांचा ॥ प्रमाणांतरें बोध साचा ॥ व्हावा म्हणून आनंदमयकोशाचा ॥ अनुभव प्राज्ञांचा वर्णिला पैं ॥८४॥ त्या आनदमय कोशविचारें करून। ब्रह्मानंदाचें आणि वासनानंदाचें विवेचन ॥ स्पष्ट बोलून संपूर्ण ॥ केलें प्रवचन षष्टमाध्यायी ॥ ८५ ॥ पुनः सच्चिदानंद ब्रह्म निश्चन ॥ आणि तद्विवर्तनामरूप जगत ॥ त्याविषयीं श्रुतिस्मृतिसंमत ॥ केलं दर्शित सप्तमाध्यायीं ॥ ८६ ॥ मंदबुद्धि जो तयासी ॥ दृढबोध व्हावयासी ॥ पुनःपुनः निरूपणासी ॥ सप्तमाध्यायामी संपविलें ॥ ८७ ॥ मग निर्विकारी जगद्भान ॥ कसे भासतें म्हणोन ॥ इत्यादि आशंका उत्थापून ॥ समाधान कथियेलें ॥ ८८ ॥ ब्रह्म अद्वैत सिद्धांत॥ माया मिथ्या विवर्त ॥ अनिर्वाच्य मृगजवळवत् दृष्टांतयुक्त। कथिलें अष्टमीं ॥८९॥ मग साधनचतुष्ट्याचें स्वरूप ॥ तद्वत् वैराग्यादिकांचें हेतु स्वरूप ॥ आणि त्यांचा फलावधि अमुप ॥ न ठेविला अल्प संशयभ्रम ॥ ९० ॥ पुढें वर्णिलें समाधि प्रकरण ॥ सविकल्प निर्विकल्प लक्षण ॥ पुनः तो समाधि षट् प्रकारें करून ॥ वर्णिला जाण अंतर्बाह्य ॥ ९१ ॥ समाधिअभ्याससमयीं ॥ विक्षेपादि विघ्नें येती त्या ठायीं ॥ त्यांची निवृत्ति करून उपायीं ॥ अभ्यास पाहीं करावा ॥ ९२ ॥ कोणी आकाशासम ब्रह्म ह्मणती ॥ त्याची विवेकद्वारा करून निवृत्ति ॥ सच्चिदानंद ब्रम्हस्थिति ॥ ती वर्णिली युक्ति नवमाध्यायीं ॥ ९३ ॥ ऐसा अपरोक्ष ज्ञानयुक्त ॥ त्यासच म्हणती जीवन्मुक्त ॥ त्याचें आचरण विधियुक्त ॥ केलें दर्शित यथाशास्त्रे ॥ ९४ ॥ ते इच्छाऽनिच्छा परेच्छानुसार ॥ जगीं वर्तती निरंतर ॥ भक्ति ज्ञानादि प्रकार ॥ दाविला तो विचार दशमाध्यायीं ॥ ९ ॥ संचित प्रारब्ध क्रियमाण ॥ त्यांचें स्वरूप कथिलें पूर्ण ॥ पुढें विदेहमुक्तिप्रसंगेंकरून ॥ कथिले निर्वाण एकादशीं ॥ ९६ ॥ असो अपरोक्षज्ञान झालियावर ॥ राहावें कैसें तो प्रकार ॥ नीति संक्षेप सविस्तर ॥ तीही साचार किहीयेली ॥ ९७ ॥ एवं इत्यादि निरूपण ॥ जें जें केलें असे कथन ॥ तें तें

हृदयीं दृढ धरून ।। व्हावें निमग्न स्वस्वरूपीं ।। ९८ ।। श्रीरघुनाथाचार्यकिंकर ।। देहास मौनी नामोच्चार ।। निवास्थान ग्राम सिन्नर ।। हें बोधसार कथिलें तेणें ।। ९९ ।। संवत् अठराशें एक्याशींत ।। शके सतराशें चाळिसांत ।। तारण नाम संवत्सरांत ।। " स्वात्मबोध " ग्रंथ केलासे ।। १०० ।। हेमंतऋतु पौषमासीं ।। शुक्लपक्ष दशमीचे दिवशीं ।। प्रथम प्रहरांत निश्चयेसी ।। केलें ग्रंथासी समाप्त ।। १०१ ।। इति श्रीस्वात्मबोध ग्रंथ ।। श्रीरघुनाथाचार्य समर्थ ।। तत्पादरज मौनीकृत ।। अध्याय समाप्त एकादश हा ।। १०२ ।। "

## पद

नरतनु दुर्लभ अति हे प्राण्या स्वरूपीं सावध होई । गेलें हें वय विषयीं रमत वृथाचि रे लवलाहिं ।। प्राण्या स्वरूपीं सावध होई ।। ध्रुवपद ।। बहुकाळ तूं अगणित जन्मीं निजरूपा चुकलासी । मायामोहें विसरुनि रामा भवदवाग्निं पडलासी ।। व्याघ्रश्वान सर्पादिक होउनि श्रमलासी बहु पाहीं ।।१।। प्राण्या० ।। बा एकेक योनींत कोटि कोटि फेर तुजलागी पडले। लक्षचौऱ्यांशि योनिंत मन हें बहु दुःखीं हुरहुळलें ।। काय तुजला झालें कैसें न कळे निजहित कांहीं ।।२।। प्राण्या०।। ऐसें फिरतां फिरतां समान पापपुण्य जे कळीं । नरतनुचा अतिलाभ तूजला जाला दैवसुकाळीं । येथील आयुष्य परमार्थेविण वृथा घालिसी पाहीं ।। ३ ।। प्राण्या० ।। धनसुतरमणीपशुदेहादि शाश्वत नसेचि कांहीं । निशिदिनिं यांसचि बहुजन्मीं तूं सक्त असतां पाहीं । गेलें हरपुनि गतजन्मीचे तद्वत जाण तूं हेंही ।। ४ ।। प्राण्या० ।। अजुनि तरी निजमनीं करीं तूं विवेक भक्ति हरीची । वैराग्यादिक चार साधनें संपत्ति घे दैविची । मौनी म्हणे गुरुचरणप्रसादें आत्मा ओळख हृदयीं ।। ५ ।। प्राण्या० ।।

## पद

पद रामाचे ध्याईं ।। ध्रुवपद ।। कमलनयन सुखवदन पावन, अघहरण, शरण तूं जाईं ।। १ ।। जानकीरमण जगजीवन अमन, भवहरण, वामन तूं पाहीं ।।२।। मौनी अमर सुखसागर अजर स्मरहर, सुलभ वदनीं राम गाईं ।। ३ ।।

## पद

हें मन निज चित्सुधिया हरिला भजावें । आसनिं शयनिं गमनिं नयनिं हृदयीं स्मरावें ।। ध्रुवपद ।। टाकुनि विषय सर्व असार, । निशिदिनिं करी हेंचि काज, । निजानंद कृष्णराज-। चरणीं रमावें ।। १ ।। निरतिशयानंद जाण ।

त्रिभुवनिंचें जें निधान । अचल सुखें समरसोन । सुखी बा असावें ॥ २ ॥ **मौनी** म्हणे परम गुज । हेंचिकल्याण तूज । टाकुनियां विषय निज स्वरूपीं राहावें ॥ ३ ॥

## सवाया

नाभित ब्रह्म असे एक दावित झळकत सांगतसे नयनीं हो ॥ एकमतें भृकुटींतचि व्यापक नासिकिं दृष्टि म्हणे एक या हो ॥ सहस्रदळीं एक ज्योति विराजत दाविति एक उजेड पहा हो ॥ **मौनि** म्हणे भ्रम टाकुनि सर्वहि साक्षि नभापरि ब्रम्ह अहा हो ॥ १ ॥ जो तुझे अंतरिं तोचि दिगंतरिं तोचि चराचरिं व्यापुनि आहे ॥ अंतरिं बाहेरि नित्यनिरंतर पूर्ण चिदंबर ज्ञानदृगा हे ॥ लेउनि अंजन श्रीगुरुचे मग व्यापक चिद्घन सत्य तूं पाहें । देवनिरंजन **मौनि** म्हणे घनस्वात्मस्वरूपचि जाणुनि राहें ॥ २ ॥

## दिंड्या.

ब्रह्मसौख्याची मना भूल येती । तेणें कामेंहि सत्र राहताती ॥ ऐशी अवस्था जाहली मना माझ्या । काणा सांगूं हें सांग महाराजा ॥ १ ॥ काम राहिलें तरि माझें काय गेलें । जन्मोजन्मीं हें बहू काम केलें ॥ जग मिथ्याचि ब्रह्म सर्व आहे । मना कळतांची तदाकार राहे ॥ २ ॥ बहु श्रमलों विश्रांति मला झाली । ब्रह्मानंदाचि झोंप मला आली ॥ **मौनी** म्हणे हो नका झोंप मोडूं । ब्रह्मानंदाची तार नका तोडूं ॥ ३ ॥

## पद.

यांत सौख्य कदापि नाहीं ॥ सांडुनि दृश्य प्रपंच दुराशा । निजहित प्राण्या पाहीं ॥ यांत० ॥ ध्रु० ॥
धनसुतदारा व्यर्थ पसारा । येथेंच राहिल सारा ।
जें जाशिल यमपुरा । कैचे सुहृद आप्त सोयरे । येथेंच राहतिल पाहीं ॥ १ ॥
ज्या देहास्तव म्हणसी माझें । आदि करुनियां गेह ।
तो येथेंच राहिल देह । ऐसें तयाचें इतर कैचे । नये बरोबर कांहीं ॥ २ ॥
धरूनि विरक्ति विषयासक्ति । सांडुनि करिं श्रीहरिची भक्ति ।
बा त्यागुनि सर्वासक्ति । सनकसनंदन श्रीशुक त्यागित गोपिचंद नृप तोही ॥ ३ ॥
देहबुद्धिनें अनात्मयातें । आत्मपणा तूं धरिसी । मग वृथाचि गंतसि फांसीं ।
त्यगुनि कुबुद्धि धरुनि सुबुद्धी जिंकिं तूं वैरी साही ॥ ४ ॥

सद्गद भावें हरिसि भजावें । स्वस्वरूपा वळखावें ।
त्वां तरीच जन्मा यावें । मौनि ह्मणे गज सांगतसें तुज संतसमागमिं राहीं।।५।

## पद.

मन चिद्धनिं हें मिळूनि अवघें स्वस्वरूपचि झालें ।
सबाह्य अभ्यंतरीं सर्वही ब्रह्मचि कोंदाटलें ॥ ध्रु० ॥
विश्वतरंगीं चिज्जीवन हें तन्मय सुखकर भरलें ।
माया विद्या भेद भ्रमात्मक जगचि जड हें विरालें ।
चित्सागरिं हे चिन्मय होउनि चित्तचि हारपलें ॥ १ ॥
मी चित्सागर सर्व चराचर चिन्मय भरोनि उरलें ।
देशकाल वस्तचे त्रयात्मक परिच्छेद हे सरले ।
मी तूं भ्रम हा सर्व जगत्रय सुखसागरिं हें बुडालें ॥ २ ॥
चित्सूर्योदयिं द्वैतभ्रमात्मक उलुख पक्षी दडाले ।
अद्वैतीं हे भेद प्रजल्पक तस्कर दुर्जन पळाले ।
मौनी म्हणे मनविकल्प भ्रम हे सकळहि मावळे ॥ ३ ॥

## अभंग

नको विसरूं तूं येई आतां वेगें । चरण दावीं गे रामाबाई ॥ १ ॥
चरणदर्शनासी लागलीसे क्षुधा । तेणें थोर बाधा पावतसें ॥ २ ॥
अंतरींचें दुःख सांगूं कोणापाशीं । तूं एक जाणसी रामराया ॥ ३ ॥
कोण या दुःखाची करील निवृत्ति । राम रघुपति तुजवीण ॥ ४ ॥
राघवा मी तुझ्या दर्शनावांचून । जालों फार दीन रामराया ॥ ५ ॥
दर्शन भाषण तुझें हें घडेल । तेव्हां तें होईल सुख मज ॥ ६ ॥
मासोळी ही जैसी जीवनावांचून । तैसा तुजविण व्याकुळ मी ॥ ७ ॥
सत्य मिथ्या रामा जाणसी अंतरीं । व्यर्थ मी मुरारी काय बोलूं ॥ ८ ॥
तुजवीण मज अन्य प्रिय नाहीं । शपथ हे पाहीं वाहतसें ॥ ९ ॥
कोटी ब्रह्महत्या पातक घडेल । प्रिय हें असेल अन्य जरी ॥ १० ॥
आत्मया श्रीरामा तूंचि मला प्रिय । सर्वही अप्रिय तुजविण ॥ ११ ॥
तुझ्या दर्शनाची तृषा लागलिसे । आणिक हें नसे प्रिय मज ॥१२॥
आतां किती माझा पाहशील अंत । दयाळू बहुत राघवा तूं ॥ १३ ॥
मौनी म्हणे तुझें रूप हें सगुण । दाखवीं भाषण करीं मज ॥ १४ ॥

# विठ्ठलशास्त्री चाकूरकर

ऊर्फ

# चूडामणिसुत

दाजीदेव चौथे साचे । विठ्ठलशास्त्री चाकूरचे ।
ते रामजोशी बुवाचे । होते प्रतिअवतार ।। १८६ ।।
काव्यकुशळ महाचतुर । सरस्वती ज्यांपुढें जोडी कर ।
अधिकार पूर्ण भाषेवर । महान्युत्पन्न शास्त्रवेत्ते ।। १८७ ।।

दासगणूकृत संतकथामृत, अ० १६

विठ्ठलशास्त्री चाकूरकर ऊर्फ चूडामणि यांचा जन्म शके १७३२त मोंगलाईंतील बेदर जिल्ह्याच्या राजूर तालुक्यांतील चाकूर नामक गांवीं झाला. त्यांच्या वडिलांचें नाव चूडामणि. शास्त्रीबुवांनीं आपल्या कवितेंत सर्वत्र 'चुडामणिसुत' याच नांवानें स्वतःचा उल्लेख केला आहे.

कोणत्याही श्रेष्ठ पुरुषाच्या अंगांतील सद्गुणाचे अंकुर त्याच्या बालपणांतच दृष्टोत्पत्तीस येत असतात; आणि त्यावरूनच, त्याच्या भावी मोठेपणाचें अनुमान लोक करीत असतात. पुढील सुखसोहळ्याची कल्पना या आशेंतच बीजरूपानें गर्भित असते. भाग्यवान् मातापित्यांची ही आशा सफल होऊन मुलाच्या सुखसोहळ्याच्या आनंदाचा लाभ त्यांस होतो. परंतु प्रस्तुत कवीच्या आईबापांना, शास्त्रीबोवांच्या पुढील कीर्तिमान् आयुष्यांतील सुखसोहळा तर

राहेच, परंतु त्याच्या बालपणींच्या स्वभावाकडे पाहून साहजिक उत्पन्न होणाऱ्या आशेच्या मनोराज्यांतील काल्पनिक सुखाचा आस्वाद देखील चाखावयास न मिळतां या नश्वर जगताचा त्याग करावा लागला ! त्यामुळें शास्त्रीबोवांना बालपणांतच आईबापांचा वियोग होऊन केवळ अनाथ होण्याचा प्रसंग आला. परंतु

सकल जगाचा करितो सांभाळ ।
तुज मोकलील ऐसें नाहीं ॥

हा नाथ महाराजांचा उपदेश व मध्वमुनीश्वरादि इतर संतांच्या आश्वासनपर उक्ति यांच्या वाचनानें, परमेश्वराविषयीं दृढ विश्वास पूर्वाभ्यासानें बालपणींच उत्पन्न झाल्यामुळें भगवद्भक्त शास्त्रीबुवांच्या योगक्षेमाची काळजी त्या भक्तप्रिय भगवंताला—'योगक्षेमं वहाम्यहम्' म्हणून आश्वासन देणाऱ्या श्रीकृष्णाला—घ्यावी लागली व त्याप्रमाणें प्रत्यक्ष घटना घडूनही आली.

बनवस संस्थानांतील मूळपुरुष श्रीगुरुमाधवाचार्य यांच्या भेटीचा योग घडून आल्यामुळें त्यांजकडून शास्त्रीबुवांचें मौंजीबंधन शके १७३९ त म्हणजे त्यांच्या वयाच्या सातव्या वर्षी झालें. श्रीगुरुमाधवाचार्यांनीं शास्त्रीबुवांचें पुत्रवत् पालन करून, त्यांजकडून संस्कृत विद्येचा पूर्ण अभ्यास करून घेतला. शास्त्रीबुवांचे मोक्षगुरूही तेच होत.

पुढें माधवाचार्यांनीं एका सुशील व सद्गुणी कन्येबरोबर शास्त्रीबोवांचा विवाह करवून त्यांनां गृहस्थाश्रमांत प्रविष्ट केलें. वर्णाश्रमविहित वेदोक्त कर्माचरणांत आयुष्य कंठीत असतां त्यांस एक पुत्र

झाला, व नंतर त्यांनीं अग्निहोत्र घेतलें. शास्त्रीबोवा पुराण सांगत व कीर्तनें करीत. त्यांचीं कीर्तनें पुराणोक्त आख्यानावर स्वकृत पद्यांनीं युक्त अशीं असत. दुपारीं आख्यान रचून रात्रौ त्यावर कीर्तन होत असे. शास्त्रीबुवांचें काव्य, प्रतिभा, शब्दलालित्य, भाषासौष्टव व अलंकार साहित्य इत्यादि काव्यगुणांनीं परिपूर्ण असें आहे.

शास्त्रीबोवांचा मुलगा ऐन तारुण्याच्या भरांत येतांच निर्दय कालानें त्यावर झडप घालून, त्याच्या मातापित्यास शोकसागरांत लोटून दिलें. परंतु या शोकाचा शास्त्रीबुवांच्या मनावर अगदीं उलट परिणाम झाला. शोकाचा पहिला उमाळा ओसरतांच, चितेच्या वाढत्या ज्वाळांबरोबर त्यांच्या अंगांतला स्वतःसिद्ध वैराग्याग्नि ज्यास्तच पेट घेऊं लागला व श्मशानवैराग्याचा आरोप करणाऱ्या शंकाखोरांच्या मनावर चिरकालिकत्वाचा लख्ख प्रकाश पाडूं लागला ! त्यांतल्या त्यांत आश्चर्याची गोष्ट ही कीं स्मशानांतून घरीं परत येतांना शास्त्रीबुवांच्या वाणींतून अंतर्गत विचारांचें सत्य पटविण्याकरितांच कीं काय, पुढील वैराग्यपर विचार सुंदर पद्यरूपानें बाहेर पडले !

## पद

संसारचक्र जणुं दुपारची साउली ।। जें चालवील तें खरें विठो माउली ।।ध्रु०।। कधिं अधिकारानें उंच मिळालें आसन ।।कधिं तोंड फोडुनी मागे हातभर वसन।। कधिं पेढे बरफी येत मनाला किसन।। कधिं भाकर मिळेना आठवि कांदा लसन।। कधिं रंगीत माहलीं म्हणे शत वर्षे बसन ।। कधिं पटकिच बसली आलें कपाळा मसन ।। कधिं पंखिन घोडी हरिणीवर धांवली ।। कधिं काठि धरुनि ठोकरा खात पावली ।। सं० ।। १ ।। कधिं चिंता टाकुनि झुले सुखाच्या भरांत ।। कधिं गुंगुनि गेला कलह लागला घरांत ।। कधिं संग्रह केला खुप रुपया मोहरांत ।। विकित हिंडतो पळी तपेलीं परात ।। कधिं कीर्ति वाढली खूप जन्मला

नरांत ॥ कधिं डाव फिस्कला गणना आली खरांत ॥ कधिं वाघ सिंह मारुनी कीर्ति पावली ॥ कधिं कोल्हीं कुत्रीं चहुकून् सरसावलीं ॥ सं० ॥ २ ॥ कधिं माहली रमला दिवस कळेना निशा ॥ कधिं कवडोसाठीं फिरत असे दशदिशा ॥ कधिं आरसा पाहुनि चढवित बसला मिशा ॥ कधिं बुद्धिच गेली पोरें ह्मणती पिसा ॥ कधिं सद्गुरुबोधें अध्यात्माची निशा ॥ कधिं दृशा मृशा भासती कणाविण पिशा ॥ कधिं मायामृगजळ रज्जु सर्प सावुली ॥ कधिं हरिकरितां '**चूडामणिसुत**' भावुली ॥ सं० ॥ ३ ॥

पुढें थोड्याच दिवसांत शास्त्रीबुवांच्या कुटुंबानेंही आपली इहलोकची यात्रा संपविली. शास्त्रीबुवांना कीर्तनपुराणाचा उत्तम व्यासंग झाल्यामुळें चहूंकडे यांची कीर्ति पसरली व त्यांचें स्वकृत काव्य व रसाळ कीर्तन श्रवण करण्याकरितां गांवोगांवचे लोक त्यांना आपले येथें बोलावून नेऊन त्यांच्या सहवासाचा लाभ घेऊं लागले. विशेषत: वऱ्हाड नागपूर प्रांतांत त्यांचीं पुष्कळ कीर्तनें झालीं. मुखेड मुक्कामीं दर नवरात्रास कीर्तन करण्यास जाण्याचा त्यांचा परिपाठ असे. तेथें शास्त्रीबुवांनीं सदाशिव महाजन यांस सांगून गांवाबाहेरील नैऋत्येकडील श्रीदशरथेश्वराच्या मंदिराचा जीर्णोद्धार करविला. श्रीदशरथेश्वरास रुद्राभिषेकानें अभिषिक्त करून पुष्कळसें अन्नदान करविलें. दर शिवरात्रीस पालखींतून श्रींची मिरवणूक अद्याप निघत असते. शिवरात्रीलाही शास्त्रीबुवांचें कीर्तन याच ठिकाणीं होत असे; व अद्याप त्यांच्याच शिष्यांपैकीं एका शिष्याचें कीर्तन होत असतें. ह. भ. प. वामनबुवा व बाळाभाऊ लातूरकर हे दोन हरिदास शिष्यांपैकीं प्रमुख होत.

शास्त्रीबुवांनीं कीर्तनाकरितां पुष्कळशीं आख्यानें व स्फुट पदें स्वत: तयार केलीं. सुभद्राहरण, सीतास्वयंवर, गरुडगर्वहरण, शकुंतला,

लवकुशाख्यान, शुकचरित्र, चंद्रकला, कृष्णदान, गालव, शतमुखरावण, भिल्लीण, सुदामा, चंद्रावळी, राधाविलास, दत्तजन्म, वत्सलाहरण, उत्तरगोग्रहण, श्रियाळ, नल, चंद्रहास, श्रीरामजन्म, गणपतिजन्म, डांगवी, अहिरावण महिरावण, इत्यादि प्रकरणावर शास्त्रीबुवांनी रसाळ कविता केली आहे. याशिवाय स्फुट पदें, आर्या कटाव, स्तोत्रें, आरत्या, गौळणी वगैरे कविता बरीच आहे. भर्तृहरीच्या शतकत्रयावर समश्लोकी टीका, अमरकोशावर टीका, व महिम्नावर टीका असे तीन टीकाग्रंथ त्यांनीं लिहिले आहेत. एकंदर ग्रंथसंख्या सुमारें २८०० आहे.

अशा प्रकारें वर्णाश्रमविहित कर्में करून भक्तियुक्त अपरोक्ष ज्ञानानें शेवटीं चतुर्थाश्रम स्वीकारून शास्त्रीबुवा शके १७९२ च्या कार्तिक शुद्ध ६ स म्हणजे आपल्या वयाच्या ६५ व्या वर्षी नारायणस्वरूपीं लीन झाले.

शास्त्रीबुवांचा काव्यसंग्रह अद्याप अप्रकाशित आहे. त्यांच्या कवितेचें स्वरूप अंशतः तरी वाचकांच्या निदर्शनास यावें या हेतूनें त्यांचीं आणखी थोडींशीं पदें येथें देऊन हा अल्प चरित्रलेख संपवितों.

१

गुरुजी निज पामर पदरिं धरा ॥ अनाथा नाथ होई ॥ ध्रु० ॥
तात न जननी तुजसि तुळेना । भवभय वारिसि अमरवरा ॥ १ ॥
शरणागतजनपालनचतुरा । हरिपद दानासि द्यावें करा ॥ २ ॥
निजपदलाभा कारण आपुलें । वचन सुवेदचि एक वरा ॥ ३ ॥
**चूडामणिसुत** विनवि सुदेवा । दवकिनंदन आणि घरा ॥ ४ ॥

२

हरिपाय अनेक अपाय नासि सदुपाय भवांबुधि पायवाट जावया । हें विसरुन निजहित घसरुन जगिं सुख पसरुन हरितां वया ॥ ध्रु० ॥ उदरांत, जठर पदरांत, वन्हिकदरांत, ताप दिनरात नाळ आवळे । नवमास जंतु असमास तोडिती मांस नवें कोंवळें ॥ नसमाय द्वारिं मग माय जाह्ली गाय, जन्मला काय, काय सोह्ळे । मळमूत्रीं जणुं किरि कुत्री, प्राक्तनसूत्रीं, मति मावळे ॥ रडे तानतान पडे मान मागे स्तनपान दुःखसोपान, घुटया जावळे। जरि भूका न वदे मुका तोडिति यूकाक्षति कावळे ॥

चाल ॥ किति मत्कुण चिरटें पिसा ।<br>
करि गोवर देवी पिसा ।<br>
नरकीं पचतो पापिसा ।

ही बाळपणीं आबाळ, शरद दशकाळ, जनक मग साळ[1] दावि लिहावया । तिथें मार छकड भडिमार तशामधें मार[2] आला रहावया ॥ १ ॥ होय तरुण, वदन रुचि अरुण, मदानें भरुन, जलानें वरुण जसा सासला । करि यत्न कनकनगरात्न वधूही पत्न नवा मासला ॥ सरदार विटे वरदार, तयाचे द्वार, फिरत परदार करूं ध्यासला । गजगाडया रंगित माडया इंद्रच वाडयामध्यें भासला ॥ तडजोड किती घडमोड वारवधु गोड भजन तरि दोड[3] म्हणुन त्रासला । नग शंभर धरि पीतांबर डोळे तंबर करि नासला ॥

चाल । किति माळा गजरे तुरे ।<br>
हुजरे सेवक चातुरे ।<br>
आले सुत कन्या नातु रे ।

करि ख्याल सदा मुख लाल, बिघडली चाल, तोडिती ताल नटा गावया । मनिं खुशाल झोंकुन दुशाल दोहेरी मशाल जन पहावया ॥ २ ॥ पुढें ताट फुल्यांचे पाट पंक्तिचा थाट वाढिती नाटकशाळा रसें । गंगेरि पान रंगेरि तबक चंगेरि विडे सौरसें ॥ नवि बनात मढवुन कनात त्या फुलवनांत तें सुख मनांत चढे फारसें । बहु जाह्ली मार्जित न्याह्ली रुतती महालीं किति आरसे ॥

---

१ शाळा २ मदन ३ द्वाड.

धन[१] घटल तेव्हां घर फुटल जगीं पत उटल मागतां सुटल चार पांचशें । दुधपेडया भुलुं नको वेडया, पुढें आहे बेडयांचें बारसें ॥

चाल ॥ उडतिल आप्तहि भाजुनी ।
स्वकरें खाशिल भाजुनी ।
खालीं पाहशिल लाजुनी ।

हात थकल काढितिल शकल जगामधें झकल म्हणति कांहिं अकल नाहिं रहावया । आधिं ठकला केवळ भकला करितिल नकला हंसावावया ॥ ३ ॥ असा बद्ध होय नर वृद्ध अजागळ शुद्ध यमासी युद्ध करित किति तटल[२] । बसे शिंकत चहुंकडे थुंकत भलतच भुंकत बडबड फुटल ॥ हाले मान कोंदले कान नयन गति भान नसे अपान मोकळें सुटल । धुळ चंदन खाटचि स्यंदन उबगल नंदन वनिता विटल ॥ नित कण्हत अरेरे म्हणत थेरडा शिणत अंगही घणत बास किति उठल । वर धाप[३] तनूला कांप लोक वदे ताप कधीं हा कटल[४]॥

चाल । मुखिं खाइन खाइन करी ।
माशा हाणवेना करीं ।
आशा न सुटे लवकरी ।

आलें मरण घोटेना तरं[५]ण तेव्हां गुरुचरण कशाचें स्मरण वांचवावया । करि शोक आप्त निजलोक आला परलोक भोग घ्यावया ॥ ४ ॥ यमसदन सुखाचें कदन पाडितिल रदन लव्ह्याचें अदन चणकमुष्टीचे । महा नरक अकल करि बरक मागे पुढें सरक मार यष्टीचे ॥ नव कशा उडति चवकशा पुससि चव कशा राहति तव दशांत शरवृष्टीचे । सर्पात पक्षि दर्पात वरी गिरिपात घात कष्टीचे ॥ ते चार[७] करिति लाचार पुसति साचार सांग आचार चार गोष्टींचे । मम गेह मीच हा देह हेंचि संदेह पूर्ण काष्ठींचे ॥

चाल । अध्यात्ममार्ग मोडिला ।
मन कर्मानें झोडिला ।
आणि आपण बंध जोडिला ।

---

१ कमी होईल. २ तगेल. ३ श्वास, दमा ४ मिटेल. ५ गिळेना, ६ पेज ७ चेष्टा.

गुरुराज राखि जरि लाज सृष्टिचें काज मृषा जसें साज हेम भावया । **सुत चूडामणि** शशिचूडानुत हरि चूडामणि व्हावया ॥ ५ ॥

कीर्तनांतील श्रोतृवर्गाच्या मनावर वर्ण्य विषयाचा तात्कालिक परिणाम व्हावा या हेतूनें वरील पदांत प्रासानुप्रासांची व यमकांची गर्दी करतांना जरी बरेच अपरिचित शब्द शास्त्रीबुवांनीं वापरले आहेत, तरी मानव प्राण्याच्या तीन्ही अवस्थांचें हें वर्णन एकंदरींत फार बहारीचें उतरलें आहे, यांत संशय नाहीं.

३

अरे गड्या, अजुनि तर कळना जगं प्रपंच हा लटका । बुडत चालल्या फुकट घटका ॥ ध्रु० ॥ जंवर तुझ्या घरची मिळते मुठभर भाजी । तंवर करितिल हांजी हांजी ॥ लागतिल पाठीं काका नाना दाजी । भला जन्मला मर्द गाजी ॥ समय चलतीचा अवघे तुजवर राजी । पुनः परतुन,म्हणतिल पाजी ॥ चाल । दुबोली दुनिया । कांहिं समज समज धर गुनिया । निंदितात केवळ धनिया । कवडीस तोडिती तटका ॥ १ ॥ प्रीतीची छकडी हात,गोंजारिसि तोंडा । तंवर तुजपुढें घोळिल गोंडा ॥ जंवर त्या बाळ्या बुगड्या राखडि गोंडा । आणा बसवुन साखळि कोंडा ॥ हात चटकेना उठ म्हणल तुला मोडा । काय भाजुन घालूं घोंडा ॥ चाल । तिला काय भुलसी । कशा मधुर भाषणें खुलसी ॥ किति विषयसुखामधें झुलसी । यम मारिल पद्दा मटका ॥ २ ॥ आप्त कवगाचे करिशिल लुगडीं चोळी । म्हणती घ्या घ्या उन्ह उन्ह पोळी ॥ पाट मांडा कीं पुढें घाला रांगोळी । रावजीची मर्जी भोळी ॥ विषम दिन येतां मग करितिल टाडोळी । कशा ठकला वाल्हा कोळी ॥ चाल । जवळ नाहीं अडका । मग सकल म्हणती रडका । पळताति सोयरे धडका । मडका मिळना फुटका ॥ ३ ॥ गूळ सरल्यावर सहजचि,माशा उडती । कळून,जाणुन प्राणी बुडती ॥ आपणासाठीं पदरचे लोक रडती । यातना तुझि तुला घडती ॥ देह हा गेला मग काय मिळेल पुढती । गांठ तुझी काळासवें पडती ॥ चाल । म्हणुन घर त्यागा । **चूडामणिसुत** प्रभुला गा । तो नेइल उत्तम भागा । घे अमृतरस घुटका ॥ ४ ॥

४

अरे गड्या, दुबोली दुनिया ॥ ध्रु० ॥ चोरालागीं चारी मलिदा ।
दावी धतूरा धनिया ॥ १ ॥ मूर्ख निरक्षर ते प्रभु झाले ।
कोणि पुसेना गुणिया ॥ २ ॥ लटकीं कर्मे सत्याचि झालीं ।
भात तशा या कणिया ॥ ३ ॥ साधु घरोघरिं कथिति विवेका ।
ब्रह्म मिळे मुठ चणिया ॥ ४ ॥ तीर्थे हिंडत विसरुनि गेले ।
**चूडामणि** प्रभु कन्हया ॥ ५ ॥

५

सत्य कर्म वेगळेचि वेगळेचि धापा ॥ ध्रु० ॥
हस्ति चर्मकाचे घरिं । सर्वकाळ राहे जरि ।
गजाधीश त्यास तरी । नावडे का पा ॥ १ ॥
कीटकाचि माजि घोडी । सांपडले लक्ष वोडी ।
कोण बसुन तीर्थ जोडी । दूर करुन तापा ॥ २ ॥
माशियाचा उडुन वाघ । पातल्याहि बहुत राग ।
कोण पळे पाहुन लाग । फार भरुन धापा ॥ ३ ॥
विधिनिषेधास कांहीं । सर्वथाहि वाट नाहीं ।
**चूडामणिसूनु** पाहीं । कापडाचे सापा ॥ ४ ॥

६

येई येई दयाघन रामा ॥ ध्रु० ॥
उडुपतिवदना । अंबुजनयना । कोमलतनु घनश्यामा ॥ १ ॥
जानकीजीवना । शरधनुधरणा । सीतापते गुणधामा ॥ २ ॥
**चूडामणिसुत** विठ्ठल विनवी । प्रीत असो तव नामा ॥ ३ ॥

७

या गुरुमाउलीतुल्य न दुसरें । शरण रिघुनि निज वैभव पुस रे ॥ ध्रु० ॥
मी मम, दृढतर मानसिं ठसलें । ज्याचे कृपें क्षणीं निस्तुक विसरे ॥ १ ॥
दृश्य असत्यहि सत्यचि दिसलें । आत्मपणा जनिं काननिं पसरे ॥ २ ॥
एकचि माधव अवघा भरला । **चूडामणि** लटिकेंची मिस रे ॥ ३ ॥

८

ये धांवत आज गुरुराया ॥ शरणागत मानी पायां ॥ ध्रु० ॥
इहपर दोन्ही घसरुन गेले । वरपड झालों अपाया ॥ १ ॥
द्विजकुळिं जन्मुनि सार्थक नाहीं । पतित मी गलों वायां ॥ २ ॥
निगमागमिंचें तत्त्व न कळलें । सत्यचि भासे माया ॥ ३ ॥
**चूडामणिसुत** निजकर देउन । लावि तरी गुण गाया ॥ ४ ॥

९

हरि करुणाकर फार । समजा ॥ ध्रु० ॥
मार्ग चुकोनि जातांच सेवक । देत तया आधार ॥ १ ॥
भवजळसागर गोष्पद करितो । नत जना नेतसे पार ॥ २ ॥
गोपीजनाचा बहु अभिमानी । **चूडामणिसुत** हार ॥ ३ ॥

१०

नाथ माझी कणवा येइल काय ॥ ध्रु० ॥
लंपट होउनि खटपट करितां । विसरुनि गेलों पाय ॥ १ ॥
अन्यायी अपराधी बालक । घेइ ओसंगा माय ॥ २ ॥
**चूडामणिसुत** जोडुनि पाणी । नित्य तुझे गुण गाय ॥ ३ ॥

शास्त्रीबुवांचीं हीं थोडींशीं पदें येथें दिलीं आहेत, तीं सगळीं सारखींच सरस आहेत असें नाहीं; व त्यांवरून त्यांच्या एकंदर कवितेच्या स्वरूपाची योग्य कल्पनाही होणार नाहीं. त्यांचा पदसंग्रह फार मोठा आहे; व तो असल्या अल्पचरित्रांत देतां येणें शक्य नाहीं.

---

# जयराम नाना.

अहमनगर येथें बावळे देशमुख या घराण्यांत **जयरामनाना** या नांवाचे सत्पुरुष शके १७७० या वर्षीं होऊन गेले. हे शुक्ल यजुर्वेदी देशस्थ ब्राह्मण होत. यांच्या आजाचें नांव योगीराज व आजीचें

नांव तुळजाबाई. जयरामनानाच्या वडिलाचें नांव अनंत व मातुश्रीचें नांव मुक्ताबाई. या कुटुंबाचा उदरनिर्वाह कुळकर्णी वतनांतील कांहीं भाग व कांहीं इनाम जमिनी यांवर होत असे. अनंत यांची दिनचर्या म्हणजे नित्यनैमित्तिक स्नानसंध्यादि कर्मे सारून दोन प्रहरीं गीता भागवत यांचें वाचन, सायंकाळीं देवदर्शन व उरलेल्या वेळांत अखंड नामस्मरण या प्रकारची असे. श्रीहरीचे चिंतनावांचून इतर प्रांपचिक काळजीमुळें स्वतःचा चित्तविक्षेप अनंतानें कधीं होऊं दिला नाहीं. हरिनामाच्या निदिध्यासामुळें पुढें पुढें ते इतके तद्रूप होऊं लागले कीं प्रपंचाची जवळ जवळ त्यांस विस्मृतीच पडल्यासारखी झाली. त्यांची पत्नी मुक्ताबाई ही मोठी पतिव्रता स्त्री होती. ती पतिसेवेंत निरंतर दक्ष असे. घरची राहणी अगदीं साधी असतांही, आपल्या साधुशील वृत्तीमुळें हें दांपत्य खरोखरीच्या स्वर्गीय सुखाचा आस्वाद घेत होतें.

'शुद्धबीजापोटीं । फळें रसाळ गोमटीं' या न्यायानें मुक्ताबाईचे उदरीं नारायण व जयराम अशीं दोन पुत्ररत्नें निपजलीं. भगवद्भक्तिपरायण मातापित्यांच्या तालमींत त्यांची प्रवृत्ति भक्तिमार्गाकडे सहजच वळली. आईबापांचा प्रत्यक्ष धडा नेहमी समोर असल्यामुळें, भक्ति, वैराग्य, ज्ञान वगैरे गहन विषयांचें अध्यापन या दोन बालकांस रोजचे वागणुकीचे व्यवहारांत अनायासें होत असे. दरिद्रावस्थेंत जन्म झाल्यामुळें खाणें पिणें, वस्त्रप्रावरणें, दागदागिने इत्यादि विषयांकडून त्यांची मनें निसर्गतःच परावृत्त होऊन, भक्ति, वैराग्य, ज्ञान या विषयांतच त्यांच्या मनाचा अधिकाधिक विश्वास होत गेला.

वर सांगितल्याप्रमाणें अनंत व मुक्ताबाई यांची राहणी फारच साधी असल्यामुळे नारायण व जयराम यांसही तेंच वळण लागलें व त्यांची बाळपणची क्रीडा पाहून नागरिक लोकांस अनंताचे प्रपंचाचें मोठें कौतुक वाटत असे; व जसजशीं हीं दोन भावंडें वयानें मोठीं होत चाललीं तसतशी शहरांतील तद्‌ज्ञातीय लोकांना, आपल्या मुली त्यांना देऊन आपले गोत्रज सत्पुरुषसेवेनें पवित्र करावेत, अशी इच्छा होऊं लागली. पुढें लवकरच, विशेष प्रयास न पडतां, नारायण व जयराम यांचीं लग्नें झालीं. कांहीं दिवसांनीं मुक्ताबाईस एकाएकीं देवाज्ञा झाली व त्यानंतर थोड्याच दिवसांनीं अनंतरावजीनींही आपली इहलोकची यात्रा संपविली. नारायण व जयराम यांना मातापित्यांचे सेवेचा ध्यास अखंड असल्यामुळें, त्यांच्या चिरवियोगदुःखानें त्यांच्या मनास मोठा धक्का बसला; व जगाच्या नाशवंतपणाचा अनुभव येऊन त्यांचें वैराग्य अधिकच दृढ झालें. जयराम यांनीं असा विचार केला कीं, नारायण हा आपला वडील बंधु आहे,तो प्रपंचाचा गाडा हांकीतच आहे. रात्रंदिवस ज्या मातापित्याची सेवा आपण करीत होतों, तीं एकाएकीं आपणास प्रपंचसागरांत लोटून गेलीं; आतां घरांत रिकामे बसून काय करावयाचें ? असा विचार करून,अहमद-नगर शहरचे पश्चिम दिशेला शहरापासून एक मैलावर श्रीमारुतीचें भव्य मंदिर आहे त्या ठिकाणीं जाऊन श्रीमद्भागवत व गीता यांचा अर्थ समजून घेण्यांत जयरामनाना आपला काळ घालवूं लागले. अशा रीतीन एकांतांत कालक्रमणा करीत असतां, एके दिवशीं एक बैरागी तेथें आला. त्याचें आचरण पाहून जयराम यांस फारच चमत्कार वाटला. या बैराग्यास जारणमारण विद्या

अवगत होती. त्यानें केलेले त्या विद्येचे चमत्कार पाहून, ती विद्या शिकण्याची इच्छा जयराम यांस झाली व त्या बैराग्याकडून जारणमारण विद्येचे मंत्र घेऊन त्याप्रमाणें ते पाठ करूं लागले. ह्या विद्येच्या योगानें त्यांचें वैराग्य अधिकच पक्क दशेस येऊं लागलें. लोकांत बसणें, खाणें पिणें यांजकडे मन न जाऊं देण्याची व एकांतांत बसण्याची त्यांस आपोआप संवय झाली. त्या बैराग्याबरोबर प्रवास करीत असतां जयरामनानांनीं अनेक तीर्थक्षेत्रें पाहिलीं. जातां जातां, संगमनेर शहरीं त्यांचा मुक्काम झाला. तेथें विठ्ठल महाराज या नांवाचे एक महान् सत्पुरुष वास करीत असत. त्यांच्या दर्शनाचा योग जयरामनानास आकास्मिक रीतीनें घडून आला. साधुशील मातापित्याचें वळण या जारणमारण विद्येच्या व्यासंगानें थोडेंसें कमी होत चाललेलें होतें, तें या विठ्ठल महाराजांचें दर्शन होतांच पुनः पूर्वस्थितीवर आलें. जारणमारण विद्येच्या साधनांत गढून गेल्यामुळें कपाळीं शेंदूर, हातांत वेताची छडी, मनगटास लिंबें, गळयांत ताईत, केंस वाढलेले असें आकराळविकराळ स्वरूप जयरामनानास प्राप्त झालें होतें. अशा स्थितींत विठ्ठलमहाराजांसारख्या सत्पुरुषाचें दर्शन होतांच त्यांनीं ते चमत्कारिक स्वरूप विशेष बारकाईनें निरखून पाहिलें व तें पाहत असतांना जयराम यांच्या चित्ताची चमत्कारिक स्थिति होऊन गेली. हा कोणा तरी सत्पुरुषाचा मुलगा असून, जारणमारण विद्येच्या नादीं लागल्यामुळें त्याच्या देहाचें मातेरें होत आहे, ही गोष्ट विठ्ठलमहाराजांनीं तात्काळ ताडली. त्यांनीं जयरामास 'तूं कोठून आलास ?' असा प्रश्न विचारला. परंतु जयरामास कांहीं उत्तर सुचेना. त्यांनीं "आपल्या पायापाशीं राहून

सेवा करावी" एवढीच इच्छा व्यक्त केली. पुढें जयरामनाना महाराजांची सेवा करीत असतां, त्यांची एकाग्रता, उत्कट बुद्धि, कर्तव्यतत्परता इत्यादि गुण महाराजांच्या निदर्शनास आले. एके समयीं जयराम नाना सेवेंत मग्न असतांना विठ्ठल महाराजांनीं त्यांस हाक मारली, व 'तूं आलास कोठून? तुझा जावयाचें कोठें? तूं येथें कां आलास?' इत्यादि प्रश्न विचारले. तेव्हां जयरामनानांनीं आपला सविस्तर वृत्तांत त्यांस निवेदन केला. तो ऐकून महाराज म्हणाले "अरे, तूं चांगला ब्राह्मणकुलांत जन्म घेतलास व श्रीगायत्रीचा मंत्र तुला येत असतां तो सोडून या वेड्यावांकड्या जारणमारणादि मंत्राचें पठन करतोस तेव्हां या दुर्दैवास काय म्हणावें? अतःपर तरी हा नाद तूं सोडून दे व आपल्या घरीं जाऊन श्रीहरीचें अखंड नामस्मरण करीत रहा."

विठ्ठलमहाराजांच्या सान्निध्यानें जयरामनानाचें बुद्धिमालिन्य नाहींसें होऊन पूर्ण सात्विक बुद्धीचा उदय झाला होता, त्यांत महाराजांनीं स्वतः उपदेश केल्यावर, त्यांचें चित्त ठिकाणावर येण्यास विलंब लागला नाहीं. एतद्विषयक स्वानुभव त्यांनीं एका अभंगांत वर्णिला आहे तो अभंग असाः—

जो जो करूं जावा संग । तो तो होतो मनोभंग ॥
विषय नामाची संगती । पदोपदीं ही फजिती ॥
तळमळ चिंता गाढी । चित्तीं संशयाची आढी ॥
**जयराम** उमजला । **विठ्ठल** गुरू सखा केला ॥

जयरामनानाची गुरुपरंपरा येणेंप्रमाणेंः—

**अभंग**

**चैतन्य संप्रदाय परंपरा हंस । केला उपदेश ब्रम्हयासी ॥**
**आदि नारायण ब्रम्ह अत्री दत्त । जनार्दन एकनाथ नरहरी ॥**

कमळाकर बल्लाळ राम हा बल्लाळ । जयराम विठ्ठल उपदेशिला ॥
पुनः विठ्ठलाचा दास जयराम । परंपरा वर्म ऐसें आहे ॥

श्रीविठ्ठल महाराजांनीं जयरामनानावर कृपा करून त्यांस आपल्या जन्मभूमीस जाण्याची आज्ञा दिली. परंतु श्रीगुरुसेवेंत अंतराय होईल व त्यांचे सहवासांत दिवस ज्या आनंदांत गेले, तो आनंद, घरीं गेल्यावर आपणास प्राप्त होणार नाहीं, याबद्दल जयरामनानास वाईट वाटलें. जयरामास आपण घरीं जाण्यास सांगितलें असतांही तो जात नाहीं, हा त्याचा निग्रह पाहून विठ्ठल महाराजांस समाधान वाटलें. मग ते त्यांस म्हणाले " बा जयरामा, तुझें लग्न झालें आहे. तरी अशा उदासीन वृत्तीनें न राहतां घरीं जाऊन प्रपंच व परमार्थ दोन्ही साध. माझा तुला ध्यास लागला आहे, हें मी जाणून आहें. परंतु मी जरी दूर असलों तरी तुझी विस्मृति मला कधीं होणार नाहीं. " इतकें झाल्यावर श्रीगुरूंचा निरोप घेऊन, जयरामनाना नगरास येण्यास निघाले. घरीं आल्यावर वडील बंधु नारायण यांचे सहवासांत, परमार्थ-संपादनाकडे आपल्या आयुष्याचा व्यय ते करूं लागले. श्रीमद्भागवत, गीता, रामायण यांचें वाचन व सायंकाळीं प्रेमळ हरिभजन, असा त्यांचा नित्यक्रम असे. त्यांचें प्रेमळ भजन ऐकून कांहीं नागरिकही भजनास येऊं लागले.

जयरामनानाचे घरीं श्रीगोविंदनामस्मरण फारच प्रेमानें होत असे. दर एकादशीस श्रीगोविंदाचा नामसोहळा अहोरात्र होऊन श्रीद्वादशीचा पर्वकाळ मोठ्याच समारंभानें साजरा होई. साध्या भाजी भाकरीचा प्रसाद मिळविण्याकरितां मुमुक्षु जनांच्या उडया पडत. भोजनाचे वेळीं खालील श्लोक म्हणण्याचा संप्रदाय असेः—

उपासनेला दृढ चालवावें । भूदेव संतांसि सदा नमावें ।।
सत्कर्मयोगें वय घालवावें । सर्वां मुखीं मंगल बोलवावें ।।
श्रीराम जयराम जयजयराम हरि विठ्ठल !
सत्संगतीचा महिमा कळेना । सत्संग कोठें श्रमल्या मिळेना ।।
सत्संगतीनें तुटली कुबुद्धि । सत्संग झाल्या बहुसाल सिद्धी ।।
मी हीन सर्वांपरि रामचंद्रा । दयाळ तूं रे करुणासमुद्रा ।।
माझे बरे वाइट सर्व कोटी । अपराध सारे हरि घाल पोटीं ।।
पादांबुजा नमन मी करितों दयाळा । तारील कोण मजला दिनबंधु बाळा ।।
संसारदुःख समुळें हरिं या प्रसंगा । धावोनियां करिं धरीं मज पांडुरंगा ।।
तुजवांचुनि कोण असे मजला । शरणागत लाज तुझी तुजला ।।
पडिलों भ्रमणीं करिं पूर्ण दये । हरि ये हरि ये हरि लौकर ये ।।

श्लोक म्हणून झाल्यावर ' गोविंद ' ' गोविंद ' या नामामृताच्या योगानें भोजनाची रुची वाढून चित्ताला एक प्रकारचा अपूर्व आनंद वाटत असे.

दर वर्षी श्रीरामजन्मोत्सव, श्रीहनुमानजयंती व श्रीदत्तजयंतीचा सात दिवस नामसप्ताह मोठया ऋडाक्यानें होत असे. श्रीदत्तजयंतीच्या नामसप्ताहास प्रारंभ मार्गशुद्ध ९ रोजीं प्रातःकाळीं होऊन शुद्ध १३ रोजीं दोन प्रहरीं, रात्रौ, श्रीच्या जन्मकालीं फारच प्रेक्षणीय सोहळा होत असे; व वद्य प्रतिपदेस श्रीच्या नामसप्ताहाची समाप्ति उषःकालीं होऊन श्रीस सहस्रभोजनाचा नैवेद्य समर्पिला जात असे. देशोदेशींचे वैष्णवजन व भाविक बाळगोपाळ या उसत्वास येऊन तो फारच प्रेमानें साजरा करीत. " जयरामाचे घरीं उत्पन्न कांहीं नाहीं व खर्च तर अतोनात होतो; रोज पंक्तीला शेंकडो बाळगोपाळ जेवतात, " याबद्दल गांवांतील शेटसावकार, नोकरचाकर वगैरे लोकांना मोठा अचंबा वाटे. पुढें कांहीं गृहस्थ जयरामनानाचे शिष्य झाले, त्यांत

जटाशंकर, जयराम, माधवराव पारनाईक, विठोबा तात्या ही मंडळी होती. त्या प्रत्येकानें एकेक काम पतकरलें. जटाशंकर यांनीं भोजनाची सर्व सिद्धता करावी. जयराम यांनीं सर्व सामग्री तयार करावी. माधवराव व विठोबातात्या यांनीं सर्वांस पोटभर भोजन घालावें. याप्रमाणें जयरामनानाचे घरीं भजनाचा व भोजनाचा थाट फार वर्णनीय होत असे.

जयरामनानाची भार्या रेणुकाबाई ही फार ममताळु व कष्टाळु बाई होती. ती अखंड पतिसेवेंत निमग्न असून अतिथि अभ्यागत यांची सेवा करण्यास रात्रंदिवस तत्पर असे. रेणुकाबाईस नरहरि, वैकुंठ व गोविंद असे तीन पुत्र झाले. जयराम यांस लेखनवाचनाचा फार नाद असे. ते नित्य रात्रौ लिहीत बसत. त्यांनीं श्रीमद्भागवताचा दशमस्कंध मोठ्या अक्षरांनीं स्वतः लिहून काढला. आपण जें कांहीं लिहिलें तें ध्यानांत आणून, तें आपणास कसें समजलें याची प्रचीति म्हणून, शिष्यमंडळापैकीं सुदर्शन स्वामी यांजकरवीं ‘ सुदर्शनबोध ’ नामक एक ग्रंथ त्यांनीं लिहविला. भजनाचे वेळीं ‘ जयहरि गोविंद राधे गोविंद ’ या प्रेमळ नामस्मरणांत सतत नाचत नाचत तल्लीन होऊन, देहभावाचा विसर पडून, प्रेमाच्या व आनंदाच्या वर्षावानें जयरामनाना थबथबून जात असत. प्रेक्षकांचे चित्तासही प्रेमाचे पाझर फुटून, ‘ ब्रह्मानंदीं लागली टाळी । कोण देहातें सांभाळी ’ अशी त्यांची स्पृहणीय अवस्था होत असे. जयरामनाना यांनीं स्वतः बऱ्याच ओंव्या, अभंग, सौऱ्या वगैरे कविता रचिली आहे. श्रीरामजन्माचे अभंग, श्रीहनुमानजन्माचे अभंग, श्रीदत्तजन्माचे अभंग वगैरे त्यांचीं प्रकरणें प्रेमळ आहेत. ही त्यांची सर्व कविता अद्याप अप्रका-

शित असून, ती अहमदनगर येथें त्यांच्या वंशजांपाशीं असण्याचा संभव आहे. परंतु, ती माझ्या हातीं येणें, प्रस्तुत स्थितींत, अशक्यप्राय असल्यामुळें, तिच्याशीं वाचकांचा परिचय मला करून देतां येत नाहीं, याबद्दल फार वाईट वाटतें. तथापि, प्रस्तुत चरित्र-लेख ज्या लेखाची जवळ जवळ नक्कलच आहे, त्या लेखाचे कर्ते रा. गणेश नरहरिबुवा यांनीं ' मुमुक्षू ' त दिलेलें त्यांचें एक पद वाचकांस येथें सादर करितों:—

**पद** ( अर्जुना तूं जाण रे० )

गोविंद गोविंद बोल गे । प्रेमानंदें डोल गे ।
माया मोह प्रपंच जैसे हरबऱ्याचे फोल गे ॥ १ ॥
वैऱ्याग्याची कास गे । धरीं सावकाश गे ।
भाऊबंद घर सखे सोड यांची आस गे ॥ २ ॥
विवेक नाहीं ज्यास गे । करीं त्याचा त्रास गे ।
रामनामावीण गडे घेऊं नको ग्रास गे ॥ ३ ॥
विठ्ठलचरणीं भाव गे । **जयरामीं** स्वभाव गे ।
सांगितल्याची सोय धरुनी करणो करुनी दाव गे ॥ ४ ॥

ह्या एकाच पद्यावरून जयरामनानाच्या सहज सुलभ व प्रेमळ पद्यरचनाशक्तीची वाचकांस कल्पना होईल.

दरसाल आषाढी पौर्णिमेस जयराम नानाचे घरीं श्रीचा गोपाळ-काला होत असे. जयराम यांच्या चिरंजीवांपैकीं गोविंदबुवा यांस संस्कृत भाषेचें ज्ञान चांगलें होतें. त्यानीं श्रीमद्भागवतांतील दशम-स्कंधांत वर्णन केल्याप्रमाणें श्रीकृष्णाची बालक्रीडा बालगोपालांस संस्कृतांत शिकवून त्यांजकडून पाठ करविली व तिचा प्रयोग, टिपऱ्या वगैरेच्या तालावर, श्रीगोविंदनामाच्या जयजयकारांत, फार

प्रेक्षणीय होत असे. श्रीचे गोपाळकाल्यांत जीं सोंगें येत असत तीं— श्रीकृष्ण, गर्गाचार्य, महाबळ, पूतना, गोपी, गोपाळ, यमलार्जुन, अर्धांगी पार्वती, भाट, महादेव नारद, पेंद्या, सुदामा, राक्षस वगैरे. अर्धांगी पार्वतीचें सोंग फारच प्रेक्षणीय होई. गोविंदबुवा हे दर एकादशीचे जागरणीं श्रीजयदेवकृत अष्टपद्या फार प्रेमळपणानें म्हणत असत.

रेणुकाबाईस गोपिका, गंगा व राधा या तीन सुना होत्या. त्याही आपल्या सासूप्रमाणें पतिसेवापरायण व देवकार्यनिमग्न असत. अहमदनगरापासून दोन मैलांवर भिंगार नामक गांव आहे. तेथें सखाराम महाराज ह्मणून महान् वैष्णव होते त्यांची व जयरामाची नेहमीं भेट होत असे. खाकीबुवा बैरागी, पद्माकर महाराज ही वैष्णव मंडळी त्या वेळीं होती. त्यांनीं परस्परांस भेटून एकांतांत परमार्थविचारणा करावी, आपल्या चित्तांतील संदेहाच्या गांठी परस्परांकडून सोडवाव्या, चित्ताची व चैतन्याची गांठ घ्यावी असा क्रम चालू असे.

अशा रीतीनें पंचवीस वर्षें श्रीहरिभजनांत घालविल्यावर, जयराम यांनीं एके दिवशीं आपल्या शिष्यमंडळीस व मुलांलेंकरांस जवळ बोलाविलें व सांगितलें कीं "श्रीगुरु विठ्ठलमहाराजांनीं मज पामरावर कृपा केली व हे आनंदाचे दिवस दाखविले. परंतु यापुढें आतां या देहाचा भरंवसा नाहीं. आजपर्यंत जो आनंद झाला तोच पुढें चालू ठेवा." आपला मुलगा नरहरी यास जयरामांनीं सांगितलें कीं, "तीन भकार आहेत, ते जतन करा. एक **श्रीमद्भागवत** अखंड वाचावें. दुसरें, गोविंदाचें **भजन** प्रेमानें करावें; व तिसरें आल्या

गेल्यास यथाशक्ति भोजन घालावें. माघशुद्ध ७ स माझें देहावसान होईल असा अजमास आहे. श्रीराधे गोविंद संस्थानाची स्थापना झाली आहे.त्या गादीची सर्व शिष्यमंडळीनें व बाळगोपाळांनीं सेवा करावी."

जयरामाचे हे निर्वाणीचे उद्गार ऐकतांच, त्यांच्या शिष्यमंडळीनें त्यांस माघ शुद्ध प्रतिपदे दिवशीं चतुर्थाश्रमाची दीक्षा दिली. पुढें सात दिवस भजनाचा सोहळा झाला; व पूर्वी सूचित केल्याप्रमाणें माघ-शुद्ध ७ ( रथसप्तमी ) स उषःकालीं जयराममहाराज समाधिस्थ झाले. सर्व शिष्यांनीं, समाधिस्थितींत महाराजांचें दर्शन घेऊन टाळ, वीणा, मृदंग, पताका, दुंदुभि इत्यादि सामग्री तयार करून दिंडीचा सोहळा केला; व तुळशी, फुलें, बुका, गुलाल, यांच्या गालिच्या-वरून स्वामीस मिरवीत नेऊन सायंकाळीं समाधीचा सोहळा पूर्ण केला. उत्तरेस समाधीची जागा ठरविली व यथाशास्त्र सर्व विधि करून स्वामीचे शिष्यमंडळीनें तेथें श्रीचे नामसप्ताहास प्रारंभ केला. कै. भास्कर दामोदर पाळंदे हे त्या वेळीं अहमदनगर येथील स्मॉल कॉज कोर्टाचे न्यायाधीश होते त्यांनीं, समाधीकडे दरमहा (?) १००रु. देण्याचा क्रम ठेविला होता. याशिवाय, आबाजी नानाजी सातभाई, पेन्शनर फर्स्ट क्लास सबजज्ज; रा. सा. करंदीकर; कै. गोपाळराव हरि देशमुख; विष्णु मोरेश्वर भिडे इत्यादि थोर थोर गृहस्थांनीं स्वामीच्या समाधीवर एक भव्य इमारत उभारली. हा मठ अहमदनगर शहराचे उत्तर बाजूस दिल्ली दरवाजाचे बाहेर गांवकुसाला लागूनच आहे. कै० गोपाळराव हरि देशमुख, विष्णु मोरेश्वर भिडे आणि रा. सा. पाळंदे हे आंग्लविद्याविभूषित व सुधारक म्हणून प्रसिद्ध

असलेले गृहस्थ जयरामनानाच्या भजनीं लागले, यावरून, सर्व प्रकारच्या व सर्व मतांच्या लोकांची त्यांच्या साधुत्वाविषयीं पूर्ण खात्री झाली असली पाहिजे हें उघड दिसतें.

जयराममहाराजानीं स्थापिलेल्या राधेगोविंद संस्थानाच्या गादीची सेवा पुढें नरहरिबुवांनीं केली; व त्यांचे पश्चात् त्यांचे चिरंजीव रामचंद्र, रंगनाथ, शंकर व गणपति हे आज तागायत करीत आहेत. श्रीदत्तजयंतीचा उत्साह, जयराममहाराज यांच्या पुण्यतिथिनिमित्त नामसप्ताह, यथाशक्ति ब्राह्मणभोजन, श्रीमद्भागवताचें पुराण त्यांचे मठांत आजपावेतों चालू आहे; व भगवंताचे कृपेनें पुढेंही चालेल यांत संशय नाहीं. श्रीजयरामस्वामीचे शिष्य सखारामबुवा ठाकर यांचा पंचपदीचा नित्यपाठ समाधीपुढें सतत चालू आहे. या मठांत श्रीनिवृत्तिनाथ यांची पालखी दरवर्षीं पंढरीस जातांना व येतांना उतरते. दरसाल आषाढी पौर्णिमेस गोपाळकाल्याचा मोठा उत्सव होतो.

जयरामनानाची कविता, त्यांचे वंशज व शिष्य प्रसिद्ध करितील काय?

---

# वामन नानाजी देशपांडे.

प्रस्तुत ग्रंथांत ज्या मौनीस्वामींचें चरित्र पूर्वी दिलें आहे त्यांचे प्रस्तुत कवि हे चिरंजीव होते. मौनीस्वामी आपल्या पूर्वाश्रमीं अहमदनगराकडे रोजगारानिमित्त गेले होते, तिकडे कडे अष्टी या गांवीं प्रस्तुत कवींचें जन्म, शके १७६० च्या सुमारास झालें. मौनी स्वामीच्या पत्नी सौ. यमुनाबाई यांचे पहिले चिरंजीव शिवराम तात्या. मुंबईंतील मौनी स्वामीच्या ठाकुरद्वारची मालकी व

व्यवस्था शिवराम तात्यांच्या वंशजांकडे आहे. शिवराम तात्यांच्या पश्चात् यमुनाबाईस भागीरथी नामक कन्या झाली व वामनराव हे त्यांचें तिसरें अपत्य होय. वामनरावांचें उपनयन सिन्नर येथें झालें. त्यानंतर मराठी हिशोब, लिहिणें वाचणें, व्याकरण, इतिहास, भूगोल, गणित व मोडी अक्षर वगैरे त्यांचें शिक्षण प्राथमिक शाळेंत झालें. घरीं संध्या, पूजा, वैश्वदेव, उपनिषदें वगैरे वेदांतशास्त्रावलोकन झालें. नंतर वयाचे १६ वे वर्षी, वृत्तिवंत मुळे जोशी मल्हार दिनकर रत्नाकर यांची कन्या सरस्वती इजबरोबर त्यांचा विवाह झाला. घरची स्थिति चांगली असल्यामुळें, वामनरावजींस प्रपंचाची काळजी विशेष नव्हती. घरची शेतीभाती असून वडील बंधु मौजे येथील कुलकर्णी होते; ह्मणून शास्त्राभ्यास, वेदांतावलोकन आणि भगवद्भक्ति इकडे त्यांनीं लक्ष लावलें. शिवाय तीर्थरूप साधु; ते जरी जामनेर तालुक्याचे फडणीस मामलेदार होते तरी त्यांच्या मनाचा कल परमार्थाकडेच विशेष होता. यामुळें वामनरावजींस ईश्वरभजनीं प्रेम सहजच उत्पन्न झालें. पण पुढें सगळेंच पारडें अकस्मात् फिरलें. वडिलांनीं शेवटचे बाजीराव पेशव्यांजवळ दप्तरदारी करून पालखी अबदागीर मिळाविलेली आणि त्यांचे तीर्थरूप—कवीचे पितामह—भिकाराम यांनीं औंढ्यापट्टयास चवल्याचा* मामला केलेला. असें असतां, मिळविलेलें द्रव्य सिन्नर येथें एका सावकाराकडे ठेवलें होतें तें बुडालें व कार्यांतरवशात् कवीच्या पित्याचें आगमन मुंबई शहरीं झालें. तेथें,

---

* त्या वेळीं शेळ्या मेंढ्यांवर चवली कर असे व त्याबद्दल मामलती मक्त्यानें देत. त्यास चवलीचा मामला म्हणत.

पितृसेवेंत व श्रवण, मनन, निदिध्यासन व ईशभजन यांत वामनरावजींची कालक्रमणा होऊं लागली. मुंबईस आंग्र्याचे वाडींत मौनी स्वामीचें वास्तव्य असतां, वामनरावजींस पुत्र श्रीधर व दुर्गा नामक कन्या अशीं दोन अपत्यें झालीं. पुढें थोडयाच दिवसांनीं वामनरावजींस आमवाताचें जबर दुखणें झालें. वैद्य उपचार बहुत केले. शेवटीं, कल्याण भिवंडीकडे डोंगरांत गोतर्शिंगीचे कंद मिळतात ते आणून ओल्या खोबऱ्याबरोबर खाल्ले. त्या योगें आमवात दूर झाला, परंतु दुखण्यांत पाय पोटाशीं धरून निजल्यानें, अशक्ततेनें व पाय वरचेवर न लांबविल्यामुळें गुढघ्यांच्या शिरा आंखडून जाऊन वामनरावांस जन्माचें पंगुत्व आलें.

अपंग अवस्था, तरी हातांत लांकडी खडावा घेऊन घरांत सर्वत्र फिरावें, स्नान, भोजन, शतपावली, पूजन वगैरे करावें, माडया पायऱ्या चढाव्या, याप्रमाणें उद्योग ते करीत. नंतर तशा स्थितींतच, तीर्थरूप श्रीमौनीनाथ स्वामी यांजबरोबर त्यांनीं बऱ्याच यात्रा केल्या. प्रथम नासिक, त्र्यंबक, सप्तशृंग, चांदवड, डुबेरें, पुणें, नगर, पैठण, राशीन, फलटण, शंभुमहादेव, पंढरपूर, वेरूळ, कोल्हापूर वगैरे, नंतर मुंबईहून ठाणें, कल्याण, नासिक, सिन्नर, नागपूर, जबलपूर मनमाड, मालेगांव, धुळें, इंदूर, खडखडिया बजरंगगड, ओंकार उज्जनी, ग्वालेर, भरतपूर, मथुरा, गोकुळ, वृंदावन,कामवन, गोवर्धन, दिल्ली, आग्रा, हस्तिनापूर, ब्रह्मावर्त, कानपूर, अयोध्या, प्रयाग, काशी इत्यादि ठिकाणीं त्यांनीं प्रवास केला. काशी येथें कायमचा मुक्काम करावा या विचारानें ११०० रुपयांस ब्रह्मघाटावर, आंग्र्याचे

वाड्या शेजारीं, भोसले बाईचा वाडा विकत घेतला. श्रीमौनीस्वामी, शिवराम तात्या, त्यांची पत्नी रंगूबाई, वामनराव, त्यांची पत्नी सरस्वती, पुत्र श्रीधर, कन्या दुर्गा, शालक भाऊभट, सासू गंगाताई, धर्ममाता काशीमाई, गौडसारस्वत ब्राह्मण अंतोबादादा व त्यांची मंडळी इतकीं माणसें यात्रेस गेलीं होतीं. इतर मंडळीसाठीं चार गाड्या व मौनीस्वामी करितां १ मेणा व ९ भोई आणि रक्षणार्थ एक मोठा कुत्राही बरोबर होता.

'प्रयत्नांतीं परमेश्वर' ही ह्मण खरी आहे, पण वस्तुतः अन्नोदकऋणानुबंधाप्रमाणेंच बहुतेक गोष्टी घडून येतात. सद्गुरुसेवा करून आजन्म काशीवास करावा असा वामनरावजींचा मनोदय. परंतु त्यांस व मौनीनाथ यांस काशीची हवा मानवली नाहीं. प्रकृति नादुरुस्त होऊन रक्त आमांशाचा विकार जडला व त्यामुळें स्वदेशीं निघून येणें भाग पडलें !

काशी येथें, बरोबरच्या सर्व मंडळीसह वामनरावजींनीं सुमारें ११ महिने वास्तव्य केलें. त्या वेळीं त्यांनीं खरेदी केलेला वाडा, 'सिन्नरकराचा वाडा", श्रीराधाकृष्णविलासभुवन, ब्रह्मघाटावर, अद्याप आहे. अलीकडे, वामनरावजींचे पुत्र श्रीधरशास्त्री यांनीं, त्या वाड्यास लागून असलेला दुसरा एक लहानसा वाडा कांहीं वर्षांपूर्वीं ८०० रुपयांस खरेदी केला. वामनरावजींची पत्नी सरस्वतीबाई, काशी येथेंच प्रसूत होऊन निवर्तली. ही बाई मोठी साध्वी, अत्यंत पुण्यशालिनी होती.

पत्निवियोग फार दुःसह आहे; पूर्ववयांत माता, मध्यमवयांत स्त्री

आणि उत्तरवयांत पुत्र यांचा वियोग होणें ह्मणजे मोठें दुर्दैव होय. " भार्या मृता सर्व सुखस्य भंगः " परंतु ज्ञानी वामनरावजींनीं वैराग्यविवेकानें मनाचें शांतवन केलें. पुढें काशींतच, आपला पुत्र श्रीधर याचा त्यांनीं व्रतबंध केला. नंतर कांहीं दिवसांनीं सर्वच मंडळीस स्वदेशीं येणें कसें भाग पडलें तें वर सांगितलेंच आहे. स्वदेशीं येत असतां वाटेंत धुळें येथें १०८ श्रीमद्भागवत सप्ताह व सहस्र ब्राह्मणभोजन घातलें. पुढें सिन्नरास गेल्यावर, तेथें मौनीनाथांचे तीर्थरूप ( हेही संन्यासी होते ) यांची समाधि श्रीभैरवनाथमंदिरासमोर सरस्वती नदीकांठीं आहे, तिची दुरुस्ती करून पक्की चिरेबंदी केली व वर पादुका स्थापून, अर्चा केली. हल्लीं ही समाधि पडत चालली आहे, पण वंशज तिकडे लक्ष देत नाहींत.

पुनः सर्व मंडळी मुंबईस आली. यात्रेस खर्च झाला तो बहुतेक सगळा मौनीस्वामीच्या शिष्यांनींच केला. बरेच शिष्य नासिकास येऊन सद्गुरूस प्रेमानें मुंबईस घेऊन गेले. त्या वेळीं मुंबईंत पाण्याचे नळ नुकतेच आणले होते व आगगाडी नासिकापर्यंत सुरू झाली होती. शिष्यांपैकीं एकानें स्वामीसाठीं नवीन घर बांधविलें होतें त्यांत सर्व मंडळी राहिली. कांहीं दिवसांनीं वामनरावजींचा पुत्र श्रीधर याचें व कन्या दुर्गा इचेंही लग्न मुंबईंतच झालें. प्रसिद्ध पुणेंकर पंडित वे. शा. सं. नारायण पंडित पुराणिक, श्रीमौनी स्वामीचे शिष्य, यांचा पुतण्या जगन्नाथ यास सालंकृत कन्यादान केलें. तदनंतर वडील बहुत वृद्ध झाले व त्यांची शरीरप्रकृतीही बिघडली, तेव्हां समाधीस स्थळ असावें व राममंदिर स्थापन करून

भक्तिमार्ग वाढविण्याचा सद्गुरूंचा उद्देश सिद्धीस जावा एतदर्थ, शिष्यवर्गांतर्गत कै. भास्कर त्र्िंबक आचार्य यांची जागा ठाकुरद्वारीं कोळ्याचेंवाडींत श्रीविठ्ठलमंदिराजवळ होती ती पसंत करून, वामनरावजींनीं ३०० रु. देऊन आपले स्वतःचे नांवानें 'साटेखत' केलें, व वर्तमानपत्रांत नोटीसाही दिल्या. नंतर पांच काळ्या जागा ३५०० रुपयांस खरेदी करून, काशीहून वडील बंधूस बोलावून, उभयतांचे नांवांचें खरेदी खत केलें. पुढें बंधूशीं बेबनाव झाल्यानें वामनरावजी सिन्नरास गेले व तेथें राहून तेथील वडिलार्जित मिळकतीची वहिवाट करूं लागले. तेथें त्यांनीं कांहीं कविताही केल्या व त्या चतुःशास्त्र-संपन्न धोंडभट तात्या शास्त्री यांस दाखविल्या. शास्त्रीबुवांस सदर कविता पसंत पडल्या. आपले गुरुबंधु श्रीहरिभक्त राजारामबुवा निसाळ, हरिदास यांसही आपली कविता वामनरावजी दाखवीत असत. त्यांच्या कविता, कै. गोपाळराव हरि देशमुख, रामचंद्र दिनकर परांजपे, न्या. मू. महादेव गोविंद रानडे, कृष्णाशास्त्री राजवाडे, गणेश शास्त्री मालवणकर, पिता व गुरु मौनीनाथ व ज्येष्ठ बंधु शिवराम तात्या इत्यादि मंडळींनें पाहिल्या होत्या.

वामनरावजींच्या घराण्यांत वडीलपणाबद्दल बरींच वर्षें तंटा चालला होता. चौदा पंधरा पिढ्यांपूर्वीं मूळपुरुष नरसी केशव यांस दोन स्त्रिया. त्यांपैकीं धाकटे स्त्रीचा पुत्र वयानें मोठा म्हणून तोच घरचा कारभार पाहूं लागला. पुढें त्याचे वंशज 'वडीलपणा आमच्या घराण्याकडे' असें ह्मणूं लागले. परंतु शास्त्रवचनाप्रमाणें खरा वडीलपणा ज्येष्ठ पत्नीच्या वंशजाचा. हा रुढा इतकीं वर्षें

चालूच होता. शेवटीं वामनरावजींनीं महत्प्रयासानें, कागदपत्र, वंशवृक्ष व इतर पुरावा, अहमदनगर येथील कलेक्टरपुढें शाबीद करून, सिन्नर व निफाड तालुक्यांतील सर्व देशपांडे घराण्यांत यांचें घराणें वडील आहे, अशा अर्थाच्या दोन सनदा मुंबईच्या गव्हर्नर-साहेबांच्या सहीशिक्क्यानिशीं मिळविल्या; त्या अद्यापि त्यांच्या नांवावर कायम आहेत.

वामनरावजींची गुरुपरंपरा मौनीस्वामीच्या चरित्रांत दिलीच आहे. स्वतः वामनरावजींनीं कोणास उपदेश दिला नाहीं. फक्त त्यांचे चिरंजीव वे. शा. सं. श्रीधर शास्त्री यांनीं सपत्निक शरण जाऊन, त्यांजकडून श्रीरामनाम मंत्रपूर्वक महावाक्य वेदमंत्र ग्रहण करून अनुग्रह घेतला.

शके १८०९ सर्वजिन्नाम संवत्सर फाल्गुन शु० १३ रोजीं सिन्नर येथें दिवसा दोन वाजतां वामनरावजींस देवाज्ञा झाली. तदनंतर पुत्र व शिष्य श्रीधरशास्त्री यांनीं मुंबईहून येऊन त्यांचा अस्थिनिक्षेप नासिकास गोदावरींत रामकुंडांत केला. तेरावे दिवशीं सर्व भाऊबंध प्रसादास आले. रात्रौ पुत्रानें स्वतः कीर्तन केलें.

वामनरावजींनीं बरीच कविता लिहिली त्यांतील कांहीं कविता त्यांचे विद्वान् चिरंजीव वे. शा. सं. श्रीधरशास्त्री यांनीं "काव्यकोष"

---

१ हा ग्रंथ 'निर्णयसागर' छापखान्याचे मालक कै. तुकाराम जावजी यांनीं फुकट छापून दिला व वे. शा. सं. श्रीधरशास्त्री यांनीं त्याच्या प्रति शास्त्री, पुराणिक, हरिदास, संत, ग्रंथकार वगैरे मंडळीस स्वतःच्या खर्चानें फुकट पाठविल्या हें त्या उभयतांसही अत्यंत भूषणास्पद होय.

नामक पुस्तकांत प्रसिद्ध केली आहे. १ भजनमाला (पदें, अभंग वगैरे) २ श्रीमौनीस्वामीचरित्र (ओव्या ११९) ३ श्रीसिद्धबोधानुवाद, (श्लोक १५९) ४ स्वरूपज्ञानादर्श (श्लोक १०८ हा ग्रंथ अपूर्ण आहे.) ५ श्रीरामगीता टीका (श्लोक ६२), ६ श्रुतिस्तुति (श्लोक ४५) ७ षट्पदी स्तोत्र (आर्या ११), ८ निर्गुण परा पूजा (श्लोक ६), इतकीं प्रकरणें वरील काव्यकोषांत समाविष्ट झालीं आहेत.

वे. शा. सं. श्रीधरशास्त्री यांनीं आपल्या पूज्य तीर्थरूपांची कविता प्रसिद्ध करून पितृऋण फेडलें, याबद्दल ते अभिनंदनास पात्र आहेत. त्यांनीं लिहून पाठविलेल्या माहितीच्या आधारानेंच प्रस्तुत चरित्रलेख लिहिला आहे.

वामनरावजींची कविता केवल परमार्थपर असून अगदीं साधी आहे; किंबहुना, ती पद्यात्मक आहे ह्मणूनच तिला कविता ह्मणावयाचें. काव्याच्या दृष्टीनें पाहण्याचा हा विषयच नव्हे. आतां त्यांच्या ग्रंथांतले थोडेसे उतारे नमुन्यादाखल देऊन हें चरित्र पुरें करूं.

### पद

रामा तारक तुझे पाय ॥ ध्रु० ॥ स्थिरचर व्यापुनि अगणित उरले । माया लाजुनि जाय ॥ १ ॥ जे भवरोगें ग्रस्त तयांसी । औषध तीर्थ उपाय ॥ २ ॥ स्पर्शें मुक्तचि गौतमजाया । होउनि भवना जाय ॥ ३ ॥ अमरचि झाला सेवुनि मारुति । सागर उतरुनि जाय ॥ ३ ॥ भवपाशांतुनि सोडविं **वामना** । कौतुक पाहसी काय ॥ ४ ॥

### पद

पावन पाय चला पाहूं । दैशिकसदनाप्रति राहूं ॥ ध्रु० ॥ राहिल्या गुरुकृपेचेनि कोडें । निष्काम पुण्य पदरिं जोडे ॥ पुण्यें अंतःकरणशुद्धि । तया उपजे मोक्षबुद्धि ॥ १ ॥ मुमुक्षु तीव्र अनुतापें । शरण जाय गुरु मायबापें ॥

सद्गुरुराय दयाभरित । जीवात्मैक्य बोध करित ॥ २ ॥ सच्चित्सुख ब्रम्ह लक्षी । प्रतीति तिन्हि देउनि साक्षी ॥ प्रगटोनि तीव्र बोधभानु । गत अज्ञानतम काय वानूं ॥ ३ ॥ जीवन्मुक्त करी जो कां । कृतकृत्य होय मुक्त शोका ॥ अनुदिनिं **वामन** लक्षि पाया । उपेक्षा नसे गुरुराया ॥ ४ ॥

## पद

आदिपुरुषा निर्गुण रामराया रे । शेषवाणी कुंठित गुण गाया रे ॥ ध्रु० ॥ तूं अद्वय सच्चिदानंद मूर्ति रे । वेदशास्त्रें वर्णिती तुझी कीर्ती रे ॥ १ ॥ तूंचि सर्वनियंता जगपाळा रे । ब्रह्मादिकां वर्तक ज्ञानकळा रे ॥ २ ॥ उभा विराट न होय सर्व जड रे । ज्ञानकळेवांचुनि अवघड रे ॥ ३ ॥ स्वादु स्वादु भोग हे चर्मखंडा रे । देहभिंत चालवी दुडदुडा रे ॥ ४ ॥ दीनबंधु दयाळा दीन-नाथा रे । तुझे चरणीं **वामन** ठेवी माथा रे ॥ ५ ॥

## पद

असा करिं संग । जेणें होय त्वरित भवभंग ॥ ध्रु० ॥ सुसंग तो हा पुण्य-जनाचा । परोपकारी कल्पद्रुमाचा । कीर्ति गौरव भागवताचा । नामानुषंग ॥१॥ धन्य नारद प्रल्हादाचा । वसिष्ठ पराशर मुनि व्यासाचा । शुक योगींद्र परी-क्षितीचा । प्राप्त श्रीरंग ॥ २ ॥ भीष्म पुंडलीक अंबरीषाचा । बिभीषण अर्जुन रुक्मांगदाचा । अंजनीसुत ध्रुव अक्रूराचा । पाहुनी दंग ॥ ३ ॥ भरत उद्धव सुदा-माचा । पुण्यकारक श्रीदत्ताचा । रघुनाथ यती मौनीगुरुचा । **वामना** संग ॥४॥

## अभंग

पंच विषयांचा केला ज्यांनीं न्यास । तोचि हा संन्यास देहातीत ॥ १ ॥ देहत्रय घर ईषणा तें वित्त । गुण यज्ञोपवीत तोडियेलें ॥ २ ॥ तोडिला संबंध वासना शिखेचा । कामादि बंधूचा सर्वकाळ ॥ ३ ॥ सर्वासक्ती कन्या माया तेचि जाया । मोह या जांवाया त्यागियलें ॥ ४ ॥ त्यागिला कुपुत्र संकल्प द्वैताचा । मठ अद्वैताचा स्वीकारुनी ॥ ५ ॥ स्वीकारिलीं भगवीं सुबोध प्रकाश । नाहीं डाग ज्यास अज्ञानाचा ॥ ६ ॥ काम्य कर्म हेंचि त्यागिलें अज्ञान । निष्कर्म तें ज्ञान स्वीकारिलें ॥ ७ ॥ स्वीकारुनी सोहं शब्दाची हो दीक्षा । शांती सिद्धी भिक्षा क्षेमें करी ॥ ८ ॥ क्षमाजल पूर्णकमंडलु शम । हातीं दंड दम धरि-येला ॥ ९ ॥ धरिला तुरीय चतुर्थाश्रम तो । सर्व दृश्यातीत नारायण ॥ १० ॥

नारायण देव याचें ज्ञान ज्यास । त्याचा हो संन्यास अंतरींचा ॥ ११ ॥ तरी निस्पृह परमार्थी उल्हास । बाह्य त्या संन्यास असो नसो ॥ १२ ॥ असतां सस्पृह प्रपंचीं उल्लास । लोकीं जो संन्यास तरी व्यर्थ ॥ १३ ॥ जरि असे योगी अंतरीं निस्पृह । बाह्य तो संग्रह कसा करी ॥ १४ ॥ करुनी नमन श्रीगुरुचरण । तयासी वामन वांन्छितसे ॥ १५ ॥

## अभंग

पशू मारोनियां यज्ञ चे सायास । धरोनियां आस स्वर्गसुख ॥ १ ॥ माझी ही विधवा राहोनियां खास । तेणें स्वर्गवास असो मला ॥ २ ॥ पराया जीवास देवोनियां त्रास । परलोका आस करितसे ॥ ३ ॥ परवृक्षा पीडा देवोनियां देवा । घेउ हा वहावा पुण्य जोडे ॥ ४ ॥ तेवीं दुसऱ्यास दावी फळा आस । दासें द्रव्य खास भोंदितसे ॥ ५ ॥ परयोगपुण्या जोडा रे यथार्थ । स्वीया तपें अर्थ कां न जोडे ॥ ६ ॥ परजीवत्रास होती महादोष । देवा नाहीं तोष यांत कांहीं ॥ ७ ॥

## अभंग

आशा ही करावी राघवपदाची । कदा दुसऱ्याची करूं नये ॥ १ ॥ आशा ही दारुण जीवा दीनवाणा । करी अवमाना लोकीं सदा ॥ २ ॥ कष्ट पाप दुःखा भयाचें कारण । अधर्माचे स्थान आशा एक ॥ ३ ॥ आशायोगें थोर नीचत्व पावती । दास्यत्व करिती नीचा घरीं ॥ ४ ॥ आशनें हे लोक संकटीं पडती । लपोनी राहती चोरापरी ॥ ५ ॥ पंचाग्नीसाधन नवस सायास । व्रतें उपवास आशेसाठीं ॥ ६ ॥ आशेसाठीं रांडा कुशब्द बोलती । पैजारा मारिती कोंडुनियां ॥ ७ ॥ जगामध्यें आशा सर्व दुःखमूळ । जीव हा व्याकुळ चिंतारूप ॥ ८ ॥ अन्य सर्व सोडीं वामना तूं आशा । एक देव-आशा दृढ धरीं ॥ ९ ॥

भजनमाला.

## श्लोक

" देहा अन्नमय प्रकोश वदती कर्मेंद्रियें पंचका ।
प्राणा प्राणमया तसेंच वदती ज्ञानेंद्रिय पंचका ॥
तेणं युक्त मनोमयास वदती जो बुद्धिरूपें निका ।
जो आनंदमय क्रमेंचि वदती अज्ञान गा तात्विका ॥

**स्थूल** शरीरीं अन्नमयातें । सूक्ष्म शरीरीं कोशत्रयातें ॥
**प्राणमनो** वा बुद्धिमयातें । कारण देहीं सौख्यमयातें ॥
**जाणनि** ऐसें पंचहि कोशां । तीन शरीरीं याच प्रशंसा ॥
**या सकलांचें** आत्मप्रकाशा । वर्तन होतें या हृषिकेशा ॥
जाग्रत् स्वप्न सुषुप्ति यांहि सकलां विश्वादि हे जीव गा ।
स्थूलादीक समस्त भोगरचना साक्षी असे भिन्न गा ॥
दृश्याचा व्यतिरेक होत असतां साक्षीन्वयें सिद्ध गा ।
एका एक परस्परांत नसती आत्मा सदा एक गा ॥ ”

सिद्धबोधानुवाद.

## श्लोक

आकाशरूप जसि पोकळि तेविं आत्मा ;
ज्ञानस्वरूप अज मी नभ एक सद्मा ॥
कुंभांत व्यापक तसें सम अंडपिंड ।
सर्वत्र व्यापक असी चिति मी अखंड ॥
जेवीं उपाधि असतां निजपोकळींत ।
अभ्रास धारण करी नभ तेविं सत ॥
द्रष्टा सदा सकळ जीव तनुत्रयांत ।
मी जाणता विषय इंद्रिय धी अनंत ॥
तूं जाणता तरि वदे दुसऱ्या मनास ।
कां नेणसी स्वरुप निश्चल स्वप्रकाश ॥
कर्पूरवाससम चंचल दृश्यवृत्ती ।
तीला गती तसि न चालत आत्मज्योती ॥
अर्थास कल्पित मती चिति त्यांस पाहे ।
पाहोनि ध्यास न धरी प्रतिबुद्धि राहे ॥
बुद्धिद्वयामधिल ज्ञान नसोनि अन्य ।
तेथील वृत्त इकडे अवधानशून्य ॥
आकाशिं शब्द भरपूर असे निवांत ।
संयोगिं भेरि टिपरा उमटोनि शांत ॥

तत्तदुपाधिकृत ज्ञान दिसे विशेष ।
तत्रापि मूळ चित्ति व्यापक निर्विशेष ॥
जेथील तेथ समजे चितिला यथार्थ ।
प्रत्यक्ष भाव तदभाव मृषा पदार्थ ॥
माया तदंश परि कल्पित दृश्यभावा ।
द्रष्टा असंग विभु कारण सृष्टि देवा ॥
जातां घटीं नभ न जात स्थळांतरासी ।
जातां उपाधि चितिना परलोकवासी ॥
जीवास भ्रांतिकृत संसृतिचा प्रयास ।
जेसें तडुंब नभ तेंवि चितिप्रकाश ॥
वायू फिरे रज फिरे गति दृश्य अर्थी ।
आधारदृश्य चल तेंवि अधेय अर्थी ॥
चांचल्यता तसि न शुद्ध स्वरूपज्ञाना ।
साक्षी उपाधिस्थळिं जाणत अर्थ नाना ॥
सर्वेश्वरीं महतशक्ति गती अपार ।
सर्वज्ञ तो मनुजबुद्धिगती न फार ॥
धी एकदेशि निजरूपिं विकल्प नाहीं ।
धी अंतराय मग ज्ञान न अर्थ पाहीं ॥

स्वरूपज्ञानदर्श.

अज्ञाना भवमूलकत्व असतां संसारनाशास्तव ।
अज्ञाना क्षयरूप कर्मकुशलीं विद्या असे वास्तव ॥
तेथें कर्म नसे विरोधि न तमापासोन ज्या संभव ।
त्या कर्मा तमनाशकत्व न घडे विद्याच नष्टी भव ॥
अज्ञाना क्षय नाहिं रागविषयां कर्मे टळेना नरा ।
होतां कर्म तरी सदोष उपजे संसारसिंधू पुरा ॥
तेणें वाहत चालला परतिरा पावें कधीं हा नर ।
कर्मानें गति ना ह्मणोनि मनुजा तूं ज्ञाननिष्ठा धर ॥
ना हो देवमुखें प्रचोदित जसी विद्या तसें कर्मही ।

जीवातें पुरुषार्थ साधन असे कर्तव्यता प्राप्तही ॥
पक्षी पक्षद्वयें जसा उडतसे विद्या क्रिया साह्यता ।
दोघांच्याही समुच्चयें परगती ऐकावि कर्तव्यता ॥
कर्मे ना करितां श्रुति वदतसे जीवास दोषादिक ।
यातें नित्य मुमुक्षुनं निजहिता कर्मा करावें ठिक ॥
सिद्धांती वदतो स्वतंत्रचि मनें किंचिन्न आपेक्षिता ।
विद्याची पुरुषार्थ मोक्षफल दे कर्माविना जी स्वता ॥

*    *    *    *    *

ऐसें कोणि वितर्कवादि वदती तें सर्वथा सत्य न ।
जैसें केवळ कर्मसाधन नसे तद्युक्त विद्याहि न ॥
येथें दृष्ट विरोध कारण पहा देहाभिमानें क्रिया ।
वाढे देह अहंकृती गत तदा विद्या फळे अक्रिया ॥

रामगीता टीका.

## षट्पदि स्तोत्र. ( आर्या )

अविनय घालवि विष्णो, दमविं मना शमविं विषयमृगतृष्णा ।
भूतदया विस्तारीं, तारीं संसारसागरीं कृष्णा ॥ १ ॥
गंगा ही मद ज्याची, वास जया भोग सच्चिदानंदें ।
श्रीपतिपदारविंदा भवभय खेदा विनाशदा वंदें ॥ २ ॥
गतभेदही जरी मी नाथ तुझा दास मी तुला नमितों ।
होय तरंग समुद्रा, काय तरंगा समुद्र होइल तो ॥ ३ ॥
गोवर्धनधृत वामन दैत्यारी चंद्र अर्यमा नयन ।
तूं ते जाणत असतां, सुख जनिं त्या कां भवां नव्हे शमन ॥ ४ ॥
मत्स्यादिक अवतारीं विविधा रक्षुनि पुन्हा समग्र मही ।
रक्षिसि प्रभुत्व पालित, मी त्वद्भवतापभीत काम अही ॥ ५ ॥
दामोदर गुणमंदिर सुंदर वदनारविंद गोविंद ।
हे भवनिधि भिप्रंदर, मम दर दुर कर दुरंतकृत भेद ॥ ६ ॥
नारायण करुणालय आश्रयकृत मी तुझेचि पदकमला ।
ऐसी षट्पदि माझे देवा राहो सदा वदनकमला ॥ ७ ॥

पुण्यश्लोका आर्या वंदुन त्वत्पाद शंकराचार्या ।
षट्पदि भा तव सूर्या प्रतिभा आर्या स्वबोधनाकार्या ॥ ८ ॥
वाचे अमोघवीर्या जगदुद्धारार्थ शंकराचार्या ।
विग्रह तव पदचर्या दुर्लभ सुरवर समायमा आर्या ॥ ९ ॥
वेदार्थ स्फुट कार्या या जगिं अवतार शंकराचार्या ।
तत्कृत आर्या ग्रंथें तोषचि पाहुनि तदर्थ सौंदर्या ॥ १० ॥
स्फुट स्फुट नव नव आर्या प्राकृत आर्या प्रबोध सौकर्या ।
श्रीराम मौनिवर्या वचन सपर्या हि वामना चर्या ॥ ११ ॥

" काव्यकोषांत आलेल्या वरील प्रकरणांशिवाय 'वामनराव-जीकृत 'पंचापंच' नाटक या नांवाचें एक श्लोकबद्ध प्रकरण व आणखी थोडीशी फुटकळ कविता आहे. 'नाटक' शब्दावरून हें खरोखरच नाटक असेल अशी कोणाचीही समजूत होणें साहजिक आहे, पण वस्तुत: हें नाटक नसून एक अध्यात्मपर प्रकरण आहे. यांतील कांहीं श्लोक पहा:—

विश्वासे सकला अभीष्ट फलदा श्रीसद्गुरुपादुका ।
देती शीघ्र फळा ह्मणोनि भजती अत्यादरें भावुका ॥
कोण्ही स्थापुनि पादुका स्वभवनीं त्या नित्य वंदीतसे ।
मा स्पष्ट प्रिय विग्रहास भजकां त्या सिद्धि कां बा नसे ॥
निराकारीं नसे चित्त जीवाचें या बहिर्मुखा ।
साकारीं ठेवुनी चित्त ईशात ध्याइज सुखा ॥
श्रुती शास्त्रसंतप्रमाणें वरूनि ।
असें ब्रह्म त तूंचि साक्षात्कारी ॥
निजानंदरूपी करोनि समाधी ।
सदा राहतां तूं न बाधे उपाधी ॥
गगन उडत पक्षी लक्षितो जेविं दाणा ।
विविध जग पदार्थीं वर्ततो योगीराणा ॥
सतत मति जयाची ब्रह्मरूपीं समान ।
अचल स्वरूप लक्षी ज्या नसे द्वैतभान ॥

बहुविध कटकादी जे अलंकार पाहे ।
समरुप तयिं जैसे हेमची तत्वताहे ॥
अखिल जग विचित्रा पाहतां द्वैतभावा ।
सत चित सुख योगी लक्षितो ब्रह्मभावा ॥

स्वतःच्या कवित्वाविषयीं वामनरावजींनीं काढलेले खालील उद्गार वाचनीय आहेतः—

असें पतित मी खरा रघुविरा जगत्पावना ।
तुझा भरंवसा मला शुभगतिप्रदाभावना ॥
सराम मुख हें असो तवपदाब्जप्रेमा मना ।
प्रसाद करिं तूं असा विगतकामना **वामना** ॥
अन्यापासुनि जेविं पाक उपजे कहीं तया न्यूनता ।
होतां त्यांत दुजे रसें करुनियां भोक्ता करी सांगता ॥
तैशी ही रचना समग्र वचना ज्ञात्या जनीं पाहतां ।
माझ्या ह्या कवितेंत न्यून असतां तुम्ही करा पूर्णता ॥
शास्त्रा षडभटा प्रदर्शित तिहीं पाहुनियां प्रीतिनें
बोले ही बहुता प्रकार कविता केली असे युक्तिनें ॥
हो का प्राकृत शब्द नाममहिमा ईशप्रिया भक्तिनें ।
साधी **वामन** दास यानिं रचिता जी हो यथाशक्तिनें ॥

---